

आत्मोद्धारमाळा.

पुष्प १ लें.

येक जेवळाचे निवडिले । ते पोहुतच्चि उगमास गेले ।
उगम दर्शनें पवित्र झाले । तीर्थरूप ॥ ११-७-१०. (दा. बो.)

श्रीमत्परमहंस

# स्वामी रामतीर्थ यांचें चरित्र.

स्वतःची उन्नति हीच साऱ्या देशाची उन्नति आहे.
(राम).




लेखक,

गोविंद प्रभाकर भावे.





प्रकाशक,

त्र्यंबक प्रभाकर भावे.



आवृत्ति १ ली.

प्रती २०००.

सन १९२२.

किंमत २ रुपये.

# अर्पण पत्रिका.

ज्या

विश्वचालक रामानें त्याची सेवा करण्याची संधि दिली त्याच्याच चरणीं हें तद्गुणगंधानें दर्वळणारें पुष्प अर्पण असो.

ग्रंथकर्ता.

# वाचकांशीं हितगुज.



**मालेचा उद्देशः**—आज राष्ट्राच्या स्थितीकडे पाहिल्यास त्याला आचार व शील यांनीं युक्त अशा व्यक्तींची जरुरी आहे. अशीं माणसें निपजण्याकरितां राष्ट्रांतील तरुण पिढीपुढें नमुने म्हणून तद्गुणयुक्त व्यक्ति व त्यांचा जीवनक्रम ह्या गोष्टी पाहिजेत पाश्चात्य 'वाघिणीचें दूध' प्याल्यापासून जे दुर्गुण राष्ट्रीय व वैयक्तिक मनाला जडले आहेत, त्यांपैकीं 'फाजील चिकित्सा' हा एक आहे. त्यामुळें 'यद्दृष्टं तत्सत्यम्' अशी वेदांत विपरीत वृत्ति उत्पन्न झाली आहे. तसेंच तदानुषंगिक स्वाभिमानशून्यतेसारखे दोषही उत्पन्न झालेले आहेत. या सर्वांचें पर्यवसान सांस्कृतिक वैशिष्ट्याभावांत झालें. परंतु सुदैवानें आतां डोळे उघडले आहेत. याचें उपादानकारण डोळ्यांत पडलेलें चरचरीत अंजन हें होय. हें अंजन म्हणजे आचारशील व स्वसंस्कृतियुक्त आत्मोद्धारी पुरुष व त्यांचा जीवन-क्रम ह्या गोष्टी होत.

जगाच्या पुनर्घटनेचा, सामुदायिक जीवनक्रम हा आधार आहे, असे विचार व आचार, अल्पप्रमाणावर कां होईना, आज जगांत सुरू आहेत. पूर्णव्यक्तित्व हाच सामुदायिक जीवनाचा आद्य घटकावयव आहे, आणि हें पूर्ण व्यक्तित्व आत्मोद्धारी व्यक्तींच्या जीवनक्रमांत दिसून येतें. सारांश आज राष्ट्रापुढें आज आत्मोद्धारी पुरुष व त्यांचीं चरित्रें पाहिजेत.

भारतवर्षांत उपरिनिर्दिष्ट प्रकारचे पुरुष होते व आहेतही. पण असल्या व्यक्ति कालभिन्नत्वाप्रमाणें भिन्न भिन्न रूपांत दिसतात. घराला लागणारे सर्व खिळे जरी लोखंडाचे असले तरी त्यांचा आकार व माप हीं निरनिराळींच असतात. याचें कारण तत्कालीन परिस्थिति हें होय. तद्वत कालांतरानें उत्पन्न होणाऱ्या आत्मोद्धारी व्यक्तींची गोष्ट आहे.

अशा व्यक्तींचे चरितादर्श राष्ट्रांतील तरुण पिढीच्या पुढें सतत राहिल्यास निःसंशय फायदा होईल हें कोणीही सुज्ञ कबूल करील. हें कार्य करीत असतांना स्वतःचाही बराच फायदा होतो. एवंच व्यापकस्वार्थ साधतो. याच उद्देशानें प्रस्तुत मालेचा उपक्रम झाला आहे. उद्दिष्ट हेतु सिद्धीस नेण्याला

वाचकवर्गाच्या ह्मणजे जनता जनार्दनाच्या सहकार्याची अपेक्षा आहे. या प्रथम यत्नांत जें प्रोत्साहन मिळेल अर्थातच त्यावर पुढील प्रयत्न अवलंबून राहील.

**मालेतील पुष्पांचें स्वरूपः**—या मालेंतून प्रसिद्ध होणारीं पुष्पें अर्थातच वरील ध्येयाला पोषक अशा चरित्ररूपानें व आनुभविक गोष्टींचें स्वतंत्र रीतीनें विवेचन करणाऱ्या ग्रंथाच्या रूपाने दिसतील. चरित्रांत **भगवान् रामकृष्ण परमहंस, प्रभु गौरांग**, तसेंच **ला–ओत्से, अब्दु-लबाहा–आबास** इत्यादि व्यक्तींचीं चरित्रें येतील. आणि इतर ग्रंथांत **स्वामींच्या** उन्नतिपथावरील पायऱ्यांचे व्यावहारिक विवेचन हिंदुराष्ट्रीय वैशिष्ट्याचें पुनरुज्जीवन करणाऱ्या विचारांनीं परिप्लुत असे ग्रंथ येतील. उद्देश तडीला नेण्याचें काम मात्र **प्रभु रामचंद्राकडे** आहे.

उपरिनिर्दिष्ट विचार बरेच दिवस मनांत घोळत होते. त्यांचें दृश्यफल ह्मणजे प्रस्तुत चरित्र होय. **स्वामींचा** जीवनक्रम अद्याप पाहिजे तितका विस्तृत उपलब्ध नाही हें आमचें दुर्दैव ! पण जो कांहीं उपलब्ध आहे तोही स्वतंत्ररूपानें अद्यापि अप्रसिद्ध आहे. याच्या अनेक कारणांपैकीं **स्वामींचें** पुष्कळ वाङ्मय **उर्दूमध्यें** असणें हें होय. तें जनतेपुढें आणण्याचें काम लख-नौची '**रामतीर्थ पब्लिकेशन लीग**' ही संस्था करीत आहे.

स्वामींचीं व्याख्यानें व पत्रें रा. फडके यांचा प्रयत्नानें महाराष्ट्रापुढें आल्यापासून लोकांना त्यांच्या बद्दल विशेष जिज्ञासा उत्पन्न झाली. या जिज्ञा-सेचें चालन मिळाल्यामुळें या संबंधाची माहिती मिळाली. ती पुष्कळशा प्रास्ताविक उर्दू कविता व पत्रें आणि व्याख्यानें या रूपानें मिळाली. अर्थात् याच आधारानें हें चरित्र लिहिलें असल्यानें त्यांच्या काव्यांत, पत्रांत व व्याख्यानांत स्वामींचें जसें प्रतिबिंब दिसतें तसें त्याचें चरित्र वठणार हें उघड आहे. या कामांत **लखनौच्या** संस्थेनें व त्यांचे पट्टशिष्य **श्रीमान् नारायण स्वामी** यांनीं बरेंच सहाय्य केलें. याबद्दल मी ग्रंथकार त्यांचा ऋणी आहे. **स्वामींचें** स्वतंत्र चरित्र कोठेंच उपलब्ध नसून फक्त श्री. **नारायण स्वामींनीं स्वामींच्या '** **रामवर्षा** **'** नामक उर्दू काव्याला त्रोटक माहिती-च्या रूपानें जोडिलें आहे. त्याचा थोडासा फायदा झाला.

पुस्तकाची मांडणी झाल्यावर त्यांत ज्या कांहीं उपयुक्त सूचना 'विवेकानंद' चरित्राचे लेखक रा. रा. ना. मंडलीक यांनीं केल्या त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

तसेंच उर्दू कवितांचें हुबहुत मराठी काव्यरूपानें देण्याचें काम माझे मित्र कवि ' **आनंदीरमण** ' यांनीं केल्यामुळें त्यांचाही मी ऋणी आहें. त्यांचे प्रयत्न कसे काय पटले आहेत हें ठरविण्याचें काम वाचकवृंदाचें आहे. रहस्य दवडिल्याचा आरोप येऊं नये ह्मणून उर्दू कविता जशाच्या तशा देऊन त्यांचें रूपांतर दिलें आहे.

शिवाय लेखनाच्या कामांत ज्या मित्रांनीं मदत केली त्यांचाही ऋणी आहें.

सोबतच्या चित्रांत **स्वामींच्या** गुरुजींचें अद्यापपर्यंत अनुपलब्ध छाया-चित्र लखनौच्या संस्थेनें दिल्याबद्दल तिचाही आभारी आहें.

आपला अगदीं अमूल्य व गुंतलेला वेळ मोडून प्रस्तावना लिहिल्याबद्दल ' **हिंदुधर्माचा ओनामा** ' या पुस्तकाचे कर्ते रा. रा. कृ. वि. वझे, एंजिनियर यांचे आभार मानणें तितकेच महत्वाचें आहे.

जातां जातां लोकसेवक छापखान्याच्या व्यवस्थापकांनीं छपाई सुबक व मोहक करून दिल्याबद्दल उल्लेख करणें जरूर आहे.

दत्तजयंति शके १८४४. ग्रंथकर्ता.



# अनुक्रमणिका.





# प्रस्तावना.



> सदा सन्तोऽभिगतव्या यद्यप्युपदिशंति न ।
> यास्तु स्वैर कथास्तेषामुपदेशाभवंतिताः ॥ सुभाषित.

नेहेमीं संतसज्जनांचें दर्शन घेत असावें. मग ते उपदेश करीत नसले तरी हरकत नाहीं. कारण त्यांच्या साध्या गोष्टी, केवळ गप्पाछप्पासुद्धां उपदेशच होतात. परंतु थोर महात्म्यांचें दर्शन सर्वदा सुलभ नसतें. यासाठीं त्यांचीं चरित्रें वाचावीं, त्यांचे ग्रंथ वाचावे ह्मणजे दर्शन घेतल्याप्रमाणेंच लाभ होतो. सत्पुरुषांचे ग्रंथ किंवा चरित्रें वाचतांना त्यांचें रहस्य पहिल्यानें समजणार नाहीं. तरीपण फिकीर करूं नये. कालांतरानें तें रहस्य त्यांचे कृपेनें समजतें असा अनेक साधकांचा अनुभव आहे. अमका एक जिन्नस लोकांना आवडतो असें समजलें ह्मणजे त्या जिनसेच्या अनेक स्वस्त नकला गोरगरिबांना त्या जिनसेचा लाभ झाला असें वाटावें. ह्मणून होत असतात. हा नियम संतांचे बाबतींत पण खरा आहे. खरे संत दुर्मिळ व लोकांना तर संत दर्शनाची हौस, असें दिसतांच संतांच्या अनेक कला गांवोगांव निघतात. मग या बाजारांत खरा संत कोणता हें ओळखणें दुष्कर होतें. पण चरित्र ग्रंथ वाचण्याच्या विचाराला ही अडचण येत नाहीं. खऱ्या खोट्याची परीक्षा आचरणाचे कसोटीवर व मृत्यूच्या पाण्यानें धुवून घेतल्यानंतर चरित्र बहुधा पसंत ठरत असतें. यासाठीं सत्पुरुषांचे ग्रंथ व चरित्रें या जिनसा पुष्कळ लोकांना फायदेशीर होतात. अर्थात् खऱ्या सत्पुरुषाच्या दर्शनाची बरोबरी यांना होत नाहीं; पण खोट्या सत्पुरुषांच्या दर्शनांत जाणारा वेळ व पैसा वांचतो हा कांहीं लहान सहान फायदा नाहीं.

सत्पुरुष हा संस्कृत शब्द थोर पुरुष या मराठी अर्थाचा आहे. व थोर माणसांचे शास्त्रकारांनीं पांच वर्ग केलेले आहेत. ( १ ) वयानें थोर ( २ ) संपत्तीनें थोर. ( ३ ) सामर्थ्यानें थोर. ( ४ ) विद्येनें थोर. ( ५ ) ज्ञानानें व आचरणानें थोर. हे पांच वर्ग एकापेक्षां एक चढते असे आहेत.

( १ ) वयानें थोर हा मनुष्य यदृच्छेनें अमुक वेळीं जन्मला ह्मणून थोर होत असतो. व पुढें यानें कांहींहि केलें तरी व केव्हांही याचा थोरपणा नाहींसा होत नाहीं. ह्मणून हा अगदीं खालच्या दर्जाचा थोर होय. हा थोर-पणा कोणाला मिळवितां अगर घालवितां येत नाही.

( २ ) संपत्तीनें थोर इसम पण असाच यदृच्छेनें श्रीमंत आईबापांचे पोटीं जन्म घेतल्यामुळें बहुतकरून थोर होत असतो. आपल्या आंगीं संपादन केलेल्या गुणामुळें पण इतरांना हा मोठेपणा मिळवितां येणें शक्य आहे. अशा रीतीनें हा मोठेपणा मिळविणारे अगर घालविणारे इसम केवळ अपवा-दात्मक असल्यानें या मोठेपणाचा नंबर दुसरा लागतो.

( ३ ) सामर्थ्यानें थोर माणसें पण अशींच विवक्षित आईबापांचे पोटीं व विवक्षित काळीं जन्मल्यामुळेंच थोर झालेलीं असतात. पण हा थोरपणा कष्टसाध्य असून थोड्याशा दुराचरणाने जातोही. ह्मणून याचा नंबर तिसरा लागतो.

( ४ ) विद्येनें मिळणारा थोरपणा हा बहुधा आनुवंशिक संस्कारानीं मिळ-वितां येत नाहीं. हा थोरपणा प्रत्येकानें कष्ट करूनच मिळवावा लागतो खरा, पण यांत जन्मतः निसर्गानें विशिष्ट मदत केलेली असते हा थोरपणा कष्टानें मिळवितां येतो. व तो दुसऱ्याला देऊनही आपला घालवावा लागत नाहीं. ह्मणून या थोरपणाचा नंबर इतरांचे वर लागतो. आतांपर्यंत गेलेले थोरपणाचे प्रकार दुसऱ्यांना देतां येत नव्हते व दिले तर दोन ठिकाणीं एकदांच राहूं शकत नव्हते. पण विद्येच्या मोठेपणाची गोष्ट न्यारी आहे. तो अनेकांना देऊन सर्वांचे ठिकाणीं एकाच काळीं राहूं शकतो, असा दिव्य ( दिव्याप्रमाणें ) आहे. हा थोरपणा पण गमावणें शक्य आहे. ह्मणून याचा अगदीं पहिला नंबर

लागत नाहीं. हा थोरपणा मिळविला तरी जाईल असें भय उरतेंच. इतका यांत कमीपणा आहे.

( ५ ) ज्ञानानें व आचारानें येणारा थोरपणा केवळ कष्टसाध्य, अत्यंत बिकट, पण एकदां मिळविल्यावर केव्हांही न जाणारा असा आहे. हा थोरपणा अनेकांना देतां येतो, प्रत्येकाला मिळवितां येतो, जन्म, काळ, स्थळ वगैरे कोणत्याही बाबीची याला हरकत येत नाहीं, व एकदां मिळविल्यावर केव्हांही नाहींसा होत नाहीं असा हा थोरपणा सर्वांत श्रेष्ठ आहे.

संत हा शब्द व ' सत्पुरुष ' यांतील ' सत् ' हा भाग ' अस् ' रहाणें या धातूपासून निघालेला आहे. नेहमी रहाणारा, अविनाशी तो सत्‌ह वरच्या पांचव्या प्रकारचा मोठेपणा आहे. शिवाय भगवंतांनीं गीतेंत सांगितल्या प्रमाणें,

'सद्भावेसाधुभावेच सदिति प्रोच्यते बुधैः ( भ. गी. )

' सत् ' म्हणजे चांगला असा अर्थ घेतला तरी पण पांचव्या प्रकारचे थोर पुरुष त्यांत येतातच म्हणून सत्पुरुष म्हणजे ज्ञान ( ईश्वरी साक्षात्कार ) ज्यांना झाले असे पुरुष होत. अशा पुरुषांचीं चरित्रें व त्यांनीं केलेले ग्रंथ नेहमी संग्रही ठेवावे, वाचावे, व त्यांचे सांगण्याप्रमाणें वागावें. मनुस्मृतींत शिक्षणाबद्दल जें म्हटलें आहे तें या पवित्र ग्रंथांचे वाचनाला अक्षरशः लागू पडतें.

अज्ञेभ्यो ग्रंथिनः श्रेष्ठाः ग्रंथिभ्यो धारिणस्तथा ।
धारिभ्यो ज्ञानिनः श्रेष्ठाःज्ञानिभ्यो व्यवसायिनः ॥ मनु.

ज्यांना मुळींच वाचतां येत नाहीं त्यांपेक्षां ग्रंथ वाचणारे श्रेष्ठ होत, ग्रंथवाचणाऱ्यांपेक्षां ते तोंडपाठ म्हणणारे श्रेष्ठ होत, ग्रंथ तोंडपाठ म्हणणाऱ्यांपेक्षां त्यांचें रहस्य किंवा मर्म ओळखणारे श्रेष्ठ होत व मर्म ओळखणाऱ्यांपेक्षां त्यांप्रमाणें वर्तन करणारे, तें ज्ञान किंवा मर्म प्रत्यक्ष आचरणांत आणणारे श्रेष्ठ होत. थोरपुरुषांचीं चरित्रें वाचणें, त्यांचें ग्रंथ वाचणें यांतसुद्धां याच पायऱ्या आहेत. मुळींच कांहीं न करण्यापेक्षां ज्ञानेश्वरी वाचणें उत्तम, पण सर्वांत वरची पायरी म्हणजे ज्ञानेश्वरीप्रमाणें आचरण करणें होय.

भगवान् रामचंद्र, भगवान् श्रीकृष्ण यांचीं चरित्रें ह्मणजे रामायण, भारत, भागवत वगैरे ग्रंथ आह्मी हिंदु लोक जे इतक्या आस्थेनें व इतकीं वर्षें अनेकवार वाचितों याचें मर्म हेंच आहे. त्या थोर विभूतींच्या आचरणाचें मर्म समजावें, व त्याप्रमाणें आपणांस वागतां यावे यासाठींच हीं पारायणांवर पारायणें करावयाचीं असतात. पण भगवंताच्या चरित्रांत एक प्रकारचा अमानुषपणा असतो व त्यामुळें जरी त्यांनीं डोळे दिपून गेले तरी त्याचें अनुकरण करणें कठीण पडतें; यामुळें त्याना एक प्रकारची क्लिष्टता येते. ही क्लिष्टता साधकाला बाधक होऊं नये ह्मणून 'गुरु' करणेस शास्त्रकार सांगतात. गुरु हा पहिल्याने आपल्यासारखा माणूसच होता, ज्या अडचणी आपणास येतात त्याच त्याला पण आल्या, आणि अनेक अडचणीतून कष्ट सोसून पार पडून गुरूंनीं 'गुरूपण' मिळविले हें पाहून शिष्याला उमेद येत असते. तुकाराम महाराज, एकनाथ महाराज यांचीं चरित्रे जीं इतकी लोकप्रिय आहेत, त्यांचे संप्रदाय चालू आहेत याचें कारण हेंच. तुकाराम महाराजांनीं तर एकेस्थळीं असें ह्मटलें आहे "तुह्मीं लोक असें ह्मणतां कीं, ईश्वर चिंतन करावे वगैरे पुष्कळ गोष्टी मनांत येतात पण कलिकाल व त्यांतील अडचणीमुळें आमच्या हातून तसें वागणें होत नाहीं. पण तसें नाही हें दाखविण्यासाठींच आह्मी वैकुंठाहून खालीं आलों आहों. तुमच्या सर्व अडचणी सांभाळूनसुद्धां ईश्वरीकृपा कशी साधतां येते हें आह्मी प्रत्यक्ष करून दाखवितों." व त्याप्रमाणें त्यांनीं जन्मापासून मरणापर्यंत सर्व खेळ करून दाखविला.

परंतु तोही काळ गेला. आतांची स्थिति त्याहून बिकट म्हणून आह्मांला या काळाला उपयोगी असे कित्ते स्वामी रामकृष्ण, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ वगैरे मंडळींनीं घालून दिलेले आहेत.

अगदीं अलीकडचीं, रोजच्या व्यवहारांत भेटणारीं अशीं माणसें ईश्वरी साक्षात्कार कसा मिळवूं शकतात हें यांच्या चारित्रवाचनानें आपणांस समजतें व आपणांस तो मार्ग आक्रमणेस दुप्पट जोर, व उमेद येते.

अशा प्रकारें सर्व बाजूंनीं उदाहरण घेण्यालायक व अनुकरणयोग्य अशा सत्पुरुषाचें चरित्र आपणांस रा. भावे यांच्या परिश्रमानें वाचावयास मिळत

आहे. हा परमेश्वराचा आपल्यावर मोठा प्रसादच आहे. असाच प्रसाद आप-णांस नेहमीं मिळावा अशी त्या जगन्नियंत्याची प्रार्थना करून हा लेख संपवितों.

रा. भावे यांचा माझा प्रत्यक्ष परिचय नसतांनासुद्धां त्यांनीं आपल्या अमूल्य ग्रंथास 'दशा' लावण्याचें काम मला सांगितलें व तें मी माझ्या योग्यतेप्रमाणें कसेंबसे केलें ह्मणण्यापेक्षां माझ्याहातून झालें ह्मणणेंच अधिक वस्तुस्थितीला धरून होईल. खरी गोम,

**साळुंखी ते कैसी । बोले मंजुळवाणी ।**
**बोलविता धणी । वेगळाची ॥**

तुकाराम.

अशी आहे. असो,

नाशिक मित्ती
आश्विन व॥ ३०

**कृष्णाजी विनायक वझे.**



# उपोद्घात.

## अवतार मीमांसा.



**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

( भ. गी. अ. ४।७ )

या आश्वासनारूप परमात्मा कोणत्याना कोणत्या तरी रूपानें या भूतलावर अवतरतो. ज्याप्रमाणें विविध फळफळावळ व पिकें हीं वाटेल त्या भूमींत आणि वाटेल त्या हवेंत न होतां तीं विशिष्ट भूमींत व वातावरणांतच असतात, होतात व वाढतात, त्याचप्रमाणें परमेश्वरी अवतारसुद्धां विशिष्ट भूमींत व वातावरणांत होत असतो.

'परमेश्वरी अवतार लवकरच व्हावा व होणार' अशी आनुमानिक व श्रद्धामय घोषणा आज सर्व धर्मांतील व धर्मपंथांतील महात्म्यांकडून केली जात आहे; आणि ह्या त्यांच्या घोषणेंत सत्यांशही आहे, हें जगांतील सामाजिक व धार्मिक परिवर्तनें, उत्क्रांत्या आणि त्यांचे इतस्ततः पसरणारे प्रवाह यांच्या सूक्ष्म अवलोकनानें सिद्ध होण्याजोगें आहे.

पेरणी करण्यापूर्वी जशी भूमि पिकांच्या वाढीला परिपोषक होईल अशी तिची मशागत करून योग्य समयापर्यंत वाट पहावी लागते, तशीच स्थिती अवताराची आहे. ईश्वरी अवतार होण्याला योग्य अशी भूमि 'आर्यावर्त' हीच आहे हें आज नव्यानें सिद्ध करण्याची जरूरी नाहीं. कारण आज पश्चिमेकडील नास्तिक देखील 'हिंदुस्थान हा देश तत्त्ववेत्ते व अवतारी पुरुष यांचीच भूमि आहे (India is a land of philosophers and Masters) अशी कबूली देत आहेत.

विशिष्ट प्रकारची राजकीय अगर सामाजिक उत्क्रांति घडून येण्याकरितां तद्विचारपरिपूरित असें वातावरण उत्पन्न करावें लागतें. ही गोष्ट जितकी अन-

भव प्रमाण आहे तितकीच धार्मिक क्रांतीची आहे. अधर्म निवृत्ति व धर्मप्रवृत्ति ही एक धर्मक्रांतीच आहे. **जे मोठमोठे धर्मप्रवर्तक झाले, मतामतांचे संचालक झाले, राजकीय आन्दोलनांचे पुरस्कर्ते झाले, अगर इतर विचारांचे प्रचारक झाले, त्या सर्वांना आपापलें विशिष्ट वायुमंडल अथवा वातावरण बनविणें भाग पडलें**; अशी साक्ष सर्व पुराणें व इतिहास देतात. यावरून ईश्वरी अवतारसंभवाला पोषक असें वातावरण तत्पूर्वीच उत्पन्न होणें जरूर आहे, असेंच सिद्ध होतें. रामकृष्ण, ख्रिस्त, महंमदादि अवतारकालीन सामाजिक परिस्थितीकडे, सामुदायिक मनोभूमीकडे, आणि त्यांतून वाहणाऱ्या विचारप्रणालिकेकडे सूक्ष्मदृष्टीनें पाहिल्यास, उपरिनिर्दिष्टच निष्कर्ष निघतो. किंबहुना रामकृष्णादि अवतार होण्यापूर्वी व झाल्यावरही स्वर्गातील पुष्कळ देवदेवता निरनिराळीं रूपें धारण करून भूतलावर अवतीर्ण झालेलीं होतीं असे जे आपल्या पुराणांतरीं उल्लेखिलेलें आहे, तें कांहीं तरी थोतांड अथवा अंधश्रद्धेचें कथानक नसून वर सांगितल्याप्रमाणें ईश्वरी अवताराला पोषक असें शुद्ध व सात्विक वातावरण उत्पन्न करणे हाच रहस्यस्फोट करण्यासाठीं उल्लेखिलेलें तत्व आहे हेंच खरें.

'यदा यदा हि' ह्या भगवंताच्या आश्वासनांत 'धर्माधर्म' आणि 'अवतार' ह्या दोन गोष्टींचा उल्लेख आहे. त्यांचा थोडक्यांत विचार करूं. धर्म दोन स्वरूपांचा असतो. एका स्वरूपाला '**सनातनधर्म**' व दुसऱ्या स्वरूपाला '**युगधर्म**' अशीं नांवें दिलेलीं आहेत. **दिक्काल परिस्थित्यनवच्छिन्न, भेदाभेद व द्वैताद्वैतरहित, सर्व व्यापक आणि शाश्वत असें त्रिकालाबाधित 'सत्य' अथवा सच्चिदानंद स्वरूप आहे, असें प्रतिपादन करणारी जी अपरोक्षानुभूति तिला 'सनातनधर्म' म्हणतां येईल; आणि मानवी उत्क्रान्तीमधील प्रगतीच्या विविध टप्प्यांवरील परिस्थितीला तोंड देण्याकरितां सनातन तत्वाला दृष्टिसमोर ठेवून केलेलें जें सामुदायिक अगर वैयक्तिक आचरण त्याला 'युगधर्म' हें नांव देतां येईल.** यास्तव

'**सनातनधर्म**' हा अविकृत असतो; पण '**युगधर्म**' बदलतो. कोणत्याही समाजांतील धार्मिक जागृति ही निर्विकल्प प्राप्तीच्या सोपानांतील एक पायरी आहे. म्हणजेच '**युगधर्म**' हा धर्माचें अगर नीतीचें एक व्यावहारिक ( प्रत्यक्ष ) स्वरूप आहे. वरील विवेचनावरून असें सिद्ध होतें कीं, 'युगधर्माला' जरी विकार होतो तरी तो तत्वतः नसून रूपतः होतो.

उलटपक्षी 'सनातनधर्म' व 'युगधर्म' ह्या दोहोंना धाब्यावर बसविणारी जी प्रवृत्ति ती 'अधर्म' होय. अर्थात् अशा अधार्मिक प्रवृत्तीचा उच्छेद करून सनातन धर्मानें ठरविलेलें ध्येय गांठण्याकरितां युगधर्माची स्थापना करणें ही एक धर्मक्रांतीच आहे. आणि अशी क्रान्ति घडवून आणण्यासाठी परमेश्वर अवतरतो.

वर सांगितलेच आहे कीं, अशा धर्मक्रांतीकरितां अनुकूल असे वातावरण अगर वायुमंडल उत्पन्न करावें लागतें; व हें काम करण्याकरितां अधिकारी व्यक्तीच कायत्या पात्र व समर्थ असतात. वेदकालीन मंत्रद्रष्टे व अतींद्रियज्ञाते 'ऋषी' हे उपरिनिर्दिष्ट प्रकारचे अधिकारीच होते. अशा अधिकारी व्यक्तींचे 'जीवन्मुक्त, नित्यमुक्त आणि अवतारी असे सूक्ष्म भेद आहेतच. यांपैकीं कांहीं महात्मे अधर्माच्या तीव्रतेनुरूप प्रगट होऊन विशिष्ट वायुमंडल बनवूं लागतात. यालाच पुढें 'युगधर्म' हें नांव मिळतें. अशा युगधर्माचें वैशिष्ट्य पुढील गोष्टींत असतें.

(अ) त्या काळांतील सार्वत्रिक आध्यात्मिक भावना परिणतावस्थेप्रत नेण्याचें सामर्थ्य, आणि

(आ) दृढभक्ति व आस्था यांनीं युक्त अशा अंतःकरणानें त्याचें आचरण केल्यास उद्दिष्ट ध्येय प्राप्त करून देण्याची शक्ति त्यांत आहे, ह्या गोष्टी अवतारी व्यक्तींच्या प्रत्यक्ष आचरणानें सिद्ध होणें.

सारांश समाजाच्या संचित संस्कारांना 'आत्मैवब्रह्म' ह्या जाणीवेकडे प्रकर्ण करणारा व अधिकारी अवतारी व्यक्तींनीं शोधून काढिलेला आचारसमुच्चय म्हणजेच 'युगधर्म' होय असें ठरतें.

यानंतर भगवंताच्या आश्वासनांतील 'अवतार' ह्या मुद्द्याचा विचार करूं. अवतारी व्यक्तींसंबंधानें विचार करूं लागतांच त्या कशा असतात, त्यांचा जन्मसंभव कसा होतो, त्यांची विशेष लक्षणें असतात किंवा काय, वगैरे प्रश्नपरंपरा साहजिकच सुचते. त्याचा यथामति विचार करूं. भूतलावर होऊन गेलेल्या आणि विशेषतः भरतखंडांत होऊन गेलेल्या अवतारी पुरुषांच्या, अधिकारी महात्म्यांच्या, जीवनचरित्राकडे पाहिल्यास त्यांच्या विशेष लक्षणांसंबंधानें पुढें दिलेल्या गोष्टी स्पष्टपणें दिसतातः—

(१) ते जन्मतः स्व–तंत्र असतात. ते आपलें जीवित मानव जातीच्या कल्याणाचा मार्ग शोधून काढण्यासाठीं केवळ स्वेच्छेनें कष्टमय करितात.

(२) ते धर्मक्षेत्रांत एक नवीनच मार्ग शोधून काढितात.

(३) ते आपल्या इच्छाशक्तीनें अगर अनुग्रहानें बांधवांना ज्ञानप्राप्ति करून देण्यास समर्थ असतात.

(४) प्रत्येकाचे कर्मप्राप्त संस्कार प्रथमदर्शनीच ओळखून परमेश्वर-प्राप्तीचा सहज व सुलभ मार्ग ते दाखवूं शकतात. तथापि या सामर्थ्याचें प्रदर्शन ते कधींहि करीत नाहींत.

(५) आपल्या कार्याविषयीं ते सदैव जागृत असतात.

(६) त्यांची संवेदनाशक्ति इतकी प्रखर असते कीं, जीविताची असारता व मायेचा बाजार ह्या गोष्टी त्यांना तत्क्षणींच समजतात. यामुळें ते भूत व वर्तमान यांची तुलना करून उद्दिष्टध्येयप्राप्तीचा त्वरित फलदायी मार्ग काढूं शकतात.

त्यांच्या जन्मासंबंधानें पुढील विधानें करितां येतातः—

त्यांचा जन्मसंभव लौकिक अगर अलौकिक रीतीनें होतो.

(२) ते ज्या कुळांत जन्मतात, तें कूळ पावित्र्य, श्रद्धा, प्रेमळपणा, भक्ति, भूतदया वगैरे सात्विक गुणांनीं युक्त असतें.

(३) त्यांच्या आईबापांना त्यांच्या जन्मापूर्वी शुभ स्वप्नें, दृष्टांत वगैरे विलक्षण अनुभव येतात.

(४) त्यांच्या बालपणांतील लीला असामान्य असतात.

असे असूनसुद्धां ही सर्व लक्षणे त्यांच्या जन्मसंभवाच्या बाबतींत अवश्यंभावी असतात असें मात्र म्हणतां येत नाही.

वरील सर्व वर्णनावरून अवतार म्हणजे काय व त्याचें कार्य काय असतें याची कल्पना ध्यानांत आली असेलच.

अशा तऱ्हेनें अवतार संभवाकरितां सामुदायिक जनमनाच्या विशिष्ट तयारीचा पार्श्वभाग ( Back-ground ) तयार करणारे पुरुष लागत असतात. व तेही असामान्य असून, सामुदायिक मनोभूमिकेंतील खोड, कुंद, धोंडे, कांटेरी झाडें, विषारी व विघातक वनस्पति व झाडें झुडपें काढण्याच्या कामांत तरबेज असावे लागतात. हें सामर्थ्य त्यांच्या आंगांत असावें लागतें. ते हे सामुदायिक मनोभूमिकाशुद्धीकरणाचें काम अंगमेहनतीनें करितात, निव्वळ उपदेशानें किंवा तोंडपाटिलकीनें हीं असलीं कामें होत नसतात. यामुळें त्यांना पुष्कळ आपत्तींमधून मार्ग काढावा लागतो, त्यांचें आचरण अनुकरण योग्य असें असावें लागतें आणि याकरितां बोलासारखी करणी असावी लागते. ते 'आत्मोद्धारी' असावे लागतात. आणि ज्या मानानें त्यांची अंतःसामर्थ्याची कमावणी असेल, तीवर त्यांच्या शब्दांचे वजन व भावी परिणाम ह्या गोष्टी अवलंबून असतात. जनमनोभूमिकेची उत्तम प्रकारानें मशागत करणें, तिला एका विशेष दर्जावर आणून ठेवणें, तिची बांधबंदस्ती करणें, आणि तिच्यावर नवीन प्रकाश पाडून तिच्यांतील जुन्या ठेवण्याची योग्यता काय आहे हें लोकांच्या नजरेस आणून देणें हीं कामें त्यांना करावयाचीं असतात. हे असामान्य पुरुष म्हणजे भावी अवताराचे बिनीवालेच असतात. अशा बिनीवाल्यांमध्यें स्वामी रामतीर्थ यांची गणना करण्यास हरकत नाहीं असें वाटते.

---

श्रीमत्परमहंस

# स्वामी रामतीर्थ यांचें चरित्र.

## भाग १ ला.

## प्रकरण १ लें.

### कुलशील व बालपण.

सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।
भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥

( श्री. भा. स्कं. ११ )

राष्ट्राची उन्नति होण्याकरितां राष्ट्राचे चैतन्य जागृत झालें पाहिजे. चैतन्य-जागृतीकरितां राष्ट्रांतील सद्गुण, सत्व आणि शील यांचा विकास व्हावा लागतो. ह्या गोष्टींचा विकास करण्यासाठीं सद्गुण, सत्व आणि शील हीं ज्यांच्याजवळ ओतःप्रोत भरलेलीं असतात, किंबहुना जे त्यांच्या मूर्तीच असतात, अशा स्वयंप्रकाश व ओजस्वी महात्म्यांची आवश्यकता असते. असे महात्मे ईश्वरी नियमानुसारच उत्पन्न होतात, आणि ते वैयक्तिक क्षुद्र स्वार्थाला बाजूला सारून आमरण जगदुद्धाराचें उच्च ध्येय डोळयांसमोर ठेवून स्वोदाहरणानें सर्वांचे मार्गदर्शक बनतात. आपल्या अमोघ सामर्थ्याचा विद्युद्दीप अखंड प्रकाशित ठेवून आंधळयालासुद्धां आपल्या ज्ञानदीपाची जाणीव करून देतात, आणि वेळ प्रसंगीं समाजरूपी डब्यांना आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें अभ्युदय-निःश्रेयसपथावर सुरक्षितपणें झटकन् आणून सोडितात.

अशा प्रकारच्या महात्म्यांना जन्म देणाऱ्या जननीला व भूमीला 'वन्देमातरम्' असें मोठ्या प्रेमानें व आनंदानें म्हणावें लागते. अध्यात्मविद्येची जणुं काय खाण अशा पुण्य भरतभूमीलाच असें म्हणवून घेण्याचें श्रेय लाभलें आहे. ही ईश्वराची खैर. असे महात्मे धर्मग्लानीच्या वेळींच उदयास येत असतात व त्यांच्या जन्मसंभवाला पोषक असें वातावरण उत्पन्न करणाऱ्या कांहीं विभूतीहि जन्मास येऊन त्या, महात्म्यांचें भावी कार्य सुकर करण्याच्या उद्योगास लागतात. असें मागें सांगितलेंच आहे. अशा विभूतींपैकीं ' स्वामी राम ' हे असून त्यांनीं अशी कांहीं अलौकिक कामगिरी करून दाखविली कीं, त्यामुळें प्रचलित सामुदायिक मनःस्थितींत क्रांतीच झाली असें म्हटल्यास तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

वैदिक धर्माने ' जगतः स्थितिकारणं साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मः ' अशी धर्माची व्याप्ति ठरविली. ज्या ज्या वेळीं या व्याप्तीची अमर्यादा होऊन विरुद्ध वातावरण उत्पन्न झालें, त्या त्या वेळीं धर्माची विस्कळित झालेली घडी पुनः बसविण्याकरितां आणि तद्विरुद्ध तमावरणाचा निरास करण्याकरितां भरतभूमींत महात्मे उत्पन्न झालेले आहेत. याची साक्ष वेदकालापासून तहत आजपर्यंतचा इतिहास देत आहे.

पूर्वेकडील उज्ज्वल ज्ञानरवीचें किरण ज्यांच्यावर पडलेले नव्हते, अशा पश्चिमेकडील आर्य—कारण पाश्चिमात्य लोक स्वतःला आर्यांच्या मूलशाखेपासून झालेले मानितात—लोकांनीं ज्या संस्कृतीची उभारणी गेल्या शतकांत जडविज्ञानाच्या* पायावर केली होती, तीमुळें ऐहिक सुखलालसा वर्धमान होत जाऊन लोक खऱ्या सुखाला पारखे होऊं लागले होते. सर्वजण 'धनराशी' भोंवतीं फिरूं लागले. सारांश जनसमूह आत्यंतिक श्रेयापासून पराङ्मुख होऊं लागला होता. अशा त्या संस्कृतीच्या वायुमंडलाच्या लाटा भरत-

* "ज्याला इंग्रजींत 'science' असें म्हणतात त्याच्या सर्व आविष्कारांना ' आधिभौतिक ' हें चुकीचें नांव दिलें जातें. त्यांना ' आधिदैविक आविष्कार ' हेंच नांव योग्य आहे. कारण ' आधिभौतिक ' हें नांव ' राजकीय, सामाजिक व नैतिक व्यवस्था नियमांना देणें योग्य आहे " (वैदिकधर्म वर्ष २ अं. ११)

भूमीवर जोरानें आदळूं लागल्या होत्या, एवढेंच नसून त्या संस्कृतीचें वायुमंडळ उत्पन्न करण्यालाही लॉर्ड विल्यम बेंटिंगच्या ( इ. स. १८२८–३६ ) पथ्यकर सुधारणांनीं ( ? ) प्रारंभ केलेला होता. अशा संस्कृतीचे मुख्य सिद्धांत दोन आहेतः—

( १ ) व्यक्तिविषयक सुखाची समृद्धि करणें हेंच प्रत्येकाचें इतिकर्तव्य आहे, आणि

( २ ) निसर्गाला पादाक्रांत केल्याने सुखसर्वस्व लाभेल.

आगगाड्या व तारायंत्रें इत्यादि भौतिक सुधारणा व तदानुषंगिक दळणवळणाच्या साधनांची व व्यापाराची बेसुमार वाढ यांच्या योगानें जशी बहिःक्रांति तशी अंतःक्रांतीही झाली. या संस्कृतींचा पगडा प्रथमतः उत्तरहिंदुस्थानावर विशेष झाला. याचा पुरावा, तत्संस्कृतियुक्त जनमनांतील धार्मिकश्रद्धा व स्वाभिमान ही पार नष्ट होऊन प्रत्येक भारतीय गोष्टीचें पाश्चात्य स्वरूपांत रूपांतर करण्याचे प्रयत्न करण्यांत आले आणि धर्म, न्याय, नीति, समाजरचना इत्यादिकांबद्दल आमच्या भावना बदलल्या, हा होय. परंतु या संस्कृतीचा परिचय जसजसा वाढत चालला. त्यांच्या वाङ्मयांतील कांहीं समाजविध्वंसक व क्रांतिकारक तत्वांचे ज्ञान जसजसें झालें तसतसें त्या संस्कृतीचें वैय्यर्थ्य लक्षांत येऊं लागलें व आर्यसंस्कृतीबद्दलचा आत्मविश्वास उत्पन्न होऊं लागून आपल्या संस्कृतीच्या अभ्यासमननाबरोबर तो दृढावत चालला. असा आत्मविश्वास वृद्धिंगत करणारें वायुमंडळ बनविणारे, त्या अधार्मिक संस्कृतीची लाट थांबवून तिला उलट परागतिक करणारे असे जे अधिकारी महात्मे झाले, त्यांनीं जी विचारप्रणालिका राष्ट्रीय मनाला आणि पर्यायानें जगांतील समष्टिरूप मनाला लावून दिली, त्यांतही मुख्य सिद्धांत दोनच आहेतः—

(१) निसर्गाला पादाक्रांत करूं जाण्याच्या भरींत आपणच त्याचे दास बनलों. आपलें स्व–तंत्रत्व आपण गमाविलें. आणि (२) सुखाचें केंद्र, सुखाचें उगमस्थान, सुखाचा अखंड ठेवा, कोठें बाहेर नसून अंतर्यामींच आहे. तो व्यक्तित्वाचा अर्थात् क्षुद्र अहंकाराचा संपूर्ण त्याग करून, व्यक्तित्वाचा विकास विश्वात्मत्वांत केल्यानेंच प्राप्त होणारा आहे.

उपर्युक्त कल्पनामोदानें दर्वळणारें वातावरण उत्पन्न करून पाश्चात्य संस्कृतिदुर्गंधानें दूषित झालेल्या राष्ट्रीय मनोवितानांत त्या सुगंधी वातावरणाचे फवारे सोडून तेथील वायु ज्यांनीं संशोधिला अशा महात्म्यांचे अध्वर्यु **भगवान् रामकृष्ण परमहंस हे होत.** या वेळेला पूर्वसंस्कृतीचा अभिमान बाळगून अपवित्र वातावरणाची शुद्धि करण्याला हातभार लावणाऱ्या आणखी बऱ्याच व्यक्ति होत्या. तथापि **भगवान् रामकृष्णांचें** बोधामृत व कीर्ति हीं भरतभूमीपलीकडेही पोंचलीं आहेत. यांच्या विचारांचा प्रसार त्यांचे पट्टशिष्य **स्वामी विवेकानंद** यांनीं अमेरिकेंत देखील केला.* व वेदान्ताचें अध्ययन करण्याकडे त्यांची प्रवृत्ति वळविली. या नंतर आपल्या प्रभावानें व विश्वव्यापी प्रेमाने जपान, इंग्लंड, अमेरिका, इजिप्त इत्यादि देशांना चकित करून भगवान् **रामकृष्ण** प्रणीत **विवेकानंदी** टीकेचा 'युगधर्म' स्वोदाहरणानें सुलभ व सुबोध करून, जडविज्ञान व वेदान्त यांमधील भासमान विरोध मिथ्या आहे, किंबहुना वेदान्ताशिवाय जडविज्ञानाची पूर्तीच होणें अशक्य आहे, असें पटवून त्यांची संशयग्रंथी ज्यांनें तोडिली अशी असामान्य विभूति '**परमहंस स्वामी रामतीर्थ**' हे होत. या अद्वितीय महात्म्याचें चरित्र यथामति गावून त्यांच्या दासानुदासांची चरण सेवा करण्याचें भाग्य लाभावें म्हणून आणि बद्ध व पाश्चात्यसंस्कृतीनें दग्ध झालेल्या मनाला अचुक गुणकारी 'बाम' लावण्याची संधी मिळाल्यास पहावी म्हणून ही सेवा सादर करीत आहें.

परमेश्वराची लीला अघटित व अतर्क्य आहे. कारण अलौकिक विभूति जन्माला येण्यापूर्वी व येतांना त्यांच्या कार्याला हातभार लावणारी मंडळीही जन्मास यावी लागते. या म्हणण्याची यथार्थता गेल्या पन्नास साठ वर्षांच्या उत्तर हिंदुस्थानांतील इतिहासाकडे पाहिल्यास पटणार आहे. या कालांत भारतीय संस्कृतीचा आपलेपणा न सोडितां पाश्चात्यांनीं संपादिलेल्या ज्ञानाचा योग्य तो फायदा घ्यावा व काल व परिस्थिति यांना अनुसरून अशा सुधारणा

* सध्या त्यांचे अनुयायी 'अभेदानंद, सत्यानंद' वगैरे अजूनही तेंच काम अमेरिकेंत करीत आहेत.

समाजरचनेंत कराव्या आणि वेदान्ताच्या पायावर आत्मोन्नति करावी, 'वसुधैव कुटुंबकम्' ही वृत्ति लोकांमध्यें बाणविण्याकरितां स्वोदाहरणाचा कित्ता लोकांपुढें ठेवून आत्मोद्धार व जगदुद्धार असें जें दुहेरी कार्य स्वामी विवेकानंद व रामतीर्थ ह्यांनीं केलें त्याला हातभार लावण्यासाठीं व तें पुढें चालू ठेवण्यास समर्थ अशी मंडळीहि परमेश्वरी योजनेप्रमाणें जन्मास आलेली होती. अशा मंडळींत पं. मदनमोहन मालवीय (ज. इ. १८६१), लालाहंसराज (जन्म इ. १८६१), रवींद्रनाथ टागोर (ज. इ. १८६१), स्वामी विवेकानंद (ज. इ. १८६२), लाला लजपतराय (ज. इ. १८६५), महात्मा गांधी (ज. इ. १८६९) योगींद्र बाबू अरविंद (ज. स. १८७२) यांचीं नांवें चमकत आहेत. या शिवाय आणखी कित्येक महात्म्यांनीं स्वामींच्या भावी कार्याला पोषक असेंच वातवरण उत्पन्न केलेलें होतें.

शुद्धबीजेचिया पोटीं। फळें रसाळ गोमटीं.

हें अभंगवचन आहे. एकनाथ, ज्ञानदेव, नामदेव, रामदास, रामकृष्ण परमहंस वगैरे सत्पुरुषांच्या जन्माचे बाबतींत वरील वचन सर्वांशीं खरें असलेलें आढळतें. या सर्वांचे वाडवडील ईश्वरभक्ति, पावित्र्य, ऋजुता, दयाळुत्व, साधेपणा वगैरे सद्गुणांविषयीं प्रसिद्ध असल्याची ख्याति आहे. यावरून आनुवंशिक पावित्र्याचें महत्व सहज लक्षांत येण्याजोगें आहे.

**स्वामी रामतीर्थांचा** जन्मही अशाच पवित्र ब्राह्मण कुलामध्यें झाला. वशिष्ठ गोत्रोत्पन्न, वाल्मीकीचे अवतार, व प्रभु रामचंद्रांचे निःसीम भक्त आणि हिंदीरामायणाचे कर्ते श्रीगोस्वामी **तुलसीदास**जी यांच्या कुलामध्यें यांचा जन्म झाला, रामतीर्थांच्या या कुलाची योग्यता व धन्यता अधिक वाढली असें म्हणण्यास हरकत नाहीं. पंजाबांत **गुजरणवाला** जिल्ह्यांत '**मुरलीवाला**' म्हणून एक लहानसें खेडें आहे. त्या खेड्यांत विक्रम संवत् १९३० मधील दिपवाळीच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे २२ आक्टोबर १८७३ इसवी रोजीं बुधवारीं मीन लग्नावर गुसांई **रामलालजी** यांचा जन्म झाला. तुलसीदासांच्या पवित्र कुलांत रामतीर्थांचा नुसता जन्म झाला होता एवढेंच नसून तुलसी-दासांचें भक्तिमय अंतःकरण, परमेश्वर प्राप्तीची उत्कृष्टता,

दृढनिश्चय आणि कवित्व यांचें जणुंकाय प्रतिबिंब स्वामी **रामांत** पूर्णपणें उतरलेलें दिसतें.

रामतीर्थांच्या वडिलांचें नांव **हिरानंद** असें होते. ते स्वभावानें फार सरळ होते. बिचारे वडील पेशावर व स्वात येथील ब्राह्मण कुलांचे उपाध्येपण करून आपला प्रपंच चालवीत. **रामतीर्थांचे** आजोबा (आईचे वडील) ज्योतिषशास्त्रांत निपुण होते. त्यांच्याकडून आपल्या मुलीच्या संसाराला कांहीं मदत झाली नसेल असें नाहीं. परंतु तो संबंध जरा निराळाच होता. एकंदरींत घरची अगदीं गरिबी होती. परंतु गरिबीची योग्यता कांहीं कमी नाही. कारण कुंतीसारखी स्त्री भगवान् श्रीकृष्णापाशीं 'विपदः संतु नः शश्वत्' अशी मागणी करते तर कांहीं कवी 'sweet are the uses of adversity' (Grey) अशा भाषेनें गरिबीचे गोडवे गातात. एवढें खरें कीं, **गरिबी ही मोठेपणाच्या शिक्षणाची एक शाळा आहे.**

आपल्या नातवाचें जन्मवृत्त ऐकिल्यावर त्यांनीं पत्रिका तयार करण्यास सुरवात केली. कुंडली तयार होतांच त्या प्रेमळ वृद्ध आजोबांचे डोळे पाण्यानें भरून आले. परंतु दुसऱ्याच क्षणाला त्यांच्या चेहेऱ्यावरील दुःख नाहींसें होऊन त्याच्या जागीं आनंदाची छटा पसरली. या परस्परविरोधी मनोविकारांचें कारण विचारितांच ते ह्मणाले "मी रडलों. याचें कारण हा मुलगा अशा वेळेवर जन्मला आहे कीं, एक हा स्वतः तरी जगणार नाहीं किंवा आपल्या मातेला तरी जगूं देणार नाहीं. आणि मी हंसलो; याचें कारण यदाकदाचित् बालक जिवंत राहिल्यास तो निव्वळ कुलोद्धारक होईल असें नसून तो असा महात्मा होईल कीं, तो सर्व जगाला आपल्या तेजानें दिपवील."

तथापि 'ईश्वरेच्या बलीयसी' असल्यामुळें भारतवर्षाच्या व जगाच्या सुदैवानें परंतु रामतीर्थांच्या व त्याच्या मातेच्या दुर्दैवानें लवकरच राम पोरका झाला !! मातेचें दुर्दैव ह्मणण्याचें कारण 'जिच्या हातीं पाळण्याची दोरी,' जी बालस्वभावाला उन्नत अथवा अवनत करूं शकते, जी राष्ट्राला उदयोन्मुख करूं शकते, जिच्या स्फूर्तिदायक शिक्षणानें तिचें बालक कृष्ण अथवा ख्रिस्त होवूं शकतें, अशी ज्या मातृपदाची थोरवी त्याच पदावर जर

तीर्थरामाची ( रामतीर्थांचें जन्म नांव तीर्थराम होतें ) माता तो मोठा झाल्या वरही राहिली असती व तिला आपल्या पुत्ररत्नाचा यशोदुंदुभी ऐकण्यास मिळाला असता तर तिला तें केवढें महद्भाग्य वाटलें असतें !

अशा रीतीनें तीर्थराम मातेच्या पोषक दुधाला आंचवला. परंतु गोमातेनें त्याला आपल्या दुधानें जगविलें. हिरानंदजी स्वभावाचे भित्रे होते असें दिसतें. कारण अशा भार्यानिधन प्रसंगानें ते थोडेसे खचले. तथापि तीर्थरामाच्या आतेनें त्याचें पालनपोषण मोठ्या प्रेमानें व मेहेनतीनें केलें. सदाचार, चारित्र्य, आणि भक्ति, या सद्गुणांचें एक नमुनेदार उदाहरण ती होती. यामुळें या तिच्या सद्गुणांचा परिणाम तीर्थरामावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. तीर्थरामाच्या स्मृतिपटलांतील श्रद्धा, भक्ति वगैरे सद्गुणांचीं कपाटें खोलण्यास तिच्या सद्गुणी आचरणानें खात्रीने मदत केली असली पाहिजे.

## मुलाचे पाय पाळण्यांत

दिसतात असें म्हणतात तें अगदीं खरें आहे. तीर्थरामाची आत्या जेथें जेथें जाई तेथें तेथें तो मुलाप्रमाणें तिच्याजवळ असे. यामुळें देवदर्शनाला जातांना, आणि जेथें भारत, भागवत, रामायण इत्यादि पुराणें चाललीं असत त्याठिकाणीं जातांना, **तीर्थराम** तिच्याबरोबर असे. त्याचा परिणाम असा झाला कीं, तीर्थरामाच्या ठिकाणीं बीजरूपानें असणारे धार्मिकता, औदार्य, सावचित्तता, विचारीपणा, आणि कुशाग्रता, वगैरे गुण एव्हांपासूनच अंकुरित झाले. तीर्थरामाला भजन व कथा यांचा इतका नाद लागला कीं, खेळणें, खाऊ वगैरे बालकाच्या मनप्रलोभनाचे पदार्थही त्या मनाची बालवयांतही समजूत करूं शकले नाहींत! शंखाचा आवाज अथवा प्रणवोच्चार तर **तीर्थरामाच्या** रडण्यावरचा एक रामबाण तोडगाच होऊन बसला होता!! केवढा हा प्राक्पुण्य संचय कीं, इतक्याशा लहान वयांत ही वृत्ति!!! यावेळीं महाराष्ट्रांतील अनेक साधुसंतांच्या अगर रामकृष्ण परमहंसांच्या बालपणाच्या, अशाच मनःस्थितीची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. आम्हीं बद्धांनीं मात्र ' बहूनाम् जन्मनामंते ' एवढेंच म्हणून स्वस्थ बसणें भाग आहे.

**राम** जसजसा वाढत चालला, तसतसें, त्याच्या अंगच्या उपरिनिर्दिष्ट गुणांनीं बाळसें घेतल्याचें स्पष्ट दिसूं लागलें. यामुळें ज्योतिष्यांनीं त्याच्या उज्वल भविष्यत्कालाचें खालीं दिल्याप्रमाणें भाकित केलें होतें:—

(१) वंशांतील बुद्धिमत्तेचा तिलक होईल.

(२) धर्मावर अगदीं स्वतंत्र व नवीनच प्रकाश पाडील.

(३) परदेश गमन करील.

(४) वयाच्या तेतिसाव्या वर्षी गंडांतर येईल.

याशिवाय इतर बारीकसारीक गोष्टींचें भविष्य कळावें म्हणून **तीर्थरामाच्या** सायन व निरयन अशा दोन्ही कुंडल्या तज्ज्ञांच्या अवलोकनार्थ जोडिल्या आहेत.

जन्मकाल—विक्रम संवत् १९३०, शके १७९५ कार्तिक शुद्ध १ बुधवार, सूर्योदयाद्गत घटी २५ पळें १५, तारीख १५ आक्टोबर सन १८७३.

## सायन कुंडली.



## निरयन कुंडली

१ रा.
११
२
१२
१० श.
३
९ मं.
४
६
शु. गु.
७
८
५
र. चं. बु के.

## बालविवाह.

हिंदुस्थानांतील पुष्कळ प्रांतांत अगदीं बालपणीं विवाह करण्याची घातुक चाल अद्यापिही आहे. त्याचा परिणाम असा होतो कीं, मुलावर विद्यार्थी या नात्याचें व गृहस्थ या नात्याचें असें द्विगुणित ओझें पडतें. त्याच्या अभ्यासांत व्यत्यय येतो, प्रकृति व बुद्धि अकालीं खालावते, वाढ खुंटते आणि अशा रीतीनें त्याच्या आयुष्यनाशाचा पाया घातला जातो. ही बालविवाहाची चाल आमच्या समाजांतील अविभक्त कुटुंब पद्धतींत फारशी जाचक होत नाहीं. परंतु हल्लींसारख्या विभक्त कुटुंबपद्धतींत तर बरीच जाचक होते.

याच रिवाजाप्रमाणें **तीर्थराम** फक्त दोनच वर्षांचा असतांना गुजराणवाला जिल्ह्यांतील **वझिराबाद** तहसिलीमधील **विरोकी** ( वेरोकेस ) या गांवच्या **पंडित रामचंद्र** नांवाच्या सद्गृहस्थाच्या अर्भकावस्थेतील बालिकेशीं त्याचा विवाह ठरला, आणि त्या प्रांतांतील रुढीप्रमाणें लालगंधही झालें. मात्र विवाहविधी तीर्थरामाच्या दहाव्या वर्षी झाला. विद्याभ्यासाला केवढा मोठा हा अडथळा ! परंतु रामाला यावेळीं कांहींच समजत नसल्यामुळें त्याला कोणत्याही प्रकारची सबब पुढें मांडितां आली नाहीं. अगर हा बालसुलतान निजानंद मस्तींतच गुंग होता. वास्तव त्याची त्याला कांहीं पर्वाच वाटली नसेल.

## शिक्षणाचा 'श्रीगणेशा'

सामान्यतः ब्राम्हणवर्गातील मुलें लवकरच शिकूं लागतात. त्याच नियमाला अनुसरून तीर्थरामाला वयाच्या पांचव्या वर्षी शाळेंत जावें लागलें. ही प्राथमिक शिक्षणाची उर्दू पाठशाळा गुजरणवाला येथेंच असून तिचा मुख्याध्यापक मौलवी महम्मदीन नांवाचा गृहस्थ होता. तीर्थराम जात्याच हुषार, तरतरीत आणि तीव्र स्मरणशक्तीचा होता. यामुळें शाळेंतील त्याचा अभ्यास नेहमींच चोख असे. याशिवाय एवढ्याशा चिमुकल्या वयांत त्यानें आपला अभ्यास संभाळून **गुलिस्तान व बोस्तान**[1] हे दोन फारशी भाषेंतील ग्रंथ तोंडपाठ केले. या दोन्ही कारणामुळें तर त्याच्यावर मौलवींची विशेष मर्जी बसली. या पाठशाळेंतील शिक्षणक्रम संपूर्ण होतांच **तीर्थरामाला** अर्थातच ती शाळा सोडणें भाग पडलें. त्यावेळीं तर मौलवीसाहेबांनीं **तीर्थरामाला** मोठ्या कष्टानें पण आनंदानें व अभिमानानें सोडिले.

इकडील विद्यार्थी वर्गाकडे पाहिलें असतां असें एक सामान्य तत्व लक्षांत येते कीं, जीं मुलें विशेष हुषार व अभ्यासी असतात, ती खेळाकडे दुर्लक्ष करितात, आणि यामुळें त्यांची शरीरप्रकृति निरोगी व सुदृढ नसते. तीच स्थिती जन्मतः अशक्त अशा आमच्या तीर्थरामाची होती. त्याचा नित्यक्रम असा असे कीं, सुटी होतांच त्यानें धर्मशाळेंत जावें, तेथें चाललेल्या पुराणकथा ऐकाव्या आणि घरीं येतांच तेथें ऐकिलेल्या सर्व गोष्टी व पाठांतरें आपल्या नातेवाईकांस अगदीं बिनचूक सांगावीं.



१ गुलिस्तान व बोस्तान–प्रसिद्ध फारशी कवी शेख सादी याचे उत्तम ग्रंथ.

# प्रकरण २ रें.



## भगत धन्नाराम.

बिनु सत्संग विवेक न होई।
रामकृपाबिनु सुलभ न सोई ॥ ७ ॥
सत्संगति मुद मंगलमूला।
सोइ फलसिधि सब साधनफूला ॥ ८ ॥
साधु[2] चरित शुभ सरिस कपासू।
निरस विशद गुणमय फलजासू ॥ ५ ॥
जो सहि दुख परछिद्र दुरावा।
वन्दनीय जेहि जग यश पावा ॥ ६ ॥

( तु. रा. बा. कां. ).

सत्संगतीचा महिमा सांगून संपत नसतो. तो नेहमीं अपूर्णच राहतो. इतका अमर्याद तो आहे. त्यांतल्यात्यांत महाराष्ट्र वाचक वर्गाला तर तो नव्यानें सांगण्याची जरूरीच नाहीं. कारण महाराष्ट्रांतील साधुसंतांचें कवित्व त्यानेंच

---

१ सत्संगतीशिवाय ज्ञान होत नाहीं. आणि सत्संग रामकृपेवांचून मिळत नाहीं. सत्समागम हा आनंद व मंगल यांचा जनक असून तोच सर्व साधनें, दान, यज्ञ, तप वगैरेंचें इष्ट फल आहे. अगर आनंदवृक्षाचें सत्संगति हें मूल आहे, महात्म्यांचा सिद्धांत हें त्याचें फल आहे, आणि शमदमादिसाधनें हीं याचीं फुलें आहेत. २ साधूचें चरित्र हें कापसाप्रमाणें रसहीन परंतु गुणमय असतें. कापसामध्यें जसा रस नाहीं; पण गुण ( धागा, दोरा, ) आहे, तद्वतच साधूंच्या चरित्रांत संसाररस नाहीं; पण विज्ञानादि गुणांनीं तें युक्त असतें. शीतोष्ण, कर्तन, धावन इत्यादि दुःखें सोसून कापूस (वस्त्र) जसें मनुष्याची शरीररक्षा करितें, तशीच रीत साधूंची आहे. म्हणून ते नमस्कारार्ह असून जगांत यशस्वी आहेत.

भरलेलें आहे. त्यांचें वर्तन व त्यांचें महाराष्ट्रावर झालेले परिणाम हे अद्यापिही दिसत आहेत. आणि आचार हा मुग्ध वक्ता असल्याकारणानें त्याचेंही वर्णन करावयाला नको. शिवाय त्याचें वर्णन करावयाला योग्य व अधिकारीच पुरुष लागतात. वाल्मीकीचे अवतार, भक्त-शिरोमणि गोस्वामी तुलसीदासजी यांच्याच वाणीनें सत्संगतीचें वर्णन करणें चांगलें. ते म्हणतातः—

विधि हरिहर कवि कोविद वानी ।
कहत साधुमहिमा सकुचानी ।
सो मोसन कहिजात न कैसे ।
शाकवणिक मणिगुणगण जैसे ॥

( बालकांड ).

या करितां हा ' अव्यापारेषु व्यापार ' न करणें बरें. एवढें खरें कीं, ' को न सुसंग बडापन पावा ?'

ही इतकी प्रस्तावना करण्याचें प्रयोजन एवढेंच कीं, ज्याचें शिष्यत्व तीर्थरामाला वयाच्या दहाव्या वर्षापासून लाभलें होतें. ती व्यक्ति इतक्या योग्यतेची होती व आहे. अशा व्यक्तीच्या चरित्राशीं वाचक वर्गाचा थोडक्यांत परिचय करण्याचें योजिलें आहे. त्यावरून गुरूच्या आचाराचा शिष्याच्या वर्तनावर काय परिणाम होतो हेंहि पहावयास सांपडेल.

## बालपण व शिक्षण.

गुजरणवाला येथील मुनचे जातींतील आडोडा कुळांतील जोहारमल नांवाचे गृहस्थ धन्नाजीचे वडील होते. धन्नाजीचा जन्म विक्रम संवत् १९०० चे कार्तिक मासीं झाला असें ह्मणतात. यांच्या भावी शिष्याप्रमाणें यांची आईही अगदीं बालपणींच इहलोक सोडून गेली. यामुळें याचें लालनपालन याच्या आजीनें व आतेनें केलें.

---

१ ब्रह्मा, विष्णु, शंकर, कवी, पंडीत, यांची वाणीसुद्धां साधूंचा महिमा वर्णन करितांना संकोच पावते. ज्याप्रमाणें भाजीविक्या रत्नांचा महिमा वर्णन करूं शकणार नाहीं, त्याचप्रमाणें मीही साधूंचा महिमा वर्णूं शकत नाहीं.

धन्ना थोडा मोठा झाल्यावर ह्मणजे वयाच्या पांचव्या वर्षी आपल्या गरिबीला न जुमानतां जोहारमलजींनीं त्याला शाळेंत घातलें. सुमारें चार पांच वर्षांत त्या शाळेंतील अभ्यासक्रम—लिहितां वाचतां येणें व हिशोब टिशोब करणें—पुरा केला. शाळा सुटल्यावर हुषार विद्यार्थ्यांना मागें ठेवून तोंडचे हिशोब घालण्याची चाल होती. आणि उत्तरांच्या अनुक्रमानें त्यांना सोडण्यांत येई. धन्ना चलाख व कुशाग्र बुद्धीचा असल्यामुळें सर्वांच्या अगोदर त्याला जाण्यास मिळे. अर्थातच ही गोष्ट त्याच्या सहाध्यायांना पटत नसे. पण जळफळाटापलीकडे त्यांना कांहीं करितां येईना. तथापि त्याला चांगलाच हात दाखविण्याचा त्यांनीं निश्चय केला; व एके दिवशीं त्याच्यावर एक कुभांड त्यांनीं शाबीद केलें. धन्ना जरी पंतोजीच्या प्रेमातला होता तरी सर्वांकडून तक्रार आल्यामुळें त्यांनाही धन्नाचा राग आला. व खऱ्या स्थितीचा विचार व तपास न करितां प्रत्येक विद्यार्थ्यास त्याच्या श्रीमुखांत लगाविण्याची त्यांनीं परवानगी दिली.

परंतु हें अन्यायी कृत्य त्या लहान पण मानी व सत्यप्रिय धन्नाला खपलें नाहीं. लगेच तोंडच्या हिशोबांकरितां न थांबतां तो तडक घरीं आला. त्याला सात्विक संताप आला होता. यामुळें त्यानें ती सर्व अपमानकारक व स्वाभिमानहारक गोष्ट आईबापानां सांगून ' मी अतःपर त्या मारकुट्या पंतोजीच्या शाळेंत जाणार नाहीं; माझी शाळा सोडवा; नाहीं पेक्षां मी घरांतून कायमचा निघून जातों असें ह्मणाला'. बिचाऱ्या आईबापांवर ह्या धमकीचा योग्य तो परिणाम होऊन शाळेंत जाण्याविषयीं आग्रह न करण्याचें अभिवचन त्याच्या बापाकडून मिळालें; सारांश धन्नाच्या शिक्षणाची परिसमाप्ति येथेंच झाली ! पद्धतशीर असा अभ्यास पुढें झालाच नाहीं. तथापि पुढें रामतीर्थांचा संबंध जडल्यावर त्यांच्या प्रेमाखातर त्यांनीं हिंदी लिहिण्याचा व वाचण्याचा थोडाबहुत प्रयत्न केला असें स्वामी रामतीर्थांच्या पत्रांवरून दिसतें.*

---

* "ता. २०-२-९४.

आपण स्वतः आपल्या हातानेंच पत्र लिहिण्याचा अभ्यास करावा. धीरानें व प्रेमानें आपण हें काम करावें."

## स्वावलंबन.

शाळेला रामराम ठोकल्यावर धन्नाच्या वडिलांनीं त्याला एका अनुभवशीर तांबटाच्या हाताखालीं ठेविलें. जात्याच हुषार असल्यानें तो थोड्याच दिवसांत त्या कामांत वाकब होऊन आपली रोजी मिळविण्यास समर्थ झाला. व रोजीं रुपया कमावूं लागला. पांच सात वर्षे राहून धन्नानें त्या धंद्यांतील सर्व कसब आपलेंसें केलें होतें.

पुढे एकदां '**कटासराज**' नांवाच्या गांवीं मोठ्या यात्रेंत आपलें दुकान घेऊन जाण्याची संधी धन्नाला मिळाली. यात्रेहून परत येतांना वाटेत 'पिंडदादनखान' येथें तांबटकामाची विशेष चलती आहे असें पाहून त्यानें तेथें आपलें स्वतःचें दुकान काढण्याचा निश्चय केला. यावेळीं त्याचें वय सारें एकोणीस वर्षांचें होतें. लागलीच घरीं येऊन खटपट करून त्यानें त्या गावीं आपलें दुकान काढिलें, व धंदा सुरू केला. यावरून **त्यांच्या आंगचे दृढ निश्चय, कुशाग्रता, व स्वावलंबनाची आवड** हे गुण व्यक्त **होतात. कोणतीही गोष्ट अथवा तत्व मनाला पटलें** म्हणजे तें **लागलेंच आचरणांत** आणावयाचें हा **धन्ना**मध्यें विशेष गुण होता. याच गुणाचें वळण पुढे त्याच्या शिष्याला मिळालें.

धन्नाला लहानपणापासून तालीम व कुस्ती यांचा मोठा नाद होता. यामुळे रोज संध्याकाळीं तो दुकानावरून सुटतांच आखाड्यांत जाई, तेथें सर्वप्रकारची तालीम कसून करी व त्यामानानें आपल्या कमाईतून खुराकही खाई. यामुळें रात्रौ झोप चांगली लागे व आरोग्य राही. 'शरीरमाद्यं खलु धर्म साधनम्' हें तत्त्व त्याला या वयांत चांगलेंच पटल्याचें हें उत्तम उदाहरण आहे. पिंददादनखान येथें आल्यावर **धन्नारामजींनीं** एक आखाडा स्थापून

---

स्वामी "ता. २५-२-९४" च्या पत्रांत लिहितातः—'आपली हकीगत आपण लवकरच आपल्या हातून लिहून कळवावी.'

"ता. ९-१२-९४.

आपलें अक्षर अलीकडे **पहिल्यापेक्षां** बरेंच सुधारलें आहे. बारीक लिहिण्याचा प्रयत्न करावा."

स्वतःच्या नियमितपणानें व आचरणानें तेथील लोकांत तालमेबद्दल आवड उत्पन्न केली. थोड्याच दिवसांत त्या गांवीं बरेच आखाडे झाले व अखेरीस त्या गांवाला 'आखाड्यांचा गांव' हें नांव मिळालें.

या नादामुळें एकदां एका प्रख्यात पहिलवानाबरोबर त्यांची कुस्ती होऊन धन्नाजी विजयी झाले. परंतु लक्षांत घेण्यासारखी ही गोष्ट कीं, या विजयानें ते फुगून न जातां **माझ्या शारीरिक बळामुळें हा विजय झाला असें नसून परमेश्वराच्या ठिकाणीं माझी जी अचल निष्ठा आहे तिचाच हा परिणाम आहे** ' असें ते म्हणत. यावरून **मनाची सुसंस्कृतता ही शाळेंतील** शिक्षणावरच **अवलंबून नसते** हें नाहीं का खरें?

## मनोनिरीक्षण.

शरिराप्रमाणें **धन्नाजींचें** मनही खंबीर होतें. ते मोठे निग्रही होते. एखादी गोष्ट करण्याचें त्यांनीं मनांत आणिलें म्हणजे ती केल्याशिवाय ते कधींही रहात नसत. इंद्रियदमन व मनोजय ह्या गोष्टी साध्य करून घेण्याकडे त्यांचें विशेष लक्ष असे.

याकरितां मलमूत्रविसर्जनाचा इच्छेप्रमाणें निरोध करण्याचा त्यांनीं अभ्यास केला होता. जेवतांना पाणीहि प्यावयाचें नाहीं अशी संवय एकदां त्यांनीं लावून घेतली होती. कधीं कधीं ते सबंध दिवस स्वतःशीं हंसत बसत, तर कधीं दिवसच्यादिवस मौन धरीत. कांहीं दिवस त्या पंजाबांतील थंडींत कपडे न घालितां रहात, तर कधीं भर उन्हाळयांत अति गरम कपडे घालून बसत. अशा रीतीनें त्यांनीं शम व दम यांचा अभ्यास केला. कारण, त्यांना हें माहीत होतें कीं, **मन हेंच सर्व सूत्रचालक असल्यानें सर्व** इंद्रियांना **नामोहरम करण्याकरितां मनाच्याच नाड्या आंखडणें** अवश्य आहे.

त्यांच्या निग्रहाप्रमाणें ते उदारही होते. त्यांना जी प्राप्ति होत असे तींतील कांहीं भाग स्वतःच्या चरितार्थाकरितां ठेवून बाकीचा भाग साधुसंतांच्या सेवेंत ते खर्च करीत. ह्या सर्व गुणांचें बीज लहानपणींच त्यांच्या मनांवर रुजलें होतें असें दिसतें. कारण त्यांना कथापुराण ऐकण्याचा फार

नाद असे. तेथें ते स्वतः एकाग्रतेनें श्रवण करीत व दुसऱ्यांना तसा उपदेश करीत. त्यावेळीं कोणी गडबड केलेली त्यांना खपत नसे. भक्तांच्या कथा ऐकतांना त्यांचें अंतःकरण भरून येई. एकदां सुदाम्याचें आख्यान चाललें असतांना तर त्यांचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरून आले.

अशा रीतीनें हा भगवत्प्रेमाचा उमाळा वाढत चालला, त्यावेळीं क्वचित्प्रसंगीं तो उमाळा काव्यरूपानें बाहेर पडे. तसेंच ज्या ज्या वेळीं त्यांचें चित्त अस्थिर होई, त्या त्या वेळीं ती अस्थिरता कवनोद्गारांच्या रूपानें बाहेर पडे, अशा वेळच्या काव्याविषयीं स्वतः रामतीर्थ असें म्हणतात कीं, त्यांच्या कवितेंत जरी काव्यपरिष्कार नाहींत तथापि सहजस्फूर्तीनें उत्पन्न झालेला सरळपणा व प्रेम ही भरपूर आढळून येत, कृत्रिमतेचा पूर्ण अभाव असे. यामुळें त्यांत नेहमीच ताजेपणा असे.

धन्नाजीच्या स्वभावाचा विशेष म्हटला म्हणजे 'आधीं केलें । मग सांगितलें ।' हा होय. केव्हां एखादें तात्विक निरूपण त्यांनीं ऐकिलें म्हणजे त्यावर विचार करून तें आचरणांत आणण्याचा प्रयत्न करीत, यावेळीं त्यांना योगवासिष्ठावरील पुराण ऐकण्याचा नाद लागला होता. त्यामध्यें एकदां 'मनुष्य स्वयं ब्रह्मरूप आहे' असें निरूपण त्यांनीं ऐकिलें. लागलाच याच्यावर विचार सुरू झाला. व तेव्हांपासून त्यांना जो जो भेटे त्याला ते 'हे ब्रह्मन्, हे नारायण' या नांवानें संबोधूं लागले. अशा त्यांच्या वृत्तीमुळें सर्व लोक त्यांना 'खुदा' असें म्हणूं लागले. अशा स्वरूपाची त्यांची मानसिक उन्नती होत असूनसुद्धां त्यांच्या मनाला शांति व समाधान हीं प्राप्त झालेलीं नव्हतीं. याचें कारण त्यांच्या ठिकाणीं पूर्ण अद्वैतवृत्ति बाणलेली नव्हती.

नित्यतृप्तता प्राप्त होण्याला सद्गुरूशिवाय अन्य उपायच नाहीं. यामुळें त्यांना सद्गुरूचा निदिध्यास लागला. शमदमादि साधनांच्या योगानें मन, बुद्धि व अंतःकरण हीं आत्मज्ञान प्रवण झालीं, म्हणजे सद्गुरू भेटीची तहान लागते. आणि त्या तृष्णेनें व्याकुळ झालेल्या जिवालाच सद्गुरू प्राप्ति होते. तशीच स्थिति धन्नाची झाली.

## सद्गुरूची भेट व आत्मज्ञान.

पुष्कळ दिवस राहूनही अंतःकरणाची तळमळ नाहींशी करणारा अधिकारी सद्गुरु भेटत नाहीं हें पाहून त्यांनीं पिंडदादनखान सोडिलें व ते गुजरणवाला येथें आले. तेथे त्यांना एक महात्मा भेटला व त्याला त्याच्या अंतःकरणाच्या तळमळीवरून त्याची तयारी कळली. तेव्हां तो महात्मा म्हणाला, 'प्यारे! तूं असा उदास व उद्विग्न कां?' ह्या शब्दांनीं धन्नाजींचें अंतःकरण लोहचुंबकप्रमाणें आकर्षून घेतलें. व लागलीच त्यांनीं 'शाधि मां त्वां प्रपन्नम्' असें म्हणून त्या महात्म्याचे पाय धरिले, व म्हणाले, 'महाराज! बाह्य सुख साधनें मला अनकूल आहेत; परंतु, **मनाला शांति नाहीं**. या करितां तेवढा कृपाप्रसाद द्या.' ही त्याची अंतःकरणापासून निघालेली आत्मज्ञानाची कळकळ पाहून 'मृदूनि कुसुमादपि' असें त्या महात्म्याचें अंतःकरण चटकन् द्रवलें. लागलाच त्यानें वरद हस्त त्यांच्या मस्तकीं ठेवून 'बेटा, **आत्मकेंद्रांत स्थिर राहण्याचा प्रयत्न कर. म्हणजे चित्त स्वास्थ लाभेल.**' असें सांगितलें. चमत्कार असा झाला कीं, धन्नाजी आसन घालून बसले व त्यांनीं ध्यान लाविलें, लागलीच त्यांची वृत्ति स्वरूपाकार बनली! ह्या स्थितींत ते चार तासपर्यंत होते. दरम्यान् तो महात्मा तेथून गेला. धन्नाजी देहभानावर येऊन पहातात तों महात्मा नसल्याचें त्यांना आढळलें. शोधांतीं तो गेल्याचें समजलें. तेव्हां त्यांना थोडेसें वाईट वाटलें. परंतु दृढ विश्वास ही दांडगी चीज त्यांच्याजवळ होती. यामुळें चित्त एकाग्र करण्याचा, ध्यानाचा अभ्यास त्यांनीं तसाच चालू ठेविला. ह्या अभ्यासांत कांहीं दिवस लोटल्यावर पुनः त्याच महात्म्याचें त्यांना दर्शन झालें. या महात्म्याबरोबर ते लागलेच अरण्यांत गेले. व तेथेंही हाच अभ्यास अधिकाधिक करूं लागले.

जसा जसा अभ्यास अधिकाधिक वाढूं लागला, तसतशी त्यांची वृत्ति अधिकाधिक रंगू लागली, बहिर्मुखता नाहींशी झाली, आणि यामुळें मन शांत, स्थिर व समाधानी बनलें! पुढें त्याच महात्म्याच्या प्रसादानें व यांच्या अभ्यासानें धन्नाजींना वाचिक व मानसिक सिद्धि प्राप्त झाल्या असें सांगतात, व त्याची फळेंही लोकांस दिसूं लागलीं. तथापि आत्मज्ञानाचें सूत

झालेला धन्नाराम त्या सर्व सिद्धींना आपल्या बडाईकरितां, कीर्तिकरितां, अगर स्वहिताकरितां उपयोगांत आणीत नसे. तेव्हांपासून **भगत् धन्नारामाची** कीर्ति वाऱ्यासारखी चोहोंकडे पसरली. याच सुमारास ते गुजरांवाळा येथें येऊन राहिले होते व तीर्थरामालाही शिक्षणाकरितां येथें आणण्याची जरूरी हिरानंदजींना वाटूं लागली होती.

**हिरानंद व भगतजी** यांचा चांगला परिचय होता. यामुळें **तीर्थरामाला भगतजींच्या देखरेखीखालीं हिरानंदजींनें** ठेविलें. तीर्थरामाच्या भावी उत्कर्षाचीं बींजें जर केव्हां व कोणी रुजत घातलीं असतील किंवा तीर्थरामाच्या पूर्वसंस्काराचीं कपाटें खोलण्याचें काम जर कोणी, केव्हां केलें असेल तर तें **भगतजींनीं** याच वेळीं करण्यास प्रारंभ केला.

या काळांत **भगतजींचा 'योगवासिष्ठ'** नित्यनियमानें वाचण्याचा व त्यावर प्रवचन करण्याचा क्रम असे. वेदान्तासारखा गहन विषय भगतजी इतक्या प्रेमळपणाने सांगत कीं, त्यांचें प्रवचन ऐकण्यास जमणारा श्रोतृसमुदाय अगदीं तल्लीन होऊन जाई. या वेळीं **तीर्थरामही** नित्यनियमानें प्रवचन श्रवणास मोठ्या आवडीनें बसे. शिवाय अभ्यासाव्यतिरिक्त सर्व वेळही तो भगतजींच्या सहवासांतच घालवी. भगतजींचें प्रेमळ प्रतिपादन, त्यांचें सान्निध्य व उपदेश, तसेंच त्यांची वाचासिद्धि ह्या सर्वांचा तीर्थरामाच्या कोमल अंतःकरणावर इतका अद्भुत परिणाम झाला कीं, भगतजींना तीर्थराम प्रत्यक्ष परमेश्वर मानूं लागला. त्यांची भक्तिपुरःसर सेवा हाच त्याच्या आवडीचा विषय झाला व त्यांच्या आज्ञेशिवाय त्याचें पाऊलही उठेनासें झालें. **आकर्षण परस्परानुबंधी असतें**. जसें **भगतजींनीं तीर्थरामाचें** मन आकर्षून घेतलें तसें श्रद्धा, भक्ति, व सेवा यांच्याद्वारें त्यांचें अंतःकरण तीर्थरामानें ओढून घेतलें. अखेरीस त्याच्यावरील भगतजींचा प्रेमा इतका वाढला कीं त्याच्याशिवाय त्यांना क्षणभरही चैन पडेना.

येथें ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, **भगतजी अन्य** जातीचे व तांबटाचा धंदा करणारे असूनसुद्धां स्वामी **तीर्थरामाला** ते मोठे सत्पुरुष वाटत. **स्वामीरामतीर्थ** मोठे व विद्वान् झाल्यावरही भिन्न

जातित्वामुळें त्यांच्याबद्दलच्या आदरबुद्धींत प्रथम किंवा नंतर यत्किंचितही फरक झाला नाहीं असें त्यांच्या पत्रांवरून स्पष्ट दिसतें. गृहस्थाश्रमांत असतांना **स्वामी** त्यांना 'भगवन्' म्हणून संबोधित. व स्वामी झाल्यावर, अर्थात् पूर्ण अद्वैती बनल्यावर 'एकमेवा द्वितीयं' चा अनुभव आल्यावरही स्वामींच्या मनांतील पूज्यबुद्धि कायम होती.

या पुढील काळांत **भगतजी** व स्वामी ह्यांचा संबंध इतका वाढला कीं, स्वामी बहुतेक दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं त्यांना पत्र लिहीत. अगदीं अखेरचें पत्र समाधीच्या पूर्वी दोन महिने लिहिलेलें आहे. त्यांतही 'हुजूरचें अंतः-करण' हा स्वामींचा पत्ता आहे. यावरून भगतजींबद्दलचा स्वामींचा आदर व अद्वैत किती होतें हें उघड उघड दिसतें.

भगतजी सध्यां सुमारें ऐशीं वर्षांचे असूनही त्यांची प्रकृति अद्यापि सुदृढ आहे. ते आपलीं कामें स्वतः करितात. स्वतः नैष्ठिक ब्रह्मचारी असल्यामुळें त्यांचा स्वतःचा असा परिवार मुळींच नाहीं. तथापि नात्यागोत्यांतील कांहीं विद्यार्थ्यांना विद्यार्जनाच्या कामीं मदत करण्याच्या हेतूनें त्यांनीं आपल्याजवळ बाळगिलें आहे. त्यांचीं भक्तमंडळीही बरीच असून ती त्यांस सर्व प्रकारें मदत करिते, ते सध्यां गुजराणवाला येथें पुराणी मंडींत राहतात.

ज्यानें प्रत्यक्ष पित्यापेक्षां अधिक कळवळयानें व प्रेमानें स्वामींना वागविलें, अशा सद्गुरूचें शिष्यत्व अथवा अशा पालकाची देखरेख ज्याला लाभली तो महद्भाग्याचाच म्हटला पाहिजे. भगतजीसंबंधानें **नारायण** स्वामी (रामतीर्थांचे पट्टशिष्य) पुढील आशयाचे उद्गार काढितात.

"ज्यांच्या कृपाप्रसादानें **तीर्थराम** जगविख्यात झाला तो धन्य आहे! धन्य ते **भगतजी**! कीं, ज्यांचें भाग्य **तीर्थरामाचे** पालक व शिक्षक होण्याचें होतें!! ज्यानें हा संसारसागर तरून जाण्याला हजारों जीवांना मदत केली, अशा **स्वामी रामतीर्थांचे** गुरु होण्याचें भाग्य ज्याला लाभलें तो त्रिवार धन्य आहे."

स्वामी रामतीर्थांनीं तर याहीपेक्षां बहार केली आहे. ते गुरुस्तुतींत म्हणतात.

( राग—सोहनी ).

जो दिलको[1] तुमपर[2] मिटा चुके[3] है,<br>
मजाके[4] उल्फत उठा चुके है।<br>
वह[6] अपनी[7] हस्ती[8] मिटा चुके है,<br>
खुदाको खुदहीमें पा[9] चुके है ॥ १ ॥

न सूये-काबा[10] झुकाते है सरें[11],<br>
न जाते है बुतकदोंके[12] दरपर[13]।<br>
उन्हें[14] है दैरो-हरम[15] बराबर[16],<br>
जो तुमको किबला[17] बना चुके हैं ॥ २ ॥

न हमसे प्यारे ! छुडाओ दामां[18],<br>
न देखो बागे-बहारो-रिजवा[19]।<br>
कब[20] उनको प्यारे, हैं हूरो-गिलमा[21],<br>
जो तुमको प्यारा बना चुके है ॥ ३ ॥

सुना[22] रही है यह दिलकी मस्ती,<br>
मिटाके अपना वजूदे-हस्ती[23]।<br>
मरें गे यारो ! तालब[24] में हककी[25],<br>
जो नामे-तालिब[26] लिखा चुके हैं ॥ ४ ॥

---

१ अंतःकरणाला. २ तुझ्यावर. ३ सोंपविलें आहे. ४ आस्वाद, आनंद. ५ मिळून चुकला, प्राप्त झाला आहे. ६ तो. ७ आपलें-लीं. ८ जीवन, स्थिति. ९ मिळविलें. १० ईश्वराच्या घराकडे. ( काबा—ईश्वराचें घर. मक्केच्या मशिदींतील मुख्य स्थान ). ११ डोकें, मस्तक. १२ मंदिराच्या. १३ द्वारावर. १४ त्यांना. १५ मंदीर व मशीद. १६ सारखीं. १७ इष्टदेव. १८ दूरपण, पल्ला. १९ स्वर्ग. २० केव्हां. २१ अप्सरा आणि दास ( हिजडे आणि कंचुकी ) २२ ऐकत. २३ जीवन अथवा प्राणाची स्थिति. देहभाव. २४ जिज्ञासेमध्यें. २५ सत्यस्वरूपाच्या. २६ जिज्ञासूचें नांव.

न बोल सकते थे कुछ ज़ुबांसे,
न याद उनको है जिस्मो-जां से ।
गुज़र गये हैं वह हर मकांसे,
जो उसके कूंचेमें आ चुके हैं ॥ ५ ॥
गर और अपना भला जो चाहे,
यह राम अपनेसे कह सुना ओ ।
भला रखो या बुरा बना ओ,
तुम्हारे अब हम कहा चुके हैं ॥ ६ ॥

वरील कवितेचें रूपांतर—
( चाल—भजति जे अनन्य नर मातें ).

अर्पिले प्राण नरें तुजला । प्रेमसागरी मज्जन करण्या अवसर ये त्याला ॥ १ ॥
सांपडे परमेश्वर त्याला । अहंकार निजठायीं ज्याचा विरघळूनी गेला ॥ २ ॥
ईश्वर-मंदिर नच रुचतें । देवद्वारीं, धरणें धरूनी, बसणेंहि न सुचतें ॥ ३ ॥
दैवत इष्ट तुला मानीं । मंदिर अथवा मशीद त्याला सारखींच दोन्ही ॥ ४ ॥
लाडके, दूर नको ढकलूं। स्वर्गादिक मज भोग न रुचती हृदय किती उकलूं॥५॥
अप्सरा काय करायाच्या? । ज्याच्या वृत्ती, प्यारे, सर्वहि तुला वहायाच्या॥६॥
बुडुनियां स्वानंदीं गर्क । आपलेपणासवें लोपले सकळहि मम तर्क ॥ ७ ॥
मृत्युला मी आलिंगीन । आत्मरूप जिज्ञासा-निर्झर हुडकुन काढीन ॥ ८ ॥
प्राण-तनु धर्म विसर पडला । वाग्देवीच्या व्यवहारानें हरताळचि घडला ॥ ९॥
गुरूच्या झाला स्वाधीन । नष्ट जाहलें त्याच्यापासुनि याचें भिन्नपण ॥ १० ॥
म्हणुनि हा राम तुला सांगे । चरणांजवळी तुझ्या मागणें गुरो, एक मागे॥११॥
आपला मजला तूं म्हणसी । शुभाशुभाची मज नच पर्वा अनुसर इच्छेसी॥१२॥
यापेक्षां आम्हीं अधिक काय लिहावें ?

---

१ बोलूं शकला नाहीं. २ वाणीनें. ३ आठवण. ४ देह प्राणादिकांची. ५ गेले. ६ ठिकाणाहून. ७ कबरींत, टापूमध्यें. ८ अथवा. ९ आणि. १० इच्छा करितो. ११ वाईट, अनिष्ट.

## प्रकरण ३ रें.



### स्वामींचा ब्रह्मचर्याश्रम अथवा विद्यार्थी दशा.

**स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्य देवो भव ॥**

(तै. उ. १।१०।३-७).

आपल्या धर्मामध्यें समाजधारणेचा सर्वोत्कृष्ट उपाय म्हणजे चातुर्वर्ण्य रचना हा होय. परिस्थित्यनुरूप योग्य ते फेरफार करून, समाज सुस्थितींत राखण्यास ही रचना हाच एक रामबाण उपाय आहे. ही गोष्ट पश्चिमेकडील व पूर्वेकडील राष्ट्रांतील समाजशास्त्रांचा अभ्यास करणारास पटल्याशिवाय राहणार नाहीं. या रचनेला चार आश्रमांची जोड दिलेली आहे. आणि या चार आश्रमांचा पाया ' ब्रह्मचर्या ' वर रचिलेला आहे. ' जीवेम शरदः शतम् ' ही जी कलियुगांतील मानवी आयुर्मर्यादा तिचा अढळ आधार ' ब्रह्मचर्य ' हाच आहे. शारीरविज्ञानशास्त्रदृष्टया विचार केला असतां जीवित सुखमय होण्याला ' ब्रह्मचर्य पालन ' हाच एक उपाय आहे, असें प्रत्ययास येतें. अशा या ब्रह्मचर्याचें महत्व व अर्थ काय आहे याचा थोडका विचार करून हातांतील विषयाकडे वळूं.

#### महत्व.

' मा मृत्योः उदगात् वशम् ।' पुरुष, अतः उत्क्रम् । मा अवपत्था । मृत्योः षड्वीशं अवमुंचमानः ।' अशा प्रकारचा जो पौरुषोपदेश वेदांमध्यें केलेला आहे, तो ब्रह्मचर्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही आधारावर करितां येणें शक्य नाहीं, कारण—

**ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमुपाघ्नत ।**
**इंद्रो ह ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्वराभरत् ॥**

(अथर्व. ११।७।१९)

---

१ मृत्यूच्या अधीन होऊं नकोस. हे पुरुषा, या अवस्थेमधून ऊठ, अव-नत होऊं नकोस आणि मृत्यूचे पाश तोड.'

'ब्रह्मचर्याच्या तपानें देवांनीं मृत्यूला दूर हटविलें. देवांचें तेज इंद्र खात्रीनें ब्रह्मचर्याच्या द्वारानेंच वृद्धिंगत करितो.'. सारांश, ब्रह्मचर्याचें पालन करणारा मनुष्य मृत्यूला दूर सारून तेजस्वी बनतो. याचीं उदाहरणें वेदकालीन, पुराण-कालीन, आणि ऐतिहासिक वाङ्मयामध्यें भरपूर आहेत. चार आश्रमांची उपपत्ति वेद–कालापासून असल्यानें 'ब्रह्मचर्याची धुंद' वैदिक वाङ्मयांत इतकी आहे कीं, मंत्रद्रष्ट्या ऋषींना सर्वत्र ब्रह्मचर्यच ब्रह्मचर्य दिसे.

याचा मासला म्हणूनः—

( १ ) 'औषधयो भूतभव्यमहोरात्रे वनस्पतिः ।
संवत्सरः सहर्तुभिस्ते जाता ब्रह्मचारिणः ॥

( अथर्व ११।७. )

**अर्थः**—औषधी, वनस्पती, संवत्सर, अहोरात्र, भूत वर्तमान व भविष्य-काल हे सर्व ब्रह्मचारी आहेत. कारण ते **ऋतुगामी आहेत.**

( २ ) अभिक्रंदन् स्तनयन्नरुण शितिगो बृहच्छेपोऽनुभूमौजभार ॥
ब्रह्मचारी सिंचति सानौ रेतः पृथिव्यां तेन जीवंति प्रदिशश्चतस्रः ।

( अथर्व. ११।५।१२ )

**अर्थः**—मोठी गर्जना करणारा काळा व भुऱ्या रंगाचा मेघ पृथ्वीमध्यें पुष्कळ वीर्य भरून देतो. हा संचारी मेघ पृथ्वीवर व पहाडावर जलरूप वीर्याचें सिंचन करितो आणि त्या योगानें चारी दिग्भाग जिवंत राहतात.

( ३ ) पार्थिवा दिव्याः पशव आरण्याग्राम्याश्चये ।
अपक्षा पक्षिणश्च ये ते जाता ब्रह्मचारिणः ॥ '

( अथर्व. ११।५।२१ )

**अर्थः**—पृथ्वी, अरण्य, व गांव यांतील पशु, त्याचप्रमाणें पंख नसणारे व आकाशांत संचार करणारे पक्षी हे सर्व ब्रह्मचारी आहेत.

असे आणखी बरेच उतारे देतां येतील. या सर्व उताऱ्यांचें मनन केल्यास त्यांतील अर्थ किती गूढ व निरीक्षण किती सूक्ष्म आहे याचें प्रत्यंतर येईल.

हे सर्व उतारे देण्याचें कारण एवढेंच कीं, वेदांनीं ज्या ब्रह्मचर्याचे इतके गोडवे गाइले व ज्याचा एवढा ' देव ' बनविला, तें कांहीं तरी थोतांड उभें करण्याच्या मिषानें नसून मनुष्येतर सर्व सृष्टीचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यांतील सार काढण्याच्या हेतूनें होय. सृष्टीमधील औषधी, वनस्पति, संवत्सर, वृक्ष, मेघ, सूर्य, पशुपक्षी वगैरे सर्व सृष्ट पदार्थांचें जीवितरहस्य ' ब्रह्मचर्यामध्यें सांठविलेलें आहे, हें पाहून तरी—

[ १ ] निसर्गाला अनुसरून वागणें हा प्राणिमात्राचा धर्म आहे. आणि

[ २ ] सर्व सृष्ट पदार्थांमध्यें मनुष्यप्राणी ही श्रेष्ठ वस्तु आहे. **या दोन कारणांकरितां मनुष्यानें ब्रह्मचारी असणें हेंच श्रेष्ठ, हेंच त्याचें कर्तव्य आणि हाच त्याचा धर्म आहे,** हा सिद्धांत पटविण्याच्या इराद्यानें ' **वैदिक धर्माची** ' शिकवण असल्यानें त्यांत ब्रह्मचर्याची इतकी धुंद ' असावी हें अगदीं साहाजिकच आवे.

## ब्रह्मचर्याचा अर्थ व त्याचा शिक्षणाशीं संबंध.

" ब्रह्मचर्य या शब्दाचे अनेक अर्थ आहेत ते असेः—

( १ ) ब्रह्म अर्थात् मोठें होण्याकरितां योग्य आचरण करणें.

( २ ) ईश्वराच्या बरोबर राहणें; आस्तिक्य धारण करणें.

( ३ ) ज्ञानानुकूल व्यवहार करणें.

( ४ ) सत्यनिष्ठ होणें.

( ५ ) आत्म्याबरोबर राहणें.

( ६ ) वीर्यरक्षा व नियमानुकूल आचरण. "

( श्री. दा. सातवळेकर. 'वैदिक धर्म' )

यावरून ' ब्रह्मचर्य ' या शब्दामध्यें सर्व शुभ नियमांचा अंतर्भाव होतो हें सिद्ध आहे. 'ब्रह्मचर्य' या शब्दाच्या सर्व अर्थांकडे पाहिल्यास ब्रह्मचर्याचा संबंध शिक्षणाशीं येतो एवढेंच नसून तें शिक्षणाकरितां आवश्यक आहे असें उघडपणें दिसतें. शिवाय शारीरविज्ञानशास्त्राचा असा एक सिद्धांत आहे कीं, मनुष्याच्या मेंदूची वाढ वयाच्या चोविसाव्या वर्षापर्यंत पूर्ण होते. आती

ओली असतांनाच तिला आकार देणें हेंच जसें सोपें व योग्य; त्याचप्रमाणें मेंदूची वाढ पूर्ण होण्यापूर्वीच त्याच्या आर्द्रावस्थेंत त्याच्यावर इष्ट ते संस्कार घडवून त्याला आकार देणें हेंच योग्य व निसर्गाला अनुरूप आहे. यास्तव जेणेंकरून ब्रह्मचर्याचा यत्किंचितही विघात होईल अशी परिस्थिति विद्यार्थ्यांचा शिक्षणक्रम पूर्ण होई तोंपर्यंत तरी नसावी हेंच इष्ट. हें इष्टसिद्धीचें ध्येय पुढे ठेऊन जुनी शिक्षणपद्धति ठरविलेली होती. व त्यावर सरकारी ताबाही ( state control ) तितकाच होता. **तेव्हां सरकार शिक्षणाकरितां होतें.** यामुळें त्याचे सुपरिणामही कांहीं और होते. याचा अर्थ शिक्षणावर सरकारी ताबा मुळींच नको असा नसून तो वरील ध्येयाच्या आड येईल इतका नसावा, असा आहे. अमेरिकेसारख्या स्वातंत्र्यप्रिय व पुढारी अशा राष्ट्रामध्येंसुद्धां राष्ट्रीय मनाच्या उच्च संस्कृतीच्या आड येईल इतका सरकारी ताबा शिक्षणावर नसावा असेंच मत आहे. **सारांश, पालकाचा ताबा, सरकारी ताबा, आणि परिस्थिति ( surroundings ) हीं सर्व विद्यार्थ्यांच्या ब्रह्मचर्यविषयक संस्कारांना व वाढीला पोषक असावीं. शोषक नसावीं.** परंतु खेदाची गोष्ट ही की, पाश्चात्य सुधारणांचीं व शिक्षणाचीं गोड गोड फळें चाखावयास मिळावीं ह्या स्तुत्य ( ? ) हेतूने सुरू केलेल्या बेंटिंगसाहेबांच्या सुधारणांपासून सर्वच कांहीं उलट झालें. ब्रह्मचर्याचें वायुमंडलही उत्पन्न होऊं शकेनासें झालें. यास्तव ब्रह्मचर्यपालनांत सुद्धां काठिण्य उत्पन्न झालें सर्वत्र ब्रह्मचर्य घातकभाव वृद्धि पावूं लागलें; व दुर्व्यसनें वाढूं लागलीं. नानाप्रकारच्या चोष्य, लेह्य, खाद्य आणि पेय पदार्थांचें सेवन सभ्यतेचें निदर्शक म्हणून समाजामध्यें रूढ झालें; भोगवृत्ति वर्धमान होत आहे; त्यागभाव न्यून होवूं लागला आहे, साधेपणा नाहींसा झाला, ईर्ष्याद्वेष वाढूं लागून संयम कमी होऊं लागला, आणि सर्व जगांत शांतीचें वातावरण कमी होऊन परस्परांमधील स्पर्धेचे विचार, त्याचप्रमणें अन्योन्यांचें अधःपतन करणाऱ्या भावना प्रसृत होऊं लागल्या आहेत. **एकंदरींत बहिर्मुखता वाढून अंतर्मुखता नष्ट होत चालली आहे.** त्यामुळें ब्रह्मचर्याचें वायुमंडल उत्पन्न करणें हें मोठें दुष्कर कर्म झालें आहे ! या सर्व परिस्थितीचें उपादान कारण वैदिकधर्माच्या गैरसमजांत, अविचारयुक्त सामाजिक

परिवर्तनांत, राजकीय पारतंत्र्यांत आणि निव्वळ वढत्या बोलकेपणांत आहे, असें दिसल्याशिवाय रहाणार नाहीं. **व्यक्तीचे नैसर्गिक हक्क संपुष्टांत आले, पालकत्वाच्या जबाबदारीला फांटा मिळाला, आचार शीलत्वाचा अभाव झाला, म्हणजे ब्रह्मचर्य' राखणें कां कठीण होणार नाहीं?** अथर्वण वेदांतील वर उल्लेखिलेल्या 'ब्रह्मचर्य सूक्तांत,' 'राष्ट्रांतील अध्यापकवर्ग ब्रह्मचर्य युक्त पाहिजे; त्याचप्रमाणें क्षत्रियही ब्रह्मचारी पाहिजेत. कारण राजा आपल्या शासनप्रबंधांच्याद्वारें लोकांकडून ब्रह्मचर्याचें पालन करवितो व राष्ट्राची रक्षा करितो." असें म्हटले आहे. पण हल्लीतर तशी स्थिति नाहीच, परंतु सर्व प्रकार याच्या उलट आहे.

## दुय्यम शिक्षण.

परंतु **तीर्थरामाच्या** सुदैवानें, भरतभूमीच्या उद्धाराकरितां आणि जगताच्या कल्याणाकरितां '**रामाची**' ब्रह्मचर्यविषयक परिस्थिति चांगली होती! मागें सांगितल्याप्रमाणें मुरालीवाल्याचें शिक्षण संपल्यामुळें अर्थातच **तीर्थरामा**ला आपल्या बापाबरोबर **गुजराणवाला** येथें यावें लागलें. यावेळीं त्याचें वय फक्त दहा वर्षांचें होतें. या वयांत त्याला चांगल्याच पालकाच्या हवालीं करणें इष्ट होतें. याकरितां **हिरानंदानें** मागें उल्लेखिलेल्या '**धन्ना भगत**' नांवाच्या आपल्या मित्राच्या देखरेखीखालीं आपल्या मुलाला ठेविलें.

या ठिकाणीं तीर्थरामाची वागणूक व त्याच्या पालकाची देखरेख हीं कशीं होतीं याचें वर्णन मागील प्रकरणांत आलेंच आहे. येथें आल्यावर **तीर्थरामाला** इंग्रजीच्या खास वर्गात दाखल करण्यांत आलें. यामुळें तो आपल्या हुषारीनें दोन अडीच वर्षांत 'मिडलस्कूल'मधील शिक्षणक्रम संपवून बाहेर पडला. तेव्हां लागलाच त्याचा 'हायस्कुला'मध्यें प्रवेश झाला. आणि अशा रीतीनें **तीर्थराम** इ. स. १८८८ मध्यें वयाच्या सुमारें पंधराव्या वर्षी प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाला. **तीर्थराम** या परीक्षेंत आपल्या शाळेंतील सर्व मुलांमध्यें पहिला आला होता, व विश्वविद्यालयाच्या सर्व मुलांमध्यें अडतिसावा आला होता. हें सर्व फळ कशाचें? तर एकांत, दीर्घपरिश्रम, व पालकाची योग्य देखरेख यांचेंच होय.

या त्याच्या कर्तबगारीमुळें तेथील ' म्युनिसिपालिटीनें ' त्याला लहानशी मासिक शिष्यवृत्ति देऊन उत्तेजन दिलें. यास्तव अर्थातच विश्वविद्यालयीन शिक्षण घेण्याच्या त्याच्या इच्छेला प्रोत्साहन मिळालें. परंतु या प्रोत्साहनावर विरजण घालणारे दोन संकटांचे डोंगर त्याच्यापुढें होते.

(१) एकतर घरची अगदीं गरिबी. त्यांत त्याचें लग्न झालेलें. यामुळें घरीं खाणारीं तोंडें जास्त व मिळविणारा हात एकटा. ह्मणून आपल्या मुलानें पुढच्या शिक्षणाची हांव सोडून देऊन कांहींतरी पोटाचा उद्योग करावा असें **हिरानंदाला** वाटणें साहजिकच होते. व त्याप्रमाणें त्याला **हिरानंदानें** तसें बजावून सांगितलेंही.

(२) दुसरी अडचण ह्मटली ह्मणजे पुढच्या शिक्षणाला लागणाऱ्या खर्चाची. त्या खर्चाच्या मानानें मिळणारी शिष्यवृत्ति अगदीं अपुरी होती. शिवाय घराहून एक पै देखील मिळण्याची आशा नव्हती.

दुर्दैवानें आज तागाइतही होतकरू तरुणांच्या शिक्षणाच्या मार्गांत वर सांगितलेले अडथळे हरहमेश असतात. असे उमेद खचविणारे अडचणींचे पहाड वाटेंत असतांनाहि **तीर्थरामानें** वडिलांची आज्ञा मोडून पुढच्या शिक्षणाकरितां लाहोरास जाण्याचें ठरविलें ! ह्या **तीर्थरामाच्या** आज्ञाभंगाला कोणीही स्तुत्य असेंच ह्मणेल. कारण तो औधत्त्यानें केलेला नव्हता. **तीर्थरामाच्या** या मानसिक चिकाटीचें श्रेय त्याला शिक्षण देऊन आपल्या आचरणाचें उदाहरण पुढें ठेवून ज्यांनीं त्याचें शील बनविलें, त्या **धन्नाजीलाच** देणें भाग आहे. कारण **तीर्थराम** हा नेहमीं आपला अभ्यास करून राहिलेला वेळ त्यांच्या निकट सहवासांत घालवी. याच काळांत तो ' **योगवासिष्ठांतील** ' परमार्थ ऐके व धन्नाजींची तनुमनधनानें सेवा करी. तसेंच तो त्यांना इतका मान देई कीं, आपलें कोणतेंही काम तो त्यांना विचारल्याशिवाय करीत नसे. ही त्याची श्रद्धा, भक्ति, व सेवा पाहून भगतजी इतके प्रसन्न झाले कीं, ते त्याला आपला प्राणच मानूं लागले. या प्रसंगीं रामकृष्ण व विवेकानंद या गुरुशिष्यांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. **तीर्थरामाच्या** मनांत भगतजींसंबंधानें आदर व प्रेम किती वसत होतीं तें, आणि त्याचप्रमाणें

त्याची मानसिक शिक्षणांतील प्रगति किती झाली होती हेंही पुढील पत्रावरून दिसेल.

"लाहोर, २३ जुलै १८८९

' प्रिय गुरूजी व स्वामी महाराज,

आज आपलीं आणखी दोन पत्रें मिळालीं. मी मोठा पापी व अपराधी आहें. म्हणून माझी मनःशुद्धी करा. माझ्याकरितां सर्व कांहीं करणारे आपणच अहां. आपण मला वडिलांप्रमाणें व भावाप्रमाणें असून माझे सर्व नात गोत आपणच अहांत. **कारण लहानांचे अपराध पोटांत घालून त्यांना पदरांत घेणें हें काम वडील माणसें करितातच.** मनुष्य हा स्खलनशील आहे. शिवाय मी आपला नम्रसेवक असून आपली आज्ञा मला प्रमाण आहे.

आपला तीर्थराम."

तारुण्याच्या प्रारंभाला इतकी नम्रता, इतकें सरळ व आर्जवी मन, वडील मनुष्यांविषयीं आदर व गुरूविषयीं उत्कट प्रेम व आदर ही मनोरचना निव्वळ गरिबीमुळें प्राप्त होणारी नाहीं हें खास. **धन्नाजींच्या** लोण्याहून मऊ व प्रेमळ मनाचा आणि आचारशीलतेचाच हा परिणाम असला पाहिजे हें खास.

## विश्वविद्यालयीन शिक्षण.

वर सांगितल्याप्रमाणें **तीर्थराम** धन्नाजींच्या प्रोत्साहनानें व स्वतःच्या धमकीनें वडिलांच्या इच्छेविरुद्ध शिक्षण संपादन करण्याकरितां अखेरीस सज्ज झाला, हें पाहून **हिरानंदजींनीं** लगेच त्याला घरांतून हांकून दिलें व मदत न करण्याचा निश्चय त्याला कळविला. याप्रमाणें केवळ ईश्वरावर व **धन्नाजींवर** पूर्ण विश्वास ठेवून असहाय स्थितींत **तीर्थराम** घराबाहेर पडला व **लाहोरास** येऊन दाखल झाला.

**लाहोरास** आल्यावर त्यानें आपलें नांव ' फोरमन ख्रिश्चन कॉलेजामध्यें ' दाखल केलें. आणि दोन वर्षेंपर्यंत फार झटून अभ्यास केला. या काळांत आपला खर्च भागविण्याकरितां **तीर्थरामानें** एक दोन शिकवण्याही धरिल्या

होत्या. विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, या परिक्षेंत रामानें फारशीच्या ऐवजीं 'संस्कृत'ही दुसरी भाषा घेतली होती. एकतर दुबळें शरीर, त्यांत खर्चाची अडचण भागविण्याकरितां शिकवण्या कराव्या लागत, आणि एवढें करून हा कालपावेतों ज्या भाषेचें एक अक्षर देखिल पाहिलें व उच्चारिलें नव्हतें ती भाषा परिक्षेला घेतलेली होती ! इतकी काठिण्याची परिस्थिती असूनसुद्धां धन्यतेची गोष्ट ही कीं, परिक्षेंत रामाचा नंबर पहिला आला व त्यामुळें त्याला पूर्वीपेक्षां मोठी शिष्यवृत्ती मिळाली ! यावेळीं त्याला वाटलेल्या आनंदाची कल्पना त्याच्या–सारख्या स्थितीत असलेल्या विद्यार्थ्यांनांच पूर्णपणें व त्वरित येईल. परीक्षेंत मिळालेल्या या यशानें तो फुगून तर गेलाच नाहीं, पण ईश्वर व धन्नाजी यांजवरील श्रद्धा आणि आत्मविश्वास हीं मात्र द्विगुणित झालीं.

परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर पुढील दोन वर्षांचा बी. ए. चा अभ्यासक्रम चालू झाला. **आयुष्याचा भविष्यत्काल सूर्यप्रकाशासारखा उज्ज्वल व्हावयाचा असल्यास त्याचा पूर्वकाल संकटपरंपरेनें युक्त असून त्या परंपरेच्या कसोटीला तो पूर्णपणें उतरून शंभर नंबरी ठरावा लागतो, असाच अनुभव महात्म्यांच्या चरित्राकडे पाहिल्यास येतो.**

## खऱ्या कसोटीचा काळ.

उपरिनिर्दिष्ट रीतीनें मोठी शिष्यवृत्ति मिळूं लागल्यामुळें तीर्थरामाला थोडी आर्थिक सुखाची आशा दिसूं लागली. परंतु तो कठिण परिस्थितीच्या कसोटीला पूर्णपणें उतरलेला नसल्यामुळें 'आघातीं उपजे धारिष्ट' अशा प्रकारचें 'श्रेष्ठ धारिष्ट' रामाच्या मनांत येण्यास कठिणतर परिस्थिति येणें जरूर होतें. तीर्थरामानें दोन वर्षें आपल्या मदतीशिवाय काढिलीं; शिवाय त्याला पूर्वीपेक्षां मोठी शिष्यवृत्ति मिळाली, हें सर्व वर्तमान त्याच्या वडिलांना समजल्यावर त्यांनीं रामाच्या पत्नीला लाहोरास पाठविलें. याच वेळीं तिला रामाजवळ पाठविलें नसतें तर चाललें असतें. परंतु शिक्षणाचा नाद सोडून त्यानें पोटापाण्याच्या उद्योगास लागावें हा हेतु साध्य करण्यासाठीं

त्याच्या वडिलांनीं हा उद्योग केला होता. आतां तरी संसाराचा भार अंगावर पडल्यावर **रामाचें** मन फिरेल असें त्याच्या वडिलांना वाटलें होतें. परंतु रामाचें मनोधैर्य केवढें दांडगें होतें याची त्यांना कल्पना नसावी असें वाटतें. म्हणून हा उपद्व्याप त्यांनीं केला. **मानसिक धैर्य व ज्ञानलालसा हे दोन गुण तीर्थरामाच्या ठिकाणीं या वयांत साधारण प्रमाणांत वसत होते.** यामुळे त्याचें मन यावेळीं कचरले नाहीं. पण उलट त्याच्या वडिलांची युक्ति मात्र फसली. पुढे सुमारें वर्षभरानें **हिरानंदांनीं** आपली सून परत घरीं आणिली.

या कालांत **रामाच्या** शिष्यवृत्तीवर घरभाडें, पुस्तकांचा खर्च, फी, आणि संसाराचा खर्च इतके तगादे होते. हे सर्व खर्च रामानें कसे भागविले ती हकीगत तारीफ करण्याजोगीच असल्यामुळे व एतद्कालीन **रामाच्या** रहाणीपासून आधुनिक विद्यार्थी वर्गाला बराच बोध घेण्याजोगा आहे असें वाटल्यावरून ती थोडक्यांत पुढें दिली आहे.

‘ एका महिन्याला अभ्यासाचीं पुस्तकें विकत घेण्यांतच **रामाची** बहुतेक शिष्यवृत्ति खर्च झाली. यामुळे त्याच्याजवळ जे पैसे शिल्लक राहिले ते इतके थोडे होते कीं, दररोज ९ पै प्रमाणेच खर्च करून त्याला तो महिना काढावा लागला !’ एकदां तर याहीपेक्षां कठिण प्रसंग आला व त्याला माल देणाऱ्या दुकानदारानें पैशाविषयीं विचारल्यामुळें तर त्याचे पैसे देऊन राहिलेल्या पैशांतून खर्च भागविण्यांकरितां **राम** दिवसांतून एक वेळच जेवूं लागला ! ! **कधीं कधीं तर दिव्याला लागणारें तेल आणण्याकरितां तो सबंध दिवस उपाशीं राही ! ! ! किती हें दैन्य, त्रास आणि दुःखें ! ! ! अशा स्थितींत त्याला कधीं कधीं वाईट वाटे; पण लागलाच तो असा विचार करी कीं, “ रस्त्यावर भीक मागणारे भिकारी अशा दुःखांत आपली गुजराण करितातच ना. मग मी केली म्हणून काय झालें ? ईश्वर माझी परीक्षा पहात आहे. व मला तर त्याच्या परीक्षेंत उतरावयाचें आहे ! ” केवढा हा निश्चय व सहनशक्ति आणि समाधान मानण्याची किती नामी युक्ति ही !**

## रामाचा पोशाख.

उपरिनिर्दिष्ट परिस्थितीत रामाचा पोषाख कसा असावा याचा अंदाज बांधितां येतो. तथापि या त्याच्या रहाणीपासूनही पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. त्याच्या आंगांत एक खमीस असून, दोन पायजमे, एक हलका गांवठी फेटा, व पायांत गांवठी जोडे असा कपड्यालत्याचा अघळ पघळ सांठा त्याच्याजवळ असून त्याची किंमतही तितकीच मोठी म्हणजे सुमारें तीन रुपये होती. बी. ए. च्या वर्गात असतांना त्याच्या पायांत गांवठी जोडे असत. परंतु महाविद्यालयांतील सभागृहामध्यें ( Convocation Hall ) 'बूट' च वापरावे लागतात, हे समजतांच विकत घेण्यापेक्षां प्रथम ते वापरावेच कसे या घोटाळ्यांत तो पडला ! एकदां तर अति पावसामुळें त्याचा एक जोडा वाहून गेला. तेव्हां दुसरे दिवशीं महाविद्यालयांत जातांना एक बायकी जोडा आपल्या राहिलेल्या जोड्याच्या जोडीला घालून तो गेला ! पुढे लवकरच त्यानें सव्वा नऊ आण्यांचा एक नवीन जोडाच विकत घेतला !

## रामाचें स्वरूप

आर्यवंशाला साजेसा तो सुंदर चेहेरा, ते काळेभोर डोळे, धनुष्याकार भुंवया, तो विशाल भाल प्रदेश, ते नाजुक व बारीक ओंठ, लहानशी हनुवटी आणि एखाद्या कुलीन मुलीला शोभणारी शालिनता असणारा तो गौरवर्णी **राम** पाहून त्याच्या अंतःकरणांतील गूढ प्रेम, अचाट बुद्धी सामर्थ्य, निश्चल मनोधैर्य, उच्च आकांक्षा, आणि उदात्त हेतु यांची साक्ष सहज पटण्याजोगी होती.

## रामाचें वर्तन.

**राम** नेहमीं आनंदी *असे. त्याच्या स्वभावांत दैवी पावित्र्य व मनाचा सरळपणा हे असाधारण गुण होते. आपली अतृप्त ज्ञानलालसा शमवि-

---

* नेहमीं आनंदी असणें हें दिव्य चिन्ह आहे. कारण रामकृष्ण परमहंस म्हणत ' Be cheerful and you are God.' ' आनंदी असा म्हणजे तुम्हींच ईश्वर अहां '

ण्यांकरितां शीत, उष्ण व क्षुधा, तृषा यांची तो बिलकूल पर्वा करीत नसे. **उदरभरण हा ज्ञानप्राप्तीचा खरा हेतु नसून केवळ ' ज्ञानाकरितां ज्ञान सपादन करणें, ' हा त्या शिक्षणाचा हेतु असल्यामुळें त्याचा रोजचा अभ्यास हा खरोखर त्या हवन कुंडांतील एक पवित्र आहुति होती**. इतक्या गंभीरपणानें, शांतपणानें आणि जागरूकपणानें तो ज्ञानार्जन करीत असे कीं, आपल्या भावी कार्याची व उद्दिष्ट ध्येयाची पूर्ण जाणीव त्याला होती असे दिसतें. धिम्मेपणानें पण पूर्ण खात्रीनें तो काम करी. अशा रीतीनें अश्रुपूर्ण नेत्रांनीं खऱ्या शिष्याला शोभणाऱ्या नम्रतेनें, गाजावाजा बिलकूल न करितां हा दैवी विद्यार्थी दृढनिश्चयानें व चिकाटीनें अहोरात्र अविश्रांत मेहेनत करून त्या ज्ञान मंदिरांत सरस्वतीची उपासना करीत असे.

अशा स्थितीत **रामाचा** बी. ए. चा अभ्यासक्रम सुरू झाला. रामाचे सहाध्यायी त्याला ' गोस्वामी तीर्थराम ' असें मोठया आदरानें ह्मणत. या वेळीं **रामाला** संस्कृतचा चांगलासा परिचय नव्हता. पण फारशीमध्यें तो प्रवीण होता. ब्राह्मण कुलांत उत्पन्न होऊन, त्यांतल्या त्यांत गोस्वामी तुलसीदासांच्या पवित्र कुलांत जन्मास येऊन गीर्वाण भाषेऐवजीं फारशी भाषेचा पूर्ण भक्त बनलेल्या **रामाला** एकदां त्याचा एक सहाध्यायी टोंचून बोलला. त्यावरून **रामानें** फारशी भाषेचा वर्ग सोडून देऊन संस्कृत भाषेच्या वर्गांत दाखल होण्याचा निश्चय केला. यामुळें त्याच्या मौलवी साहेबांना फार वाईट वाटलें. ' अजूनपर्यंत संस्कृतचा गंधही नसल्यामुळें वर्गांतील इतर विद्यार्थ्यांबरोबर हा चालू शकणार नाहीं ' या सबबीवर संस्कृत भाषेच्या अध्यापक पंडितजींनीं त्याला वर्गांत घेण्याचें नाकारिलें. परंतु याही अडचणींतून **नेपोलियन**सारख्या धैर्यानें व चिकाटीनें **रामानें** मार्ग काढिला.

त्यावेळीं परीक्षेला असलेल्या पुस्तकांत ' रघुवंश ' हें एक पुस्तक होतें. त्याचा कांहीं भाग पाठ करून तो साधारणपणें समजण्याइतकी तयारी करून **तीर्थराम** पंडितजींपुढें उभा राहिला व त्यानें आपली तयारी त्यांना दाखविली. तेव्हां आश्चर्यानें चकित होऊन ते ह्मणाले " इतर मुलांना ज्या विष-

याकरितां कित्येक महिने लागले, तो विषय तूं इतक्या थोड्या अवकाशांत व्याकरणाचा गंधही नसतां, तयार केलास हें पाहून तुझ्या दांडग्या स्मरण-शक्तीची व विद्वत्तेची मला पूर्णपणें ओळख पटली. यास्तव या तुझ्या गुणांची तारीफ मी आतांच प्रिन्सिपॉलसाहेबांजवळ करून आपली चूक कबूल करितों, व तुला संस्कृत वर्गांत दाखल करितों." याप्रमाणें तीर्थरामाला संस्कृत वर्गांत प्रवेश मिळाला ! आणि तो नेटानें अभ्यास करूं लागला.

मनुष्याला महत्व प्राप्त होण्याकरितां दीर्घप्रयत्न, अविरतश्रम आणि विलक्षण चिकाटी ह्या गुणांची आवश्यकता आहे. तथापि ह्या गुणांला जर आपल्या उद्दिष्ट कार्याच्या पूर्णज णिवेची जोड नसेल तर मात्र ते गुण विफळ होतात. रामाच्या चरित्राकडे पाहिल्यास असें दिसतें की, निव्वळ ते गुणच रामाच्या आंगीं नसून त्यांच्या जोडीला वर उल्लेख केलेली जाणीवही होती. ही गोष्ट त्याच्या एक दोन पत्रांवरून दिसतें. मुद्दांत बोलाविलें असतां पत्राला उत्तर देतांना तीर्थराम लिहितोः—

"दीर्घ प्रयत्नांशिवाय कोणीही मोठा ज्ञानी होत नाही. त्याच्या विद्वत्तेचे कारण अभ्यास हेंच आहे. त्याचे प्रयत्न जरी आपणांस दिसत नसतील तरी कदाचित् तो गुप्तपणें ते करीत असेल. पुष्कळ विद्यार्थी घरीं जाऊनही आपले अभ्यास चांगले करून येत असतील हें खरें, तथापि याचें कारण मात्र निराळें आहे एकतर ते जेथें अभ्यास करीत असतील तेथें त्यांना अडथळा होण्याजोगें कांही नसेल अगर ते अविवाहित असतील अथवा त्यांची इच्छाशक्ति इंद्रियांच्या विषयांना बळी न पडण्याइतकी विकास पावलेली . असेल परंतु माझें मन त्या स्थितींत नाहीं. तें अगदीं दुष्ट आहे ह्मणून तें प्रयत्नानें बळकट केलें पाहिजे. याकरितां हा जो सुट्टीचा काळ आहे, त्यांतच मला अतिशय मेहनत केली पाहिजे. ज्याप्रमाणें एखादा राजपुत्र लढाईच्या वेळीं आपलें सर्व लक्ष आपल्या सैन्याकडेच लावितो, त्याप्रमाणें मलाही अभ्यासाकडे पूर्ण लक्ष लावण्याची परवानगी असावी. या करितां ह्या प्रश्नाचा उहापोह पुनः मेहेरबानीनें करूं नका !"

श्रम व ते करण्याची आवड रामाच्या ठिकाणीं केवढी होती; याचीं उदाहरणें त्याच्या पत्रांत पुष्कळ आहेत. परंतु विस्तारभयास्तव त्यांचा विचार करितां येत नाहीं.

या त्याच्या अभ्यासी स्वभावामुळें व हुषारीमुळें त्याचे सहाध्यायी, त्याचे अध्यापक आणि इतर सद्गृहस्थही रामाची गरिबी ओळखून मधूनमधून त्याला मदत करीत. अशी अनपेक्षित मदत येत होती. तरी देखील रामाचें मन व वर्तन कित्ता घेण्यासारखें होतें. हें धन्नाजींना पाठविलेल्या पत्रावरून दिसतें.

"लाहोर ११ जून १८९२

प्रिय–गुरुजी,

आज आमच्या प्रिन्सिपॉल साहेबांजवळ कोणी एका सद्गृहस्थानें माझ्याकरितां ५३ रु. देऊन ठेविले. ते त्यांनीं मला एकीकडे बोलावून दिले. मी देणाऱ्या गृहस्थाचें नांव विचारितांच त्यांनीं तें सांगण्याचें नाकारिलें. तेव्हां मला वाटलें कीं, त्यांनीं स्वतःच ते रुपये दिले असतील. म्हणून कांहीं रुपये मला देऊन बाकीचे महाविद्यालयाकरितां खर्च करा अशी विनंति केली. तीही त्यांनीं अमान्य केली. तेव्हां पुनः मी असें सांगितलें कीं, माझी फी माझे गणिताचे अध्यापक महाशय 'गिल्बर्टसन' हे देत असतात. त्यांना याउपर त्रास देणें मी इच्छित नाहीं. करितां आपण या पैशांतून फी तरी काढून घ्यावी. तेव्हां त्याचा निकाल मी गिल्बर्टसन साहेबांवरच सोंपवितों असें त्यांनीं प्रत्युत्तर दिलें. याकरितां ती सर्व रक्कम मी घेतली व अयोध्याप्रसादांना देऊन टाकिली.

आपला सेवक–

तीर्थराम."

वर दिलेल्या सर्व उताऱ्यांवरून तीर्थरामाच्या विद्यार्थी दशेची एक बाजू तर कळलीच. आतां त्याच्या मनोविकासांतील गुरुभक्तीचा मासला दाखवून

पुढील मुख्य भागाकडे वळतों. धन्नाजी पत्र पाठविण्यास विसरले अगर त्यांनीं उशीर केला तर तो त्यांना असें लिही की,

" आपण एकतर स्वतः येथें येत नाहीं अथवा पत्रही लिहीत नाही. मग मला माझा अपराध कसा कळावा बरें ? त्याचप्रमाणें आतांशा आपलें माझ्या-वरील प्रेम कां ढिलें होत आहे, हें मला समजत नाहीं. परमेश्वराच्या गुणो-दधींतील दया व शांति हीं दोन प्रमुख रत्नें आहेत. या गुणांची प्रतिमूर्ती बनणें हा सद्गुण तर खराच. पण आपण जर मला माझे दोष दाखवून द्याल तरी मी आपला आभारी होईन. कारण दैवी ज्ञानचक्षूनें आपण माझ्या स्वभा-वांतील दोष जाणतां. म्हणून कदाचित् आपण माझ्याबद्दल इतके मूक बनले असाल. परंतु मी आपल्या शासनानुरूप वागत नाहीं असा आरोप लोक माझ्यावर करितील. म्हणून मी आपल्या आज्ञेचें अतिक्रमण करीत नाहीं. असें एकदां तरी कबूल करा. मग मी लोकांची पर्वा करीत नाही. आतां मी एवढेंच विनवितों कीं,

जो हम भूलें वचन उचारे ।
क्षमा करो अपराध हमारे ॥ "

केवढी ही निस्सीम गुरुभक्ति ! कीं जिच्या योगानें राम धन्नाजींना खुद्द परमेश्वर मानून त्यांची स्तुति करितो व त्यांच्या कृपेची आशा व्यक्त करितो ! गुरुस्तुतींत तीर्थरामजी म्हणतातः—

( राग—केदार )

**रफीकोंमें गर है मुरव्बत तो तुझसे ।**
**अज़ीजोंमें गर है मुहब्बत तो तुझसे ॥ १ ॥**
**खजानोंमें जो कुछ है दौलत तो तुझसे ।**
**अमीरोंमें है जाह–ओ–सौलत तो तुझसे ॥ २ ॥**

---

१ मित्रांमध्यें. २ अथवा, अन्य. ३ कृपा. ४ तुझ्यापासून, तुझ्यामुळें. ५ जिवलगांमध्यें. ६ भिडस्तपणा, भीड, मुर्वत. ७ खजिन्यांत. ८ नांवलौकिक.

हकीमोंमें है इल्मो-हिकमत तो तुझसे।
या रौनके-जहां या है बर्कत तो तुझसे ॥ ३ ॥
है रोकर यह तकरारे-उल्फत तो तुझसे।
की इतनी यह हो मेरी किस्मत तो तुझसे ॥ ४ ॥
मेरे जिस्मो-जांमें हो हर्कत तो तुझसे।
उडे मा-ओ-मंनीकी वह शिर्कत तो तुझसे ॥ ५ ॥
मिले सर्दका होनेकी इज्जत तो तुझसे।
सदा एक होनेकी लज्जत तो तुझसे ॥ ६ ॥
उडें टेढी बांकी यह चालाकियाँ सब।
सिपैर फैंकूं ढूंढू सलामत तो तुझसे ॥ ७ ॥

( वरील कवितेचें रूपांतर )

### शालिनी.

मित्रांमध्यें नांदतो जो सलोखा। प्याऱ्यांमध्यें लेखिला प्रीतिरोखा ॥
कोशस्था त्या संपदा सर्व तैशा। सामंत श्री वैद्यविद्या चिकित्सा ॥ १ ॥
सौंदर्याचा बर्कतीचा सुकाळ। ते ते तंटे प्रीतिचें मोहजाळ ॥
मद्भाग्याची एवढी ही इयत्ता। देहप्राणांतर्गता सत्प्रतिष्ठा ॥ २ ॥
किंवा माझ्या मीपणाचा निरास। आत्मत्यागें सत्स्वरूपीं निवास ॥
जीं जीं सौख्यें त्यांस तूं सर्वजाण। सर्व श्रेष्ठा सद्गुरो संनिदान ॥ ३ ॥

### आपत्तींच्या अग्नीमधून

रामाचा बी. ए. च्या वर्गात असतांचा काळ किती कठीण होता हें आपण मागें पाहिलेंच आहे. **सोन्याची खरी** शुद्धि ते अग्नींत टाकिल्याशिवाय होत

---

१ वैद्यांमध्यें. २ उपाय. इलाज. ३ विद्या, चिकित्सा. ४ संसाराची सुंदरता. ५ प्राप्ती, फायदा. ६ प्रेमाचे झगडे व विवाद. ७ एवढा-ढी-ढें. ८ नशीब. ९ देहांमध्यें, प्राणामध्यें. १० अहंकाराची. ११ विभक्तपणा, अलाहिदाई. १२ अर्पण करण्याची. १३ अब्रू. १४ वांकडीं. १५ चलाखी, हुशारी. १६ त्यावर. १७ बचाव, कल्याण, आरोग्य.

नाहीं. रामाच्या आयुष्यांतील आणीबाणीचा पहिला प्रसंग तो प्रवेश परीक्षा उत्तीर्ण झाला तेव्हां होता. परंतु आतां त्याहीपेक्षां कठिणतर प्रसंगांतून **रामाला** जावयाचें होतें. रावण मारिल्यानंतर रामासमोर सीतेला आणिलें तेव्हां रामचंद्राच्या मनांतून तिची शुद्धि, दिव्य करवून सिद्ध करावयाची होती. व त्याप्रमाणें त्यानें सीतेकडून करविलेंही. त्याचप्रमाणे परमेश्वराच्या मनांतून **तीर्थरामालाही** दिव्य करावयाला लावावयाचें असल्यानें त्या जगच्चालक प्रभूनें कठिणतम परिस्थिति उत्पन्न केली असें वाटतें.

त्यावर्षी **तीर्थरामानें** फार झटून अभ्यास चालविला होता. यामुळें खुद्द त्याला परिक्षेंत पहिला येण्याची फारच उमेद वाटत होती. त्याचप्रमाणे त्याचे सहाध्यायी व अध्यापक यांनांही वाटे. परंतु परमेश्वरी सूत्रें कांहीं निराळ्याच दिशेनें हालत होतीं. त्यावर्षी परीक्षेच्या कारभारांत इतका कांहीं घोंटाळा व अंदाधुंदी माजली होती कीं, कांहीं गवत्येगोमाजी तेवढेच उत्तीर्ण झाले! परीक्षेसंबंधी काय विलक्षण व बेजाबदार परिस्थिति अद्यापही आहे पहा! ज्या परीक्षेवर विद्यार्थ्यांचें भवितव्य सर्वस्वीं अवलंबून असतें, ज्या परीक्षेवर आईबापांच्या व पालकवर्गाच्या आकांक्षा लटकत असतात, ज्या परीक्षेवर खर्च केलेल्या पैशांचें चीज होणें न होणें अवलंबून असतें, त्या परीक्षेच्या कारभारांत अव्यवस्था, अंदाधुंदी आणि अनीति ही शिरलेलीं असली म्हणजे बिचाऱ्या विद्यार्थ्यांचें वाटोळें! आईबापांच्या इच्छांना मूठमाती व पैशांचा सत्यानाश हा ठेविलेलाच !! तोच प्रसंग दुर्दैवानें-नव्हे सुदैवानें **तीर्थरामावर** आला. अखेरीस तो इंग्रजींत आणि तोही तीन गुण कमी मिळाल्यामुळें नापास झाला. हा **रामावरील** आघात वज्रापेक्षांसुद्धां कठीण होता, ही गोष्ट समपरिस्थितींतील विद्यार्थ्यांना तत्काल पटण्याजोगी आहे.

**तीर्थराम** नापास झाला ही बातमी ऐकून तर त्याच्या अध्यापक वर्गांत खळबळ उडून गेली. म्हणून त्यांनीं कांहीं खटपट करून पाहिली. पण व्यर्थ! पंजाब विश्वविद्यालयाच्या कांहीं सभासदांनींहि गुसाईजींचे सर्व विषयांतील गुण मिळवून पाहिले; तों ते आश्चर्यचकित होऊन म्हणाले "ह्या विद्यार्थ्याला आणखी चारच गुण मिळते तर तो सबंध पंजाबमध्यें पहिला आला असता!"

हे उद्गार रामाला नापास झाल्यामुळे झालेल्या दुःखावर डागण्याप्रमाणें भासले! या सर्व परिस्थितीचा विश्वविद्यालयाच्या कारभारावर चांगलाच परिणाम झाला. विद्यालयाच्या कांहीं सभासदांनीं पुष्कळ खटपट करून असा ठराव पसार करून घेतला कीं, ' इतर विषयांत चांगले गुण मिळवून एखाद्या विषयांत जर कोणा विद्यार्थ्याला चार पांच गुण कमी पडले तर एकदम त्याला नापास न करितां त्याचा पुनः विचार व्हावा. ' परंतु ह्या नियमाचा फायदा तीर्थरामाला त्या वर्षी मुळींच मिळाला नाही. त्याला तर विपत्तीच्या तीक्ष्ण धारेवरच पडून राहणें भाग आलें.

(१) एकतर **रामा**सारख्या गरीब, आपद्ग्रस्त, पण होतकरू विद्यार्थ्याच्या मनावर हा जबरदस्त आघात झाला. **रामा**शिवाय इतर विद्यार्थी तर अगदी नाउमेद झाले असते.

(२) त्याच वर्षापासून इंग्लंडमध्यें गणिताच्या अभ्यासाकरितां एक शिष्यवृत्ति ठेवण्यांत आली होती. पण नापास झाल्यामुळें तीही त्याला मिळाली नव्हती.

(३) बापाकडून तर एका पैची देखील आशा नव्हती.

(४) नापास झाल्यामुळें त्याची साठ रुपयांची शिष्यवृत्तीही बुडाली.

अशा परिस्थितींत रामाच्या मनांत काय खळबळ झाली असेल ती वर्णन करणें अशक्यच आहे. त्याची वाचकवर्गानें कल्पना करावी. रामावरचा हा प्रसंग अगदीं आणीबाणीचा होता, तरी त्याचा परमेश्वरावरील अढळ विश्वास व असामान्य मनोधैर्य हीं मात्र कायम होतीं; किंवा ह्या दोन गोष्टीमध्येंच त्याचें सर्व पौरुष सांठविलेलें होतें.

## मानसिकस्थिती—पूर्ण अनन्यत्व

संन्यास घेतल्यावर या प्रसंगासंबंधानें खुद्द **स्वामींनींच** पुढें दिल्याप्रमाणें शिष्यवर **नारायण स्वामी**जवळ म्हटलें " नापास झाल्याची बातमी समजतांच **रामाच्या** मनावर वज्रप्रहार झाला. त्याचें मन फाटलें. अश्रुधारा जोरानें वाहूं लागल्या. जणुंकाय शोकाचा पर्वतच कोसळून पडला आहे. !

वडिलांची मदत तर नव्हतीच; पण उलट रामावर संसाराचा बोजा मात्र निष्कारण आलेला होता. बाहेरील मदतीची आशाच नव्हती. त्यामुळें रामाचें धैर्य खचूं लागलें. पण या व्याकुल अवस्थेमध्यें स्वस्वरूपध्यान व त्या श्रीकृष्णाचें प्रेमपूर्ण नामस्मरण ह्याच काय त्या शांतिदायक गोष्टी होत्या. डोळ्यांतून अश्रुधारा वहात असतांना अंतःकरणांतून

त्वमेव माता पिता त्वमेव
त्वमेव बंधुः सखा त्वमेव
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देव देव ॥१॥

हा श्लोक वर येई; आणि बस्स प्रभो ! अब राम तुह्मारा, और तुम रामके होलिये ! **रामका काम तो नित्य आपका स्मरण और आपके मर्जी पर राजी रहना होगा** ! और आपका काम अब रामकी सर्व प्रकारकी सहाय्यता करना होगा ! रामका शरीर उसका अपना नहीं रहा. बल्कि साराका सारा आपका होगया, होगया, होगया ! ! ! अब चाहे रक्खो और चाहे मारो ! ”

सकाम भक्तीमधून निष्काम भक्तीमध्यें कसा प्रवेश करावा हें या उद्गारांवरून व तीर्थ रामाच्या ह्या मनःस्थितीवरून सहज समजण्याजोगें आहे. अशा प्रसंगीं पुढें दिलेले उद्गार वाचून कोणत्या सहृदय वाचक निरश्रु राहील?

( **राग**—गारा. ताल—धुमाळी )

**कुंदनके[1] हम[2] डले[3] हैं, जब चाहे तूं गला[4] ले ।**
**बावर[5] नहो, तो हमको लें[6] आज आजमा[7] ले ॥**
**जैसी तेरी खुशी हो, सबनाच तूं नचा[8] ले ।**
**सब छान-बीन करले, हर[9] तौर[10] दिलें[11] जमा[12] ले ॥**

---

१ सोन्याची. २ मी. ३ लगड, गट ४ वितळून टाक. ५ निश्चय होत नसल्यास. ६ घे ७ परीक्षा कर, अजमावून पहा. ८ नांचवून घे. ९ प्रत्येक १० प्रकार तऱ्हा. ११ अंतःकरण. १२ संतुष्ट हो.

राजी है हम उसीमें जिसमें तेरी रजा है ॥ टेक ॥
यहां यूं भी वहवा है, और वूंभी वाहवा है ॥ १ ॥
यां दिलसे अब खुष होकर कर हमको प्यारे, प्यारे ! ।
या तेग खैंचे जालिम । टुकडे उडा हमारे
*जीता रख्खे तूं हमको या तनसे सिर उतार ।
†अब तो फकीर आशिक कहते है यूं पुकारे राजी है ॥ २ ॥
अब दरपे अपने हमको रहने दे या उठा दे ।
हम इस तरह भी खुश है, रख या हवां बना दे ॥
आशिक हैं पर कलंदर चाहे जहां बिठा दे ।
या अर्शपर चढादे, या खाकमें रुला दे ॥ राजी है हम ॥

( कवितेचें रूपांतर )

सोन्याची,—लगड असें मी साची—शुद्धि पहा तनुची ॥
विश्वास,—जर न बसे तव खास—मापीं देहास ॥
वेल्हाळ,—करिं मम चाळाघोळ—घडवीं हन्मेळ ॥
हें सुखद—तेही वाटे सुखद—देवा आल्हाद ॥
प्रेमभरें—तूं ह्मण प्यारे, प्यारे,—दे वा असिधारे ॥
जीवंत—अथवा कर देहांत—मी रत नामांत ॥

---

१ त्यांत. २ ज्यांत. ३ मर्जी. ४ असें. हें. ५ तसें तें. ६ अथवा. ७ आतां. ८ तरवार. ९ काढून घे. १० निर्दयी, जुलमी. * जिवंत. ११ शरिरापासून. १२ शीर. १३ उतर, काढूनटाक. १४ प्रेमी. १५ द्वारावर. १६ राहूं दे. १७ याप्रकारें करून. १८ दूर फेंकून दे. १९ परंतु. २० आकाशांत.

†तुझ्या द्वारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥
धरणें घेतलेसें धरणीं । रामदास लोटांगणी ॥
अशीच नव्हे का ही स्थिति ?

त्वद्वारीं—आतां धरणेंच धरीं—घालविं मज दूरी ॥
फुंकून—आकाशीं भूवरून—उडवीं हटकून ॥
रक्षेंत—लोळव, त्याहि स्थितिंत—राहीन निश्चित ॥
नशिबाला—कुठल्याही काळाला—लाविन नच बोला ॥

केवढा दांडगा हा निश्चय ! भक्तीची परिसीमा यापेक्षां आणखी कोठें आहे ? देवाच्या घरावर भक्तीची एवढी दांडगी टांच आणल्यावर, त्या घराचा मालक—परमेश्वर—कसा स्वस्थ बसेल ?

आपुलें आवघेंचि जावें । परी देवासी सख्य रहावें ।
ऐसी प्रीति जीवें भावे । भगवंतीं लागावी,

( दा. बो. ४।८।९ )

भक्त या थरावर येऊन पोहोंचल्यावर त्याचा योगक्षेम चालविल्याशिवाय परमेश्वराला भक्ताच्या तडाक्यांतून सुटतां येईल कां ? **तत्त्वज्ञानांतील घटपटादिकांची शुष्क बडबड करून करून होणाऱ्या प्राप्तीपेक्षां अंतःकरणांतील खऱ्या कळवळ्यानें केलेल्या प्रार्थनेनें होणारी प्राप्ती केव्हांही अधीकच असणार हें खरें** अशा स्थितींत **राम** ईश्वराच्या ध्यानांत असतांना, ईश्वराच्या दयाळुत्वाचा, त्यानें आपल्या हांकेला ओ दिल्याचा प्रत्यय **तीर्थराम**ाला लवकरच आला तो असाः—

(१) महाविद्यालयांतील मिठाईवाला **झंडूमलजी** यानें मोठ्या सहानुभूतीनें व कळकळीनें **तीर्थरामाला** रोज आपल्या घरीं भोजन करण्यास विनाविलें. शिवाय या गृहस्थानें **तीर्थरामाला** कपडेलत्ते व पुस्तकें या बाबतींतही चांगलीच मदत केली.

(२) **राम** नापास होऊन पूर्ण निराश झाल्याची हकीगत ऐकून त्याचे मावसे **पी. रघुनाथमल**, असिस्टंट सर्जन यांनीं ' बेटा तीर्थराम, तूं घाबरूं नकोस. धैर्य धर, ' अध्ययन सोडूं नकोस. कॉलेजांत पुनः दाखल हो. तुझ्या सहाय्यार्थ मी दरमहा २०।२५ रु.

पाठवीत जाईन. एक दोन शिकवण्याही धर. पण पुढें शिकण्याची हौस व हिंमत हीं सोडूं नकोस " असें लिहिलें.

(३) मागें सांगितल्याप्रमाणें त्याच्या प्रिन्सिपालसाहेबांनींही त्याला मदत केली.

या प्रमाणें **राम** महाविद्यालयांत पुनः रुजू झाला. व नेटानें अभ्यास करूं लागला. या आपल्या अडचणीच्या व अमोलिक काळांत कांहीं गरजूं सहाध्यायांना फुक्ट शिकविण्याचेंही काम त्यानें आंगावर घेतलें होतें. ही गोष्ट लक्षांत धरण्यासारखी आहे. परीक्षेचे दिवस जवळ आहे. व फी भरण्याची वेळ आली. तेव्हां पुन्हां त्याला पैशांची अडचण पडली पण त्याची काळजी परमेश्वराला होती. अगदी ऐन वेळेला त्याच्यावर फिदा असणारे अध्यापक '**गिल्बर्टन**' महाशय यांनीं त्याला कागदाची एक पुरचुंडी एकीकडे बोलावून दिली. **रामा**ने घरीं आल्यावर ती उघडून पाहिली. तो त्या पुरचुंडींत त्याला तीस रुपये आढळले अशा रीतीनें पैसे मिळाल्यावर ते भरून **राम** परीक्षेला बसला. यावेळीं निकालाविषयीं त्याचा आत्मविश्वास फारच दांडगा होता. व त्याप्रमाणें त्याला फळही मिळालें. गणित ह्या आवडत्या विषयांत तर त्याची इतकी तयारी होती कीं, जेथे इतर विद्यार्थ्यांनीं तेरा पैकी तीन चारच प्रश्न सोडविले तेथें **रामानें** तेराच्या तेरा सोडविले यामुळें त्या विषयांत त्याला दिडशें पैकी एकशें पंचेचाळीस गुण मिळाले ! व एकंदरींत तो पहिल्या वर्गात पहिला आला. याचा परिणाम असा झाला कीं, त्याला ६० रुपयांची शिष्यवृत्ति पुनः मिळूं लागली; आणि सुवर्णपदक, झगा वगैरे आणखी बक्षिसेंहि मिळालीं. परमेश्वरावर अढळ श्रद्धा व दृढ प्रयत्न यांशिवाय कशाचें हें फळ असणार ?

यावेळीं त्याचें वय सुमारें वीस वर्षाचें होतें. आतां **रामानें** आपलें नांव एम्. ए. चा अभ्यास करण्यासाठीं सरकारी महाविद्यालयांत दाखल केलें. पूर्वीपासूनच त्याला शिकविण्याची फार हौस होती. यास्तव तो आपल्या सहाध्यायांनां व गरजू विद्यार्थ्यांना आपलें अगदीं नडीचें देखील हातांतील काम ठेवून शिकवीत असे. गणित हा त्याच्या आवडीचा विषय होता.

म्हणून त्यानें आपल्या पूर्वीच्या महाविद्यालयांत ( फोरमन ख्रिश्चन कॉलेज-मध्यें ) बी. ए. च्या वर्गाला गणित शिकविण्याचें काम कांहीं वेतन न घेतां करण्याचें पत्करिलें. आणि अशा रीतीनें त्या संस्थेचें ऋण तो अंतशः फेडूं लागला. तो विद्यार्थ्यांना, अध्यापकांना, व सहाध्यायांना फार प्रिय असे, हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

आपलें विद्यार्थीदशेंतील कर्तव्य चोख रीतीनें बजावीत असतांनाही **राम** परोपकार करीत होता. यावेळीं तीर्थरामाच्या मनाची स्थिति, त्याच-प्रमाणें त्याची रहाणी व दिनचर्या हीं कशीं होती ह्या गोष्टींकडे लक्ष पुरविणें अत्यावश्यक आहे. भगतजींना याच सुमारास पाठविलेल्या पत्रांत ते म्हणतातः—

“ ९ फेब्रुवारी १८९४ रात्रौ ११ वाजतां.

आपलें कृपापत्र आजच मिळालें. फार आनंद झाला. मी दररोज प्रातःकाळीं ५ वाजेपासून ७ वाजपर्यंत अभ्यास करितों. नंतर स्नान करून व्यायाम करितों. त्यानंतर पंडितजींकडे जातों. व जातांना वाचीत असतो. तेथें एक तासपर्यंत राहतों. नंतर जेवण जेवून त्यांच्याबरोबर गाडींतून महाविद्यालयांत जातों. नंतर घरीं येतांना वाटेंत दूध पितों. घरीं कांहीं मिनिटें बसून नंतर **रावी** नदीच्या बाजूला सहल करावयास जातों. तेथें जाऊन किनाऱ्यावर सुमारें अर्धातास इकडे तिकडे फिरतों. पुनः परत येतांना शहरांतील हिरव्या गार बागेमध्यें कांही वेळ फिरतों; व मग घरीं येऊन वरच्या मजल्यावर इकडे तिकडे अभ्यास करीत हिंडतों. इतक्यांत अंधःकार होतो. मग पुनः कसरत करितों आणि दिवा लावून सात वाजेपर्यंत अभ्यास करीत बसतों. नंतर भोजनास जातों, व **प्रेमजींकडेही** जातों. तेथून आल्यानंतर दहा बारा मिनिटें घरी व्यायाम करितों. नंतर दहा वाजेपर्यंत रात्रौ अभ्यास करितों. माझ्या अनुभवाला असें आलें आहे कीं, आमचें पोट जर आम्हीं उत्तम स्थितींत ठेविलें तर, पूर्णानंद, किंवा सुख, चित्तैकाग्र्य, परमेश्वराची आठवण, अंतःकरणाची पवित्रता इत्यादि गोष्टी सहज

प्राप्त होतात. बुद्धि व धारणाशक्ति चांगल्या राहतात. मी फार थोडें खातों व जें कांहीं खातों तें चांगलें पचवितों.

राम."

या पत्रावरून **राम** वैयक्तिक मनाचें किती सूक्ष्म निरीक्षण करीत होता हें चांगलेंच दिसून येतें. अशाच प्रकारचें मनाचें सूक्ष्म निरीक्षण उत्तरोत्तर करीत जाणें हेंच आपल्या भावी उन्नतीचें लक्षण व तयारी आहे. कारण **अशोधित जीवित घालविणें अयोग्य आहे** ('An unexamined life is not worth living' Socrates) असें म्हणतात. याचा आपल्याला नकोका विचार करायला ?

**तीर्थराम** इ. स. १८९२ मध्यें गणित घेऊन एम्. ए. मध्यें पहिला आला. त्या वर्षी गणिताचे प्रश्न इतके कठीण आले होते कीं, हिंदुस्थानांतील कोणत्याही विश्वविद्यालयांत असे प्रश्न पूर्वी कधीं आलेले नव्हते, असें खुद्द **तीर्थराम** म्हणत असे.

**रामाची** ही असामान्य बुद्धिमत्ता पाहून त्या महाविद्यालयाचे प्रिन्सिपॉल **मे. डब्ल्यू. बेल.** हे फार खुष होऊन त्यांनीं 'प्रांतिक सिव्हिल सार्विस' करितां **तीर्थरामानें** जावें अशी इच्छा प्रदर्शित केली. शिवाय लायकीप्रमाणें त्या वर्षी **रामाचाच** हक्क होता. परंतु **रामाला** उपदेशक किंवा अध्यापक होण्याचीच आवड असल्यामुळें ती मिळणारी शिष्यवृत्ति घेण्याचें नाकारण्याची बुद्धि त्याला झाली ! पण छे ! तसें नव्हे. सीनियर रँगलरसारखी लौकिक परीक्षा देऊन निव्वळ आंकडेशास्त्री होण्यापेक्षां विश्वेशाच्या विद्यालयांतील सर्वांत मोठी परीक्षा देऊन मगच ह्या विश्व-विद्यालयांतील अलौकिकत्व संपादन करावें असाच परमेश्वरी संकेत होता-म्हणूनच त्याला अशी बुद्धि झाली ! मागील पत्रांत सांगितलेंच आहे कीं, **राम** थोडें खाई व तें पचविण्यालासुद्धां त्याला नियमित व्यायाम करावा लागे. यावरून त्याची प्रकृति किती अशक्त होती हें दिसून येतें. लहानपणापासून पोषक अन्नाचा अभाव, दारिद्र्य, मानसिक व शारीरिक क्लेश, व त्रास, अतिशय नेटानें व कसून केलेला अभ्यास ह्या सर्व गोष्टींचा सामवायिक परिणाम **तीर्थरामाच्या**

शरिरावर बराच वाईट व्हावा यांत नवल नाहीं. एम्. ए. झाल्यावर तर त्याची प्रकृति फारच ढांसळलेली होती. त्याला वारंवार ताप येई, त्याचें कपाळ दुखे, शिवाय मलावरोधाची नेहमीं तक्रार असे. अंगावरचे मांस नाहींसें होऊन सर्व हाडें दिसूं लागलीं होतीं. मान लांब झाली, व आवाज घोगरा झाला आणि त्याला बोलण्यालासुद्धां त्रास पडे. अशा स्थितींत त्याचा जीव कसा टिकाव धरून राहिला होता, ह्याचें जरी कित्येकांना आश्चर्य वाटे, तरी मिताहार व ब्रह्मचर्य यांचें योग्य पालन हेंच त्याचें कारण होतें असें वाटे. एकीकडे परमार्थाची जिवंत कळकळ पण दुसरीकडे पहावें तों शरीर मात्र दुबळें. ही स्थिति पाहून तीर्थरामाला फारच वाईट वाटलें. ह्मणून त्यानें ताबडतोब शरीर सामर्थ्यवान् व बळकट करण्याचा ठाम बेत केला. यावेळीं त्याला ' शरीरमाद्यं खलु धर्म साधन्म ' हें वचन यथार्थतः कळलें. यामुळें आतां त्याचें सर्व लक्ष प्रथमतः ' शरीर सुधारणा ' याच गोष्टिकडे लागलें होतें. हल्लींसारखा औषधांचा अगर पाकांचा सुळसुळाट त्यावेळीं नव्हता. अगर त्याच्या भपकेबाज जाहिरातींचा सुकाळही तेव्हां नव्हता. शिवाय बिचाऱ्या रामावर लक्ष्मीची केवढी कृपा होती हेंहि आपण पाहिलेंच आहे. तथापि त्यानें आपली प्रकृती कशी सुधारिली, त्या करितां त्यानें काय काय प्रयत्न केले, व त्यांचा केवढा मोठा व विलक्षण परिणाम त्याच्या शरिरावर झाला, ह्या सर्व गोष्टी बोधपर असल्यामुळें त्यांकडे लक्ष पुरविणें अयोग्य होणार नाहीं.

### उपाय.

(१) व्यायामः—**राम** रोज नियमित व्यायाम करी. व्यायामाच्या जुन्या पद्धतींत फेरबदल करणें व नवीन पद्धति शोधून काढणें ह्यांत त्याला मौज वाटे. त्यांपैकीं

(अ) चारपाई अथवा खाट हलके हलके वर उचलणें व खालीं आणणें ही एक होय. ही कृति महाविद्यालयांतील सर्वांत सशक्त विद्यार्थी वीसपेक्षां जास्त वेळां करूं शकत नसे. पण राम एकशें साठ वेळां करी !

(आ) ताठ उभें राहून आपले दोन्ही हात तोंडासमोर आणून हलके हलके दूर करीत खांद्याच्या सरळ रेषेंत आणणें व पुनः तोंडासमोर आणणें, ही दुसरी पद्धत होय. सर्वांना मी प्रेमानें आलिंगन देत आहें, अशी भावना मात्र या कृतीमध्यें करावयाची असते.

ह्या कृति ह्या काळांत जरी सोप्या व विशेष महत्वाच्या नाहींत असें वाटलें, तरी राम ज्या काळांत शिकत होता त्याचा विचार केल्यास त्यांची योग्यता खास कमी नव्हती.

(२) सहल करणें:—राम नेहमीं दूरपर्यंत सहल करी व संवयीनें तीस तीस मैल फिरे.

## आहार.

**राम** हा पंजाबी असूनसुद्धां त्याचें मुख्य अन्न दूध व भात असे. एम्. ए. मध्यें असतांना तर तो निव्वळ दुधावरच राही. पुढें पुढें तर तो एका खेपेला पांच शेर दूध पिई.

या सर्व उपायांवर ताण म्हणजे पुढें दिलेली 'वैदिक धर्मातील' अपूर्व गुटिका तो नियमानें सेवन करी.

‘ बनविण्याची रीति ’

( १ ) ब्राह्ममुहूर्तावर उठणें १०० भार ( २ ) योगासनाचा व्यायाम ५० भार ( ३ ) प्राणायाम व ध्यान १७५ भार ( ४ ) ब्रह्मचर्य व संयम २०० भार ( ५ ) मिताहारादि नियम १०५ भार ( ६ ) सदाचार १०० भार ( ७ ) गिर्यारोहण ६० भार ( ८ ) दुर्व्यसन त्याग ७० भार आणि ( ९ ) सत्संगति १५० भार. हीं सर्व औषधें घेऊन त्या सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून स्वाध्याय व धर्माचरणरूपी अमृतरस यांच्या एकवीस भावना द्याव्या व सुविचार, सद्गुण, सद्वासना वगैरे सत्पदार्थांचें मिश्रण बनवून प्रत्यहीं सेवन करण्याकरितां आपल्या इच्छेप्रमाणें गोळया बनवाव्या. अधिक सेवन केल्यास कांहीं नुकसान नाहीं.

**अनुपानः**—यमनियमरूपी गोमातेचें ताजें दूध उपर्युक्त गोळीबरोबर यथेच्छ घ्यावें.

**किंमतः**—‘ एक—लक्ष—मुद्रा ’

**मागविण्याचा पत्ताः**—निसर्ग औषधालय,
भुवनपुरी,
जगत् नारायण चौक
अमरावती. ”

**परिणामः**—

उपरिनिर्दिष्ट रीतीनें व्यायाम करून या अपूर्व गुटिकेचे प्रतिदिन सेवन केल्यास कोणता रोग हटणार नाहीं ? शरीरयष्टि वज्रासारखी व मदनाला लाजविणारी कां बनणार नाहीं ? या प्रकारच्या गुटिकेचा परिणाम असा झाला कीं, राम हिमालयाच्या पहाडांत वीस पंचवीस मैल सहज जाई. कौपीन व कांबळें एवढ्या सामुग्रीनें तो **गंगोत्री, जम्नोत्री, आणि बदरीनाथ** हीं शिखरें चढूं शकला. **गंगोत्री**चा बर्फमय प्रवास त्याला करितां आला. राम अगदीं उंच व थंड पहाडावर आणि निर्जन व भयंकर गुहेंत रहात असे. मध्यरात्रीं कशाचीही पर्वा न करितां जंगलांत फिरे, भर पावसाळ्यांत जोराच्या

प्रवाहांतून वहात जाणारीं गुरें ढोरें पैलतीराला पोंचवूं शकला आणि अमेरिकेंत असतांना तर चाळीस मैलांच्या शर्यतींत गमतीनें धांवून **राम** शर्यत जिकणाऱ्या गड्यांच्या आधीं दोन तास आला ! ! सारांश अशक्त, कृश, आणि भित्ऱ्या * **रामाचें व लाहोरच्या** विद्यार्थ्याचें रूपांतर बळकट, तेजःपुंज निर्भय आणि धाडसी अशा पहाडी मनुष्यांत झालें तें कशानें बरें ?

किं पुण्यमिति ? ब्रह्मचर्यमिति ॥

किं लौक्यमिति ! ब्रह्मचर्यमेवेति ॥

गोप. ब्रा. २–५



---

* **राम लाहोरास** असतांना एकांतवासाच्या आवडीमुळें गांवाबाहेर एकीकडे राही. तेथें एकदां त्यानें आपली पेटी उघडली असतां आंतून एका कृष्ण सर्पानें झटकन् आपली फणा वर केली. लागलीच रामाची घाबरगुंडी उडून तो सर्व सामान तेथेंच टाकून पळाला व पुनः त्या ठिकाणीं रहाण्यास आला नाहीं. ( पहा. ता. १४ मे १८९० चें पत्र )

# प्रकरण ४ थें.



## स्वामींचा गृहस्थाश्रम.

कुटुंबेषु न सज्जेत न प्रमाद्येत्कुटुंब्यमपि ।
विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत् ॥ ५२ ॥

( श्रीम. भा. अ. १० )

वयोमानानुरूप मनुष्याची मनःस्थिति बदलत असते. ह्या स्थितीचें सूक्ष्म-निरीक्षण करून मानवी मनाच्या वाढीकडे व उत्क्रान्तीकडे नीट लक्ष देऊन मगच चार आश्रमांची योजना चातुर्वर्ण्यप्रधान आर्यसंस्कृतीनें केलेली आहे. या चारही आश्रमांतील आचार व नीतिनियम यांचा विचार करितांच ' निः-श्रेयस प्राप्ति ' हें ध्येय पुढें ठेवून ते केलेले आहेत असें ताबडतोब पटतें. अशा रीतीनें चार आश्रम हें व्यक्तीची पूर्ण उन्नति करून घेण्याचें एक उत्कृष्ट व अनुपम साधन ठरतें. या साधनाच्या द्वारें एकदां व्यक्तीची उन्नति झाली ह्मणजे अशा उन्नत व्यक्तीच्याहातून समाजांची उन्नति सहजासहजीं होऊं शकते. आणि **समाजोन्नति हेंच धर्माचें खरें खरें अंतिमसाध्य आहे.** हें साध्य आर्यांच्या वर्णाश्रमप्रधान वैदिकधर्मोच्याद्वारें साध्य झाल्याची साक्ष फक्त इतिहास देतो; एवढेंच नसून त्या धर्माचा जिवंतपणा, किंबहुना अमरत्व आणि इतर सर्व धर्मीयांची त्या धर्माकडे वळण्याची तीव्र लालसा ह्या गोष्टीही देतात. यावरून ' आश्रमधर्म ' ही एक धार्मिक बाब असून ती बाजार सौद्याची गोष्ट नाहीं असें सिद्ध होतें.

ज्याअर्थी हे आश्रमधर्म व्यक्तीच्या उन्नतीला साधनीभूत आहेत असें उल्लेखिलें त्याअर्थी वैयक्तिक उन्नतीच्या अंतिमसाध्याला म्हणजे परमार्थ प्राप्तीला जाऊन पोंचण्याचा जो सोपान आहे त्याच्या हे आश्रम पायऱ्या आहेत अथवा साध्य प्राप्त करून घेण्याचे ते चार भिन्न भिन्न मार्ग आहेत, असा प्रश्न उद्भूत होतो. त्याचा थोडक्यांत विचार करूं.

पूर्वजन्म संस्कार, आनुवंशिक संस्कार आणि पारिस्थितिक संस्कार, यांच्या उच्चनीचतेवर मानवी मनाचा विकास अवलंबून असतो. हा विकास बहुजनसमाजांत कोणत्या प्रमाणांत होतो याचा खोल विचार करून व अनुभव घेऊन मानवी मनाचा पूर्ण विकास होण्याच्या मार्गांतील सोपानाच्या, व्यक्तित्वाचा विश्वात्मत्वांत विकास करण्याच्या मार्गावरील सोपानाच्या, जीवात्म्याचा शिवात्म्यांत विकास करण्याच्या म्हणजे परमार्थप्राप्तीच्या मार्गांतील, चार आश्रम, हे चार पायऱ्या व्हावे अशी योजना ह्यांत केलेली आहे, असें सूक्ष्म विचारांतीं दिसेल. तथापि सुख दुःख, शीत उष्ण, इत्यादि भावनांत जसें सापेक्षत्व आहे, तसेंच लौकिक व अलौकिक अगर सामान्य व असामान्य यांमध्यें आहे. जगांत कांहीं अलौकिक अगर असामान्य व्यक्ति असतातच. त्यांच्या चरित्राकडे पाहिल्यास ते वर सांगितलेल्या चार पायऱ्यांवरून क्रमाक्रमानें गेले असें दिसत नाहीं. तथापि चार आश्रम हे मानवीमनाच्या उत्क्रांतीचे निदर्शक असल्याकारणानें अथवा विकासाला साधनीभूत असल्याकारणानें त्या आश्रयांच्या द्वारें प्राप्त होणारी मनोविकासांची जी स्थिति ती स्थितीमात्र त्या अलौकिक व्यक्तींनीं त्या आश्रमांत न शिरतांनांच प्राप्त करून घेतलेली होती. यामुळें ती स्थिती प्राप्त करून देणाऱ्या आश्रमाना फांटा देऊन त्याच्यापुढील स्थिति संपादन करण्याला आवश्यक अशा आश्रमाचा त्यांनीं स्वीकार केलेला आहे असें दिसतें. परंतु हे अपवाद प्रमाणभूत मानावयाचे नसून ते मुख्य नियमाचें समर्थन करणारे पुरावे असतात. शिवाय नाथ म्हणतातः—

* ज्यासी वैराग्य नाहीं सर्वथा । हृदयीं स्त्रीकामाचीआस्था । तेणें द्वितीयाश्रम संस्था । गार्हस्थ्या करावें ॥ ३७५ ॥ स्त्रीकामू तरी नावडे । विवेक वैराग्य ज्यासी थोडें । तेणें वानप्रस्थाश्रमाकडे रिघावें रोकडें तात्काळ ॥ ३७६ ॥ जो

---

* गृहं वनं वोपविशेत्प्रव्रजेद्वा द्विजोत्तमः ।
आश्रमादाश्रयं गच्छेन्नान्यथा मत्परश्चरेत् ॥ ३८ ॥

(श्रीम. भा. ११ अध्याय)

विवेक-तेजें दीप्तिमंत । ज्यासी सदा वैराग्य धडधडीत । जो सर्वार्थी दिसे विरक्त । त्यासीच निश्चित चतुर्थाश्रम ॥ १७७ ॥ (अ. १७)

याशिवाय आणखीही आधार विधानाच्या समर्थनाकरितां दाखवितां येतील. म्हणून वर केलेल्या विवेचनांवरून आश्रमसंस्था ह्या परमार्थप्राप्तीच्या म्हणजे जीविताच्या अंतिम साध्याला पोंचविणाऱ्या सोपानाच्या पायऱ्या आहेत, असा निष्कर्ष निघतो.[1] परंतु

'ऐशिया वैराग्य विवेक स्थितीं। गृहींवसतां गृहस्थाप्रति। प्राप्त होय निजमुक्ती। जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५०६ ॥

गृहीं असोनी आश्रम स्थितीं। त्यासी मुख्यत्वें भगवद्भक्ति। त्यासी आश्रमांतर प्राप्ति। नलगे निश्चितीं मद्भक्ती ॥ ५०४ ॥

काळीं अकाळीं सर्वथा। भजनीं पालट नाहीं चित्ता। ऐसी ज्या गृहस्थाची अवस्था। तेणें असावें सर्वथा गृहथाश्रमीं ॥ ५१० ॥

जया कर्माची अति आसक्ती। आणि विषयाची अनासक्ती। नाहीं ज्ञानयुक्त शांति। त्यासीं वानप्रस्थीं अधिकार ॥ ५११ ॥ ज्यासी विरक्ती शांति ज्ञानस्थिति। करतळामळक हस्त प्राप्ती। संन्यास ग्रहण स्थिति। जाण निश्चितीं अधिकारी ॥ ५१२ ॥ * (अ. १७)

या सर्व वचनांचा ससंद विचार केल्यास प्रत्येक आश्रमही आपापल्यापरी जीवित हेतू साध्य करून देण्याला समर्थ आहे. असें दिसतें.

याप्रमाणें चार आश्रम हे परमार्थ प्राप्तीच्या मार्गांतील क्रमाक्रमानें चढावयाच्या चार पायऱ्या आहेत अथवा ते परमार्थ संपादन करण्याचे चार

---

१ चतुष्पदी हि निःश्रेणी ब्रह्मण्येषा प्रतिष्ठिता ।
एतामारुह्य निःश्रेणीं ब्रह्मलोके महीयते ॥
(महा. भा. शां. प. २४१-१२५)

* कर्मभिर्गृहमेधीयैरिष्ट्वा मामेव भक्तिमान्। तिष्ठेद्वनं वोपविशेत्प्रजावान्वा परिव्रजेत् ॥ ५५ ॥
(श्री. भा. अ. १७)

स्वसमर्थ मार्ग आहेत असें दाखविण्यांत आलें. तथापि वरील सर्व विवेचनाचा अधिक सूक्ष्म विचार केल्यास चार आश्रमांना चार पायऱ्या मानणें अथवा भिन्न भिन्न मार्ग मानणें या विचार मालिकेला एकच रहस्यरज्जु आधारभूत आहे. तो रहस्यरज्जु परमार्थ प्राप्ति करून देणारा मनोविकास हा होय. याप्रमाणें मनोविकास करून परमार्थ प्राप्ति झाली ह्मणजे वैय्यक्तिक जीवित हेतु साध्य झाला. परंतु 'मनोविकास' 'मनोविकास' ही गोष्ट सामान्य नाहीं. याकरितां तत्सिद्धयर्थ आश्रम धर्मपालन हीच एक उत्तम सोय आहे. असाच सामान्य निष्कर्ष निघतो. आणि मनोविकास म्हणजे ज्ञान. भगवान् श्रीकृष्ण तरी हाच मनोविकास, हेंच ज्ञान, प्राप्त करून घेण्याचा उपदेश करितात. 'आत्मज्ञान विनापार्थ' ह्यांत तरी हाच अर्थ भरलेला आहे.

यानंतर समाज धारणेला, समाजाच्या उत्कर्षाला व उन्नतीला, आश्रमसंस्था ह्या कशा पोषक व आवश्यक आहेत ह्याचा विहंगम दृष्टीनें विचार करूं.

" मनुष्याबरोबर समाज व समाजाबरोबर मनुष्य परमेश्वरानें उत्पन्न केला असल्यामुळें त्याला जितकें बुद्धिबल, सत्ताबल, द्रव्यबल, किंवा शरीरबल स्वभावतः असेल, अगर स्वधर्मानें प्राप्त करून घेतां येईल, त्या त्या मानानें समाजाचें यथाशक्ति धारणपोषण करण्याचें कर्तव्य व अधिकार हीं चातुर्वर्ण्यादि किंवा गुणकर्मविभागानुरूप सामाजिक व्यवस्थेनें प्रत्येकासच जन्मतः प्राप्त झालेलीं असतात." (गी. र. पृ. ३३२) याकरितां, हें कर्तव्य यथाधिकार बजाविण्याकरितां मार्गदर्शक म्हणून कांहीं नीतिनियमांची आवश्यकता असणें स्वाभाविकच आहे, मग हें कर्तव्यकर्म लोकसंग्रह समाजनीति, लोकयात्राव्यवहार, सर्वभूतहित, वगैरे कोणत्याही नांवाखालीं केले तरी चालतें. पण तें करावें लागतें हें खरें. अशा रीतीनें प्राप्त झालेलें महत्वाचें सामाजिक कर्तव्य करण्यांत चूक होऊं नये. टाळाटाळी होऊं नये, अथवा परांमुखता उत्पन्न होऊं नये, म्हणून त्यास आपल्या शास्त्रकारांनीं 'ऋण' असें म्हटलें आहे. त्यांत अर्थही फार खोल व विचारणीय आहे, हें शोधक बुद्धीला सहज दिसेल. याकरितां समाजासंबंधानें व्यक्तिविषयक कर्तव्य म्हणून ज्या 'वर्तल्याच्या विवेकाची' आवश्यकता आहे, तो व्यापक असून

सुलभ व सुबोध असावा लागतो. अशा विवेकाची दिशा गीतेंत 'आत्मौपम्यबुद्धि' या नांवाखालीं भगवंतांनीं दाखविली आहे. सर्वांभूतीं परमेश्वर आहे हें तत्व ओळखून 'आमवत् समबुद्धीनें दुसऱ्याशीं वागत जा' असें त्यांनीं सांगितलें आहे. हा विवेक, ही बुद्धि म्हणजे एक अनेक नीतिनियमांचें कोष्ठागारच आहे. कारण लोकांवर दया करणें, त्यांना अभ्युदयाच्या मार्गास लावणें, त्यांच्यावर प्रीति करणें, त्यांना न दुखविणें, त्यांच्याशीं न्यायानें व समतेनें वागणें, द्रव्यापहार न करणें, पुष्कळांचें पुष्कळ हित करण्याची बुद्धि मनांत बाळगणें, सर्वांशीं बंधुप्रेमानें वागणें, इत्यादि अनेक गोष्टींचा अंतर्भाव आत्मौपम्यबुद्धींत होतो. सारांश सर्व नीतिनियमांचें योग्य तऱ्हेनें पारख होण्यास मानवी मनाची उत्क्रांति, वयोमानानुरूप होणारा मेंदूचा विकास, मानवी शरिराची इन्द्रियरचना व त्याचे धर्म, मनाची विकारवशता वगैरे सर्व सृष्टिनियमांना सतत दृष्टीसमोर ठेवून सर्वसाधारण मानवसमाजाला सुकर होईल अशी हिंदुधर्मशास्त्रांतर्गत आश्रयव्यवस्थेशिवाय कोणती विधायक व श्रेष्ठतर उपायें योजना जगावरील इतर कोणत्या समाजांत आढळून येते?

आर्यांनीं केलेली ही योजना समाज धारणेला म्हणजे समाजाच्या शारीरिक मानसिक व बौद्धिक विश्वासाला अनुभवानें इतकी योग्य व उपयुक्त ठरली आहे कीं, पाश्चात्य संस्कृति ही श्रेष्ठतम संस्कृति आहे असें मानणाऱ्या सर्व प्रकारच्या शास्त्रांची आपापल्या समाजाची धारणा करण्याच्या कामांत उडणारी दैना, पाश्चात्य संस्कृतियुक्त समाजाच्या मनांत स्वसंस्कृतीविषयीं उत्पन्न झालेला अनादर आणि आर्यसंस्कृतीबद्दल उत्पन्न झालेला आदर या गोष्टी त्याची साक्ष देत आहेत.

अभ्युदयाच्या उत्तुंग शिखरावर आरूढ होऊनहीं मानसिक चांचल्य, व षड्विकार प्राबल्य, त्यांच्या तीक्ष्ण दाढेखालीं रगडत असतांना विव्हळणाऱ्या पाश्चात्य व्यक्तीकडे व समाजाकडे आणि त्यांच्या अनुयायाकडे पाहिल्यास अभ्युदयाचा घांस तोंडीं येऊनही त्यांना उपाशीं मरण्याची पाळी कां येत आहे या कोटीचा एकदम विचार डोक्यांत येतो. विचार करितां व्यक्तीचें सामाजिक कर्तव्य, समाजाचें व्यक्तीसंबंधाचें कर्तव्य.

व्यक्तीचें व समाजाचें अंतिमसाध्य हीं सर्व क्षुद्र व देवघेवीच्या स्वरूपाचीं आहेत. यामुळें त्यांना सुखाभावांत म्हणजेच दुःख समृद्धींत लोळावें लागत आहे असें दिसतें. विशेषतः त्यांचीं सामाजिक बंधनें ( social ties ) रानटी व असंस्कृत स्वरूपाचीं असल्यामुळेंच उपयुक्ततावाद ( utilitarianism ), सर्वभूत हितरतत्व ( Humanitarianism ), परोपकारीपणा ( Philanthropy ), वगैरे वाद माजवून त्यांची समाज धारणेला अति निकडीची आवश्यकता असल्याचें त्यांना सिद्ध करावें लागत आहे. किंबहुना अशा प्रकारचे वाद, त्यांचा पुरस्कार करणाऱ्या संस्था व त्यांचीं कामें, ह्या सर्व गोष्टी समाज धारणेला उदात्त स्वरूपाच्या धर्मांची जरूरी आहे, तो देवघेवीच्या व सौद्याच्या तत्वावर चालूं शकणार नाहीं, अथवा उद्धारणेसाठीं 'वर्तांयाचा विवेक ' उदात्त स्वरूपाचा पाहिजे अशा कबुलीजबाबाचीं व वाटलेल्या उणीवेचीं प्रत्यक्ष चिन्हें आहेत असें विचारान्तीं पटतें.

वरील सर्व विवेचनावरून ह्या युगांतील प्रगति व सुधारणा ह्यांच्या योगानें समाजाची धारणा न होतां उलट तो डबघाईस येत चालला आहे, याकरितां तद्धारणेसाठीं कोणत्या तरी एका उदात्त तत्वाच्या भक्कम आधाराची आवश्यकता आहे, यासाठीं आर्यांनीं ज्या तत्वाचा आधार घेतला व ज्या दिशेनें विचार केला तो आधार व ती दिशा तरी आज कालयुक्त फेरफारांनीं अनुकरणीय आहे असें वाटूं लागलें आहे असा निष्कर्ष निघतो.

एवंच समाजधारणेला वर्णाश्रम संस्थाच योग्य असें सिद्ध झालें. यानंतर ज्याला आश्रमश्रेष्ठ अशी संज्ञा देतात अशा गृहस्थाश्रमाची थोरवी व महत्व यांचा थोडका विचार करून हें झालेलें विषयांतर संपवूं. ह्या विषयांतराबद्दल वाचकवर्ग मला माफी देतील अशी आशा आहे.

## गृहस्थाश्रमाचें महत्व व थोरवी.

ब्रह्मचर्याश्रम हा जसा चारी आश्रमांचा पाया आहे, तसा गृहस्थाश्रम हा त्यांचा धारण आहे. प्रत्येक व्यक्तीला दोन प्रकारच्या कर्तव्यकर्मांची जबाबदारी जन्मतः प्राप्त झालेली असते. तीं दोन प्रकारचीं कर्तव्यकर्में म्हटलीं म्हणजे एक वैयक्तिक व दुसरें सामाजिक हीं आहेत. हीं दोन्हीं कर्तव्यकर्में चितकीं

यथासांग गृहस्थाश्रमामध्यें करितां येतात, तितकीं दुसऱ्या कोणत्याही आश्रमामध्यें करितां येत नाहींत. म्हणून गृहस्थाश्रमाच्या मोठेपणाच्या अनेककारणांपैकीं हें एक आहे. वैयक्तिक कर्तव्याची परिपूर्णता वैयक्तिक उन्नतींत ( शारीरिक, मानसिक व नैतिक ) होते आणि व्यक्तीच्या सामाजिक कर्तव्याची परिसमाप्ति सामाजिक उन्नतीचा आपल्या वांट्याला आलेला भाग यथायोग्यपणें करून दाखविण्यांत होते.

( २ ) स्वार्थ व परमार्थ एकसमयावच्छेदें करून साधण्याचें गृहस्थाश्रम हें एक रम्य व श्रेष्ठ स्थान आहे. इंद्रियनिग्रह व ज्ञानार्जन हीं ब्रम्हचर्याश्रमाचीं दोन अंगें आहेत. तीं पूर्णावस्थेला येत असतां ज्या अनेक सद्गुणांचें बीजारोपण व्यक्तीच्या मानसोद्यानांत होऊन वृक्ष वाढीला लागलेला असतो. तो वृक्ष सुपुष्पफलयुक्त होण्याचा किंबहुना त्या सद्गुणांच्या खऱ्या खऱ्या व्यवहारिक उपयोगाचा व कसोटीचा योग्य काल हाच आश्रम आहे. **परमेश्वरानें उत्पन्न केलेले सर्व पदार्थ म्हणजे सृष्टि ही मनुष्यानें तिचा योग्य उपयोग करावा म्हणून असून अयोग्य उपयोगाकरितां नव्हे.** याच नियमाला अनुसरून प्रत्येकाला मिळालेला देह व त्याचें सामर्थ्य, मन व त्याचे विकार, गुण व धर्म, आणि मनुष्य प्राण्याला दिलेली विशेष देणगी, जी बुद्धि ती व तिचें सामर्थ्य, ह्या सर्वांचा योग्य म्हणजे स्वोन्नतीला पोषक असा उपयोग करून घेणें हेंच त्याचें खरें कर्तव्य आहे. शारीरिक सामर्थ्य, मनोविकार आणि बुद्धि यांचा सदुपयोग करण्याचा योग्य काल गार्हस्थ्य हाच आहे. हें काम कष्टसाध्यच असल्यामुळें आमच्या शास्त्रकारांनीं तदनुरुप असे नीतिनियम पूर्ण विचारांतीं ठरवून दिले आहेत.

( ३ ) गृहस्थाश्रमाचा मुख्य अथवा मध्यवर्ती भाग पाणिग्रहण व तद्वारें प्राप्त झालेली जबाबदारी हा आहे. पाणिग्रहण विधीचा मुख्य हेतु ' प्रजोत्पादनाय ' या मंत्रभागावरून स्पष्ट होतो. या हेतूचें अंतिम साध्य तरी वैयक्तिक वासनांचें व विकारांचें दमन करून त्यांना आत्मोद्धार प्रवण करणें आणि स्वतः सामाजिक जबाबदारींतून पार पडणें हेंच आहे, असें सूक्ष्म विचार केल्यास दिसेल. वैयक्तिक व सामाजिक उन्नति ह्या दोन गोष्टी गृहस्थाश्रमांत एकदम

कशा होतात हें थोडक्यांत पाहूं. **आत्मोद्धाराची पहिली पायरी चित्तशुद्धी ही आहे.** चित्तशुद्धीची इमारत शमदमादि साधन चतुष्टयावर रचिलेली आहे. साधनचतुष्टय संपादन उत्कृष्ट स्वरूपाचें झालें आहे किंवा नाहीं, त्यांत कमतरता असल्यास ती कशी भरून काढावी वगैरे गोष्टी कौटुंबिय व्यवहारांत अत्युत्तम तऱ्हेनें कळतात. आत्मविश्वास कसा करावा ह्याचें व्यवहारिक शिक्षण मिळण्याजोगें असेल तर तें याच आश्रमांत. **ज्या ब्रम्हचर्याच्या संरक्षणावर व्यक्तीची मानसिक व नैतिक उन्नति अवलंबून असते त्या ब्रह्मचर्यपालन संरक्षणाचा** योग्य **काल तरी हाच आश्रम आहे,** आणि ही कष्ट साध्य गोष्ट तडीस नेण्याकरितांच ऋतुगमनादि निसर्गानुरूप विधिनिषेध आपल्या शास्त्रकारांनी सांगितलेले आहेत. महाराष्ट्रीय साधुसंतांनीं संसाराचें जें भेसूर वर्णन जागोजाग केलेलें आहे, त्याचा तरी उद्देश हाच आहे कीं, प्रत्येकानें मनाचें अधःपतन करणाऱ्या, या आश्रमांतील सर्व धोक्यांचा इशारा घेऊन सावध व्हावें आणि आत्मोद्धाराच्या मार्गापासून चुकूनसुद्धां पराङ्मुख होऊं नये, प्रेम, दया, क्षमा, शांति, परोपकारबुद्धि वगैरे अनेक सद्गुण हीं आत्म विश्वासाचीं उपांगें आहेत. त्यांची क्रमाक्रमानें वाढ होण्यालाही हाच आश्रम योग्य आहे. पाणीग्रहण हें वैय्यक्तिक कामनापूर्तीचें साधन आहे असें मानणें, व त्याला बाजार सौदा ( contract ) समजणें म्हणजे परमेश्वरानें व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं उत्पन्न केलेल्या वासनांचा दुरुपयोग करणें होय. अग्नीचा योग्य उपयोग केल्यास तो अन्न शिजवून आम्हांला जिवंत राखितो; तीच योग्यता मनोवासनांची आहे. आपलें कुटुंब हेंच आपलें जग आहे असें मानून चालणें म्हणजे स्त्रीजातीमध्यें परमेश्वरानें उत्पन्न केलेलें जें दिव्य प्रेम व पाणी ग्रहण विधीनें ज्या प्रेमाचा संयोग पुरुष प्रकृतीशी घडवून आणिला, त्या प्रेमाचा अगदीं दुरुपयोग करणें आहे. अशा प्रकारची जाणीव उत्पन्न करून देण्याच्या इरायानें कीं काय महाराष्ट्रीय साधुसंतांनीं केलेलीं संसाराचीं भेसूर वर्णनें हे इशारें आहेत.

सारांश, कुटुंबांतच लंपट न होतां, कुटुंबाचें पुढें मित्र, आप्त, गोत्रज, ग्रामस्थ, ज्ञातिबंधु, धर्मबंधु आणि अखेर सर्व भूतमात्र या सर्वांच्या ठिकाणीं

स्वतःला पाहणें ही जी ज्ञानाची व आश्रम व्यवस्थेची परमावधी अथवा मानवी साध्याची परिसीमा तीं गांठण्याचा प्रारंभ याच आश्रमांत होत असतो. आणि याच इष्ट सिद्धीकरितां यज्ञयागादि धर्म्ये व चित्तशुद्धिकारक कर्मे गृहस्थाश्रमाच्या मागें कर्तव्य म्हणून आमच्या स्मृतिकारांनीं लावून दिलेलीं आहेत. पण तीं सुद्धां स्वार्थरहित म्हणजे निष्काम बुद्धीनें अथवा केवळ उपर्युक्त साध्य संपादनेच्छेनें केलीं असतां इष्ट परिणामी होतात, हें विसरतां कामा नये. वरील वर्णनांत गृहस्थाश्रमामार्फत साधावयाच्या वैय्यक्तिक उन्नतीचें दिग्दर्शन केल्यानंतर तद्वारें साधावयाच्या सामाजिक उन्नतीचें दिग्दर्शन करून हें विषयांतर संपवितों.

( १ ) व्यक्ति ह्या समाजाचे घटकावयव आहेत, म्हणून समाज सुरळीतपणें चालण्याकरितां या अवयवांची आवश्यकता आहे. ही आवश्यकता पूर्ण करण्याचें काम गार्हस्थ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही आश्रमांत होणें नाहीं. अर्थात् हें जबाबदारीचें काम कसें पार पाडावें ह्याकडे वळणें इष्ट आहे.

नववधूचें पाणिग्रहण करतांना जे मंत्र उच्चारिले जातात त्यांकडे नीट लक्ष पुरविल्यास व्यक्तीवरील सामाजिक जबाबदारींतून कसें सुखरूप बाहेर पडावें हें दिसेल.

‘ गोत्रोत्पन्नां–शर्मणः पुत्रीं–पौत्रीं–प्रपौत्रीं–नाम्नीं कन्यां,–गोत्रोत्पन्नाय—शर्मणः पुत्राय–पौत्राय–प्रपौत्राय–नाम्ने **श्रीधररूपिणे वराय प्रजोत्पादनाय** तुभ्यमहं संप्रददे–प्रतिगृह्यताम्; या सूत्राकडे वरवर पाहिल्यास असें दिसतें कीं, हें सूत्र सकृद्दर्शनीं **वसिष्ठात्रिभृग्वादि** प्रख्यात कुलांची आठवण करून देऊन नंतर त्या कुलांनां अनुरूप मानिलेल्या आपल्या अगदीं अलीकडील वाडवडिलांचें स्मरण करून देतें, परंतु ह्या सूत्राच्या गूढार्थाकडे अधिक खोल दृष्टीनें पाहिल्यास असें दिसतें कीं, **श्रीधररूपी वराच्या द्वारें आपल्या गोत्राला शोभणारी अशीच संतति उत्पन्न करण्याकरितां ही विवाहग्रंथी बांधण्यांत येत आहे.** ही जबाबदारी ओळखून वैवाहिक स्थितींत वर्तन केल्यास व्यक्तिगत सामाजिक जबाबदारी उत्तम

रीतीनें तडीस नेतां येणार नाहीं काय ? यावरून आमच्या शास्त्रकारांनीं विवाहविधीला धार्मिक महत्व कां दिलें व त्याच्यामागें विधिनिषेधादि कर्म-कांडाचा जबरदस्त लकडा कां लाविला ह्याचा उलगडा होईल.

हें एवढें विषयांतर करण्याचें कारण एवढेंच कीं, स्वामीरामतीर्थ यांचीं आर्यस्त्रीत्व व पत्नीत्व यांबद्दल मतें काय होतीं व त्यांचें या बाबतींत वैय्यक्तिक आचरण कसें होतें हें पाहण्यास सुलभ जावें.

## रामाचा संसार

जरी तीर्थराम विद्यार्थीदशेंत असतांनाच गृहस्थाश्रमी होते तथापि त्यांच्या संसाराला एम्. ए. झाल्यानंतरच वयाच्या सुमारें बाविसाव्या वर्षी सुरवात झाली. ' सर्वारंभास्तण्डुलाः प्रस्थमूलाः ' हें संसाराचें, किंबहुना, जीवित यात्रेचें आद्यसूत्र असल्यामुळें तीर्थरामांलाही उदरभरणाची सोय पाहावी लागली. शिकविण्याची फार हौस असल्याकारणानें त्यांनीं एफ. ए. व बी. ए. ह्या वर्गांतील विद्यार्थ्यांकरितां गणिताचा एक खाजगी वर्ग उघडिला. याकरितां त्यांनीं अनुक्रमें दरमहा दहा व पंधरा रुपये प्रमाणें फी ठेविली होती. या वर्गांत महाविद्यालयांतील दोन अध्यापकही (proffessors) शेरीख झाले होते. एवढ्यावरूनच त्या वर्गाची स्थिति लक्षांत येईल. हें गणित शिकविण्याचें अवघड व दगदगीचें काम तीर्थरामांनीं कांहीं महिनेच केलें व आजारी पड-ल्यामुळें त्यांना आपल्या घरीं मुरलीवाला येथें जावें लागलें.

बरे झाल्यावर तीर्थराम लाहोरास परत आले व तेथील ' सनातनधर्म सभेच्या ' शिक्षणमंडळाचे प्रथमतः सभासद व नंतर चिटणवीस बनले. येथून त्यांच्या लौकिक समाजसेवेस प्रारंभ झाला म्हटल्यास चालेल. याच वेळीं त्यांनीं ' वेदिक कॉलेज'मधून चित्रकलेचें ज्ञान संपादन केलें. आजारीपणामुळें गणिताचा वर्ग बंद पडला होता. यास्तव त्यांना पुनः पोटापाण्याची अडचण भासूं लागली. इतक्यांत त्यांना सियालकोट येथील मिशन हायस्कूलांत ऐशीं रुपयांवर बोलाविण्यांत आल्यामुळें ते तिकडे गेले. त्यांचा प्रेमळ स्वभाव आणि गणिताचें असामान्य ज्ञान या दोन गुणांमुळें खुद्द त्यांची ख्याति होण्यांत इत-केंच नसून त्या हायस्कुलावरही विद्यार्थ्यांची संख्यावृद्धि होण्यांत परिणाम झाला.

संसाराचा एकदां 'आणा' सुरू झाला म्हणजे तो कधीं संपत नसतो परंतु रामांची गोष्ट तशी नव्हती. ते ह्या ' आण्या 'ला पूर्णपणें ओळखून होते. शिवाय ते विद्यार्थी दशेंतील कष्टमय दिवसांची आठवण विसरले नव्हते. या काळांतील त्यांचें आवडीचें समाजक्षेत्र ( Social Circle ) छात्रगण हे असल्यामुळें ते त्यांच्याशीं इतक्या प्रेमानें, सहानुभूतीनें, निःस्वार्थी वृत्तीनें आणि सलगीनें वागत कीं, ते मागतलि ती वस्तु तीर्थराम त्यांना देई आणि कधीं कधीं तर तीर्थरामजींच्या नांवावर हलवायांकडून मिठाई व दूध घेत असत. केवढें हें विद्यार्थ्यांवरचें प्रेम ! नुकत्याच सुरू झालेल्या संसारांत पतीच्या कमाईवर पुष्कळशा मागण्या असतात असें सामान्यतः आढळतें. पण ती स्थिति तीर्थरामजींच्या संसाराची नव्हती हें असाधारण नव्हे काय ? त्यांची सर्व कमाई आपल्या सामान्य कौटुंबिक गरजा भागविणें व विद्यार्थ्यांकरितां खर्च करणें यांतच खर्च होई. ' त्यक्तेन भुञ्जीथाः ' याचाच हा प्रारंभ म्हणावयाचा.

एक वर्षानंतर म्हणजे इ. स. १८८६ सालीं याच शाळेच्या बोर्डिंग हाउस सुपरिंटेन्डटचें कामही तीर्थरामजींकडे आलें. यामुळें विद्यार्थ्यांमध्यें मिसळणें, त्यांच्या वागणुकीला वळण लावणें, व त्यांमध्यें एका विशेष प्रकारचें पाणी उत्पन्न करणें ह्या तीर्थरामाच्या आवडीला या नवीन जबाबदारीच्या कामामुळें दुजोरा मिळाला. परंतु विद्यार्थ्यांच्या दुर्दैवानें लवकरच तीर्थरामजींना लाहोरच्या फोरमन ख्रिश्चन कॉलेजमध्यें गणिताध्यापकाच्या जागीं नेमणूक झाल्यामुळें जावें लागलें.

सियालकोट येथें असतांना देखील स्थानिक सनातन धर्म सभेमध्यें भाग घेऊन आपल्या स्फूर्तिदायक संभाषणांनीं तीर्थरामजी समाजसेवा करीत होते. तरुण विद्यार्थ्यांच्या, राष्ट्राच्या भावी आधार स्तंभाच्या मनाला व वर्तणुकीला वळण लावणें, त्यांच्या सहवासांत काळ घालविणें आणि सनातनधर्म सभेसारख्या धार्मिक संस्थेंत उत्साहानें भाग घेणें, ह्या गोष्टी तीर्थरामजींची मानसिक स्थिति कोणत्या स्वरूपाची होती ह्याबद्दल साक्ष देण्याला पुरेशा आहेत. इंग्रजी शिक्षण आणि तेंही एम्. ए. पर्यंत व पाश्चात्यांच्या

अपकेबाज सुधारणांचा लखलखाट यामुळें तत्कालीन तरुण भारतीयांच्या ठिकाणीं सामान्यतः दिसून येणाऱ्या स्वाभिमानशून्यता, स्वत्वाभाव, स्वधर्मपराङ्मुखता ह्या गोष्टी एकीकडे आणि तीर्थरामजींचा तरुणपणचा संसार आणि त्यांचें सात्विक कार्यक्षेत्र दुसरीकडे असें चित्र पाहिल्यास तीर्थरामजींचा मनोविकास फारच उठावदार दिसतो. संसार व तत्कालीन राष्ट्रीय मनाची विकृत स्थिति यांसारखा तरूण मनाला आपल्या उच्च ध्येयापासून च्युत करणारीं व मानसिक अधःपतन करणारीं आमिषें असतांनाही तीर्थरामजींच्या मनाचा वारा उच्च ध्येयाकडे वाहतांना पाहून विद्यार्थी दशेमध्यें होणाऱ्या मनःसंस्कारांचें प्राबल्य ताबडतोब लक्षांत येतें; व आपली तरुण पिढी राष्ट्रोद्धारक बनविण्याकरितां त्यांचें शिक्षणच कसें कारणीभूत होते ह्याची ताबडतोब खात्री पटते.

## पुनः लाहोर

'फोरमन' महाविद्यालयांत प्रोफेसर असतांना तेथील पौर्वात्य महाविद्यालयांत ( oriental college ) 'रीडर' चें कामही तीर्थराम करीत. या नौकरीमुळें त्यांना मिळणाऱ्या सर्व पगाराचा विनियोग स्वतःच्या कौटुंबिक अगदीं निकडीच्या गरजा भागविणें व लायक विद्यार्थ्यांना व व्यक्तींना दान करणें यांत केला जाई. या काळांतील तीर्थरामजींचें आचरण विशेष लक्ष देण्यासारखें व अनुकरणीय होतें. या नौकरीमुळें ते समाजांतील एका विशेष दर्जावर ( position ) आलेले होते. यामुळें इतर सामान्य जनांप्रमाणें त्या दर्जाला अनुरूप अशी रहाणी बनविणें, शारीरिक सुखांची वृद्धि करणें, सभ्यतेचीं व्यसनें लावून घेणें, खाणेंपिणें व पोषाख यांत चैन करणें, धनसंचय करणें वगैरे अनेक गोष्टी 'काय करता, आह्मांला समाजांत रहावयाचें आहेना ?' या पोकळ सबबीखालीं त्यांना करितां आल्या असत्या अगर कराव्या लागल्या असत्या. परंतु मनोधैर्याचा कोतेपणा व उच्च ध्येय जाणीवेचा अभाव दाखविणाऱ्या असल्या सबबींखालीं दबून रहाणारे ते नव्हते यामुळें 'कोणी निंदा कोणी वंदा । आह्मां स्वहिताचा धंदा' हाच मार्ग त्यांनीं पत्करिला व वरील सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष्य केलें. त्यांची पत्नीही त्यांना अनुरूप अशीच मिळाली

होती, ही आनंदाची गोष्ट आहे. तथापि ती तशी नसती तरीसुद्धां त्यांच्या खंबीर मनापुढें तिचा टिकाव लागला नसता. ती खरी खरी पतिगामी सह-धर्मचारिणी आर्य स्त्री होती, व ती आपल्या पतीच्या मानसिक उन्नतीच्या यत्किंचितही आड न येणारी पण उलटपक्षीं यथाशक्ती मदत करणारी होती. ही गोष्ट खुद्द तीर्थरामजीही कबूल करितात. पुढें दिलेल्या पत्रावरून तीर्थ-रामजी खरोखर त्यागी अथवा संन्यासी बनत होते असें दिसतें.

'जून १८९६

आपलें कृपापत्र पावलें. मी सर्वस्वी आपला आहें. कोणत्याही वस्तूला माझी समजून बसलेलों नाहीं. **द्रव्यसंग्रह हें सुखाचें साधन आहे अशी माझी समजूत नाहीं.** दागिने करण्याचा अथवा कोणत्याही सांसा-रिक वस्तूंचा संग्रह करण्याचा विचार माझ्या डोक्यांत नाहीं. आपल्या कृपेनें घराच्या ऐवजी वृक्षाची छाया, वस्त्रांच्या ऐवजीं विभूति, शय्येला भूमि आणि क्षुधाशान्त्यर्थ भिक्षान्न मिळेल तर त्यांतही मी अत्यानंद मानीन. **भिकाऱ्या-प्रमाणें राहण्याची आज्ञा आपण कराल तर या सर्वांचा त्याग करून** साधूप्रमाणें राहण्यालाही **माझी तयारी आहे**.......या सेवकाला केवळ कर्म करीत रहाण्यांतच, तसेंच परमात्म्याचें अखंडानुसंधान राखण्यां-तच इतकें सुख वाटतें कीं, त्याला बाह्य विषयांपासून प्राप्त होणारें सुख, अवडं-बर व थाटमाट यांची कांहींच आवश्यकता वाटत नाहीं. ईश्वरार्पण बुद्धीनें कार्य करण्यांतच मला सुख वाटतें. **सांसारिक पदार्थांच्या संग्रहानें माझा आत्मा मोठा होत नाहीं, किंवा त्यांच्या कमतरतेमुळें तो लहानही होत नाहीं. तो सर्वदा आनंदरूप आहे...............**

सेवक तीर्थराम'

यावेळीं तीर्थरामजी जरी अध्यापकाच्या कामावर होते; तथापि ते स्वतः विद्यार्थीच होते. किंबहुना त्यांचें सर्व आयुष्यच विद्यार्थीदशेंत गेलें. त्यांनीं आपल्या आयुष्याचा एकही क्षण व्यर्थ न घालवितां कामीं लाविला हें पाहिलें

म्हणजे

काळ जातो क्षण क्षण । मूळ येईल मरण ॥
कांहीं धांवाधांव करी । जंव तो मृत्यू आहे दूरी ॥

या रामदासोक्तीची आठवण होते. या काळांतील **त्यांचा अभ्यास विश्वविद्यालयाची परीक्षा देण्याकरितां चालला नसून ब्रह्मज्ञान-प्राप्ती करून देणाऱ्या पवित्र संन्यास संस्थेची परीक्षा उत्तीर्ण होण्याकरितां चाललेला होता**. हा झाला त्यांच्या अध्ययन अध्यापना-संबंधींचा विचार. गृहस्थाश्रमांतील कर्तव्यकर्मांमध्यें यजन व याजन ह्या दोन कर्मांस प्राधान्य दिलें जातें. तीर्थरामजींनीं अविद्या नाशाकरितां भक्ति व ज्ञान यांचें होमकुंड चेतविलें होतें व त्यांत आपल्या संकुचित ममत्वाची आहुति देण्यास ह्मणजे आपल्या संकुचित ममत्वाचा विकास करण्यास ते शिकत होते. यासंबंधांत त्यांचें 'यज्ञरहस्य' ( spirit of Yajna ) हें व्याख्यान वाचनीय आहे त्याचप्रमाणें ज्ञानदानाचें पवित्र कामही ते करीत होते. सर्वांत ज्ञानदान हेंच श्रेष्ठ आहे. ते ह्मणतात

सबसे बढकर तो तीसरा है दान् ।
दान ईश्वरका, ज्ञानहीका दान ॥
पंडितो! ज्ञान दान दीजिये गा।

गणिताचे अध्यापक या नात्यानें काम करीत असतांना ते विद्यार्थ्यांना जे ज्ञानदान करीत तें किती उच्चस्वरूपाचें व उदात्त ध्येयाचें होतें याची साक्ष त्यांचा त्या विषयावरील निबंधच पटवील. शिवाय सियालकोट व लाहोर येथील सनातन धर्मसभेमार्फत त्यांनीं जीं व्याख्यानें दिलीं, जें जिवंत ज्ञान-दान केलें, त्याची योग्यता खुद्द **नारायणस्वामींच्या** ( स्वामी रामतीर्थांचे पट्टशिष्य ) तोंडूनच ऐकविणें बरें.

" कृष्णलीला व कृष्णगीता यांवरील गुसांईजीच्या व्याख्यानांनी माझ्या

---

१ ब्रह्मविद्या, आत्मज्ञान. ( २ ) mathematics, its importance and the way to excel in it हा त्यांचा निबंध याच ( इ. स. १९१८ ) काळांतील आहे.

मनावर जो विलक्षण परिणाम झाला तो अवर्णनीय आहे ! त्या वेळीं श्रीकृष्णाचें आचरण गर्हणीय आहे असें मी समजत होतों; व रासलीलेकडे तर मी नाकें मुरडीत होतों. गीतेवर विशेष श्रद्धा नव्हती. अशी स्थिति असूनही गुसांईजीचीं प्रेमभरित व्याख्यानें ऐकतांच, गीता वाचावी व कृष्णलीलांचा लक्ष्यार्थ समजवून घ्यावा असें मला वाटूं लागलें." एकंतरींत ते जरी आत्मज्ञानाचें दान करण्यास या काळांत समर्थ नव्हते तरी ते जे ज्ञान देत तें कोणालाही आत्मज्ञानप्रवण करणारें होतें असें दिसतें. तीर्थरामजींच्या या साधकावस्थेंतील नित्यक्रम समजला असता तर किती बहार उडाली असती ! परंतु तो अद्यापि अप्रसिद्ध आहे हें आमचें दुर्दैवच म्हणावयाचें ! सारांश या काळांतील त्यांचें आचरण गृहस्थाश्रमी ब्राह्मणास अगदीं साजेसें होतें असें म्हटल्यास तें वावगें होणार नाही.

## निस्सीम भक्ति व सगुण साक्षात्कार

तीर्थराम हे कृष्णाचे अनन्य भक्त होते. त्यांना गीतावाचनाचें इतकें वेड होतें कीं, त्यांनीं त्यांतील गूढार्थ समजून तिच्याशीं समरस होतां येईपर्यंत ती वाचली. गीतेचें मनन अशा प्रकारें झाल्यावर श्रीकृष्णांचा निदिध्यास लागावा हें साहजिकच आहे. उन्हाळ्याची सुट्टी येतांच ते मथुरा वृंदावन येथें जात व सारी सुट्टी रासलीला पाहण्यांत घालवीत. कृष्णलीला पाहून तर त्यांना गुदगुल्या होत. अशा रीतीनें श्रीकृष्ण भक्तीची तीव्रता इतकी वाढली कीं, ते रात्रीच्या रात्री श्रीकृष्णाच्या दर्शनासाठीं इतके रडत कीं, त्यांच्या बिछान्यावरील पलंगपोसही ओला चिंब होई ! *कधीं कधीं रावीच्या कांठीं जाऊन श्रीकृष्णाच्या ध्यानांत इतके गढून जात कीं, रात्र किती झाली हाही पत्ता त्यांना नसे !

---

* " Who weeps for God finds him. "
( Sayings of Ramkrishna )

" Thou shalt see the father when the heart will pant for him as it has panted for breath of air just now. " ( Bible )

## भक्तीचें वेड

भक्ताचें अंतःकरण पाण्यांतून बाहेर काढिलेल्या माशाप्रमाणें परमेश्वर दर्शनासाठीं तळमळूं लागलें म्हणजे त्याचें देहावरील व देहधर्मावरील सर्व भाव नाहींसे होऊन प्रत्येक वस्तूंत, प्रत्येक ठिकाणीं आपली उपास्य देवताच दिसूं लागते. अशी स्थिति झाली म्हणजेच देवदर्शनाला भक्ताची मनोभूमिका तयार झाली असें मानितात. अशा स्थितींत भक्ताला भूक, तहान इत्यादिकांचें भानही रहात नाहीं. तुकाराम, रामदास, रामकृष्ण परमहंस, तुलसीदास इत्यादि भक्तोत्तमांच्या चरित्राकडे पाहिल्यास वरील विधानांना पुरावा मिळतो.

भगवद्दर्शन पिपासा हीं अशी कांहीं चीज आहे की, ती प्राप्त होईपर्यंत 'तगबग मज वाटे कंठ दाटोन येई' (रामदास) अशीं स्थिति होते. भक्त पाण्याबाहेर काढिलेल्या मासोळीप्रमाणें तळमळत असतो, मनुष्याला जसें आपल्या प्रियेचें ध्यान लागतें, एकुलता एक मुलगा मरण पावला असतां मातेची जी मनःस्थिति होते, प्रभु रामचंद्रांची सीताहरणानंतर जी स्थिति झाल्याचें निदान बाह्य जगाला तरी दिसलें, अथवा तुलसीदासांची कामुकतेमुळें जी वृत्ति झाली होती तशीच स्थिति या कालांत तीर्थरामजींची झालेली होती; कृष्ण दर्शनाच्या तृष्णेनें त्यांचा जीव कासावीस झालेला होता; यास्तव नुसतें 'कृष्ण' हें नांव ऐकतांच ते कावऱ्या बावऱ्या नजरेनें इकडे तिकडे पहात. बांसरीचा आवाज ऐकतांच ते अगदीं मुग्ध बनत! अशा या विव्हळ स्थितींत ते नेहमीं असत. यास्तव इष्टमित्र अगर समव्यवसायी यांमध्यें निष्कारण गप्पा मारीत ते कधींही बसत नसत. यावेळीं 'सोसायटीचा' प्रश्न त्यांच्या मनालाही शिवला नाहीं, अथवा ते मंडळींत मिसळत नसत. यांचा कांहींही परिणाम त्यांच्या रहाणीवर, दर्जावर अगर सांसारिक परिस्थितीवर झाला नाहीं.

प्राण निघून जात आहे अशा स्थितींत देखील जेव्हां उपास्य देवतेशिवाय दुसरें कांहीं आठवणार नाहीं तेव्हांच, दर्शनाची इतकी तळमळ लागेल तेव्हांच, परमेश्वर भक्ताला दर्शन देतो. याचें प्रत्यंतर समर्थांनीं सगुण साक्षात्कारासाठीं ज्या घळींत दिवसच्या दिवस काढिले तेथील चरित्रांत,

अगर भामाडोंगरावरील तुकोबांच्या चरित्रांत अथवा इतर संत चरित्रांमध्यें पहावयास मिळतें.

अशा प्रकारची तळमळ तीर्थरामजींच्या मनाला लागली होती. हें त्यांच्या एतद्‌कालीन रहाणीमध्यें दिसून येते. या अवस्थेंत भक्ताचा जो स्वगत संवाद चालतो तो बोधाई असतो हें पुढील माहितीवरून स्पष्ट होईल. याकरितां तिकडे वळूं.

एकदां तीर्थरामजी रावीच्या किनाऱ्यावर जंगलांत एकटे फिरत असतांना आकाशांत कृष्णमेघ येऊन थडकले. इतक्यांत त्यांकडे तीर्थरामजींची नजर गेली व त्यांना पहातांच ते एकदम मोठ्यानें रडूं लागले व त्याबरोबरच रडक्या स्वरानें ह्मणूं लागले, " हे कृष्ण, हे घनश्याम ! हा कृष्ण मेघ तुझ्याच रंगाचा आहे. यामुळें हा मला व्याकुल करीत आहे. हे प्यारे, तूं असा लपंडाव कां खेळतोस ? तूं कोणत्या कुंजामध्यें दडून बसला होतात तें सांग तर खरें. अरे घनराज, तुला उंचावरून पुष्कळच दिसतें. ह्मणून गड्या, माझा कृष्ण कोठें आहे ते सांग पाहूं ? हं समजलों, तूं सुद्धां त्याची स्पर्धा करण्यासाठी आपला रंगही कृष्ण बनविला आहेस काय ? मला त्या प्याऱ्याचें दर्शन नाहींका होणार ? हाय ! हाय ! ही अलंदुनिया त्या प्याऱ्या कृष्णाच्या दर्शनाशिवाय व्यर्थ आहे. तद्दर्शनासाठीं होणारें विरहदुःख मी आतां कोणापुढें मांडू ? हे कृष्णा, तुझ्याकरितां मी नात गोत, मित्र व सुहृद या सर्वांना वाटाण्याच्या अक्षता लाविल्या. आतां तुझ्याशिवाय मला कोण आहे ? हे मेघराज, माझ्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात आहेत हें तूं पहातोसच. करितां त्या बेपर्वा कृष्णाला माझ्या वतीनें असा निरोप कळीव कीं,

" मजा बरसातका चाहे मेरी आंखोंमें बैठो,
सियाही है, सफेदी है, शफक है, अबरे बारान है. "

अरे, आतां किती वेळ तरी रे मी वाट पाहूं ? आतां नाहींरे धीर निघत. आतां एकतर तूं मला नाहींसा कर, अगर आपल्या दर्शनामृतानें माझी तहान, व तगमग नाहींशी कर. नाहींतर माझ्या जिवाची राखरांगोळी होईल ती तूं

दुरून तमाशाप्रमाणें पहात रहा. कां रे, सूर्याला प्रकाश, चंद्राला शांति व सौंदर्य, आणि पुष्पांना तऱ्हेतऱ्हेचे रंग व फुलणें ह्या गोष्टी न मागतां तूं दिल्यास आणि मी मागतों तें मला दिलेंस तर काय तूं भिकारी होशील का? का तुझा खजिना संपेल? ह्मणून हे कृष्णा, याउपर जर तूं दर्शन देणार नाहीस तर मात्र हे शीर धडापासून वेगळे होईल व डोळेमात्र तुझी मार्गप्रतिक्षा करीत उघडेच रहातील."

अर्से सांगून कृष्णा, कृष्णा, असा टाहो फोडींत तीर्थराम बेशुद्ध पडले. रात्रीं दोन वाजेपर्यंत तसेच होते. अशा स्थितींत तीर्थराम वारंवार पडूं लागले. तेव्हां मग ही त्यांची स्थिति सर्वांना विदित झाली.

**लाला अयोध्या प्रसाद** नांवाचे **हुशारपूरचे** वकील असें सांगतात, 'एकदां लाहोर येथील एका देवळांत रामायण चाललें होतें, व श्रोतृगणांमध्यें तीर्थरामही होते. कथा ऐकतां ऐकतां थोड्याच वेळानें लहान मुलाप्रमाणे तीर्थराम ओकसाबोकशीं रडूं लागले. लोकांनीं व पुराणिकानेंही त्यांची पुष्कळ समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ! रडून रडून अखेरीस तीर्थराम बेहोष होऊन पडले तेव्हां मात्र कथा बंद करणें भाग पडलें! कांहीं वेळानें तीर्थराम सावध झाले तेव्हां तरी त्यांच्या तोंडून 'हे कृष्णा माझ्यावर दया कर, मला दर्शन दे. किष्किंधा नगरींतील वानरांपेक्षांही मी कमी आहें काय? अथवा भिल्लिणीपेक्षांही क्षुद्र प्रतीचा आहें काय? अगर तूं दर्शन देत नसलास तर आतां मात्र हे सर्व उपाय (भक्तीचे प्रकार व रीत) चुलींत जाऊं दे, सर्व इज्जतीची राखरांगोळी होऊं दे, आणि हें माझें शरीरही नष्ट होऊं दे.' असे शब्द निघत होते.

तसेंच उन्हाळ्याच्या सुट्टीच्या दिवसांत तीर्थराम एके दिवशीं **रावीच्या** किनाऱ्यावर फिरत होते. इतक्यांत एका पक्ष्याचें मधुर गायन ऐकून ते झटकन् त्या पक्ष्याकडे वळून त्याला म्हणाले, 'अरे तुझ्या आवाजांत हा मोहकपणा कोठून आलारे? तूं त्या बांसरीवाल्याला पाहिलेंस वाटतें? छे! मला वाटतें, तूं त्याचा आवाजच उधार आणिला आहेस. खरेंच तूं त्याला पाहिला आहेस काय? तो मला कसा व केव्हां भेटेल तें सांग ना. अरे,

नेत्रांनो ! तो प्यारा कृष्ण पाहण्याचें सामर्थ्य तुमच्यांत नसेल तर जा, आतां-च्या आतां फुटून जा ! अरे हातांनो, तुम्हाला जर त्याचा चरणस्पर्श होता नसेल तर तुम्ही असून तरी काय कामाचे ? जा. गळा, जळा ! '

याच महिन्यांत ( इ. स. १८९५ सालांतील )

पुनः एके दिवशीं घाबऱ्यां घाबऱ्यां तीर्थराम म्हणूं लागले, " अरे देवा, आणखी एक दिवस गेला तरी दर्शनाचें भाग्य नाहीं ! दिवसामागून दिवस जात आहेत, तरीसुद्धां दर्शन नाहीं ! मला वाटतें, माझें सर्व आयुष्य असेंच व्यर्थ जाणार ! यो जन्मांत तरी मी कांहीं गुन्हा केल्याचें स्मरत नाहीं. बरें, मी पापी, गुन्हेगार, कबूल. पण आतां मी तुला शरण आलों ना ? मग ? दर्शन दे, निदान ओझरती झुळक तर दाखव. हे नाथ, अथवा प्राण दिल्यास तुमचें दर्शन होत असेल तर तेही घ्या. पण दर्शन द्या ! घ्या, घ्या प्राण. असें म्हणून ते मोठ्यानें रडूं लागले. सर्व कपडे भिजून चिंब झाले ! व अखेरीस मूर्च्छित पडले ! थोड्या वेळानें जेव्हां डोळे उघडले, तेव्हां त्यांनीं एक काळा सर्प फूत्कार करीत पुढें उभा असलेला पाहिला. लाग-लेच उठून बसले व कृष्ण, कृष्ण असा उच्चार करीत म्हणाले, ' आपण या रूपानें मला दर्शन दिलेंत ! ' असें म्हणून पुनः बेभान होऊन पडले. पण पुनः उठून पहातात तों साप गेला. म्हणून म्हणूं लागले ' नाथ, भेट झाली तर खरी. पण मनांतलें मनांतच राहिलें. मी तर आपल्या श्यामसुंदर मूर्तीच्या दर्शनाची इच्छा करीत आहे. ज्या स्वरूपावर मोहित होऊन त्या गोपींनीं आ-पले देह ओंवाळून टाकिले, आरती केली, तें स्वरूप मला पाहिजे. अरे मन-मोहना, कृष्णा,' असें म्हणत पुनः बेहोष होऊन पडले.

थोड्या वेळानें शुद्धीवर येतांच तेथें उभा असलेला एक त्यांचा मित्र त्यांना म्हणाला, " गुसांईजी, ज्यांचा शोध तुम्ही करीत अहांत, तो तर तुमच्या-जवळ, प्रत्यक्ष तुमच्या हृदयांत आहे. " हे शब्द कांनीं पडतांच तीर्थराम-जींनीं तो हृदयस्थ परमात्मा हुडकून काढून त्याचें इष्ट दर्शन घेण्याकरतां कपडे फाडले व त्या प्याऱ्या कृष्णाच्या दर्शनाच्या आड येणाऱ्या अस्थिचर्ममांसा-च्या पिंजऱ्याचीही फाडाफाड चालविली ! व म्हणूं लागले, ' अरे तूं जर येथें

लपून बसला आहेस तर आतां पहातों, कोठें छपतोस व पळतोस तो.' इत-क्यांत नखें जोरानें लागतांच आंतून रक्त येऊं लागले! तरीसुद्धां यांचें काम चालूच होतें!! हा भयंकर प्रकार पाहून त्यांचा मित्र धांवून गेला व त्यांचें हात धरून म्हणाला, 'गुसांईजी, थांबा, भगवान् आपल्याला खात्रीनें दर्शन देईल.' यावर ते उत्तरले, 'काय? नाथ बाहेर येतील? येणार नसतील, तर मग पहातों कसें काय बाहेर येत नाहीत ते.' इतकें बोलून पुनः गुसांईजी स्तब्ध पडले. ते संध्याकाळीं जागे झाले. तेव्हां वृत्ति अगदीं शांत होती.

सनातन धर्मसभेच्या व्यासपीठावरून 'कृष्ण' अथवा 'भक्ति' या विष-यांवर व्याख्यान देतांना त्यांच्या डोळयांतून सारखा अश्रुपात होऊन कपडे प्रेमाश्रूंनीं भिजत व व श्रोतृवृंदही कृष्णभक्तींत त्यांच्याबरोबर गढून जाई! अशा तीव्र भक्तीच्या काळांतः—

(राग पिलू-दीपचंदी)

गलत है कि दीदार की आर्जू है।
गलत है कि मुझको तेरी जुस्तजू है॥

असे उद्गार त्यांच्या तोंडून निघावे हें अगदीं सहज आहे. दर्शनाची तीव्र लालसा अंतःकरणांत जागृत झाली तेव्हां तीर्थराम म्हणतात,

जिधर देखता हूं, उधर तूं ही तूं है॥
मकां कौनसा है तूं जिसमें जो नहीं है॥

अशी वृत्ति होऊन जाते. जेव्हां राम या मानसिक अवस्थेला पोंचले तेव्हां त्यांना त्यांच्या प्याऱ्याचें दर्शन झालें. ते एकदां नारायण स्वामींना म्हणाले "मी स्नान करीत असतां आमच्या प्रियकर श्यामसुंदर कालियामर्दनाचें दर्शन झालें. आमचे प्रियकर अगदीं जवळ येऊन दृढालिंगन देऊन गुप्त झाले." असा प्रसंग त्यांच्यावर वारंवार येई असें ते म्हणत. त्यांनीं आपली प्रत्येक

१ दर्शन. २ इच्छा. ३ जिज्ञासा.

१ ठिकाण, घर. २ कोणचें. ३ जी, ज्या. ४ जागा, स्थान.

आशा वा कामना कृष्णार्पण केली होती म्हणून तर त्यांना हे दर्शन घडलें. दर्शनानंतर भक्ताची अवस्था कशी होते याचें वर्णन खुद्द ते असें करितातः–

( राग तेलंग–ताल दादरा. )

इक[1] ही दिल था सो[2]भी दिल[3]बर ले गया अ[4]ब क्या करूं।
दुसरा पाता[5] नहीं, किस[6]को * कहूं अब क्या करूं ॥ १ ॥
ले † चुका था जाने–जा[7]नां जां[8] को पहिले हाथसे।
फिर[9]भी ह[10]मले कर रहा, किसको कहूं अब क्या करूं ॥ २॥
हम तो दर–प[11]र मुन्त[12]जर थे, तिशन–ए–दीदा[13]रके।
पहुंच[14]ते बिस[15]मिल किया, किसको कहूं अब क्या करूं ॥३॥
याद्‌दाश[16]तके लिये, रहता था फोटो[17] जिस्मो–जां[18]।
वह भी जायल[19] कर दिया, किसको कहूं अब क्या करूं॥४॥
यारके मुंहप[20]र झरोखेसे नज़र इक जा पड़ी।
देखते घायल हुआ, किसको कहूं अब क्या करूं ॥ ५ ॥
आपको भी कतल कर, फिर आपही इक रह गया।
वाह नज़ाक[21]त आपकी, किसको कहूं अब क्या करूं ॥ ६ ॥

रूपांतर

( चाल—चंद्रकांतरायाची ).

त्या प्यार्‍यानें चोरुन नेलें अंतःकरणाला।
दुजें नच मिळे काय करूं मी, सांगू कवणाला ॥ १ ॥

---

१ एक. २ तो सुद्धां. ३ प्यारा, जिवलग. ४ आतां. ५ मिळत. ६ कोणाला * सांगूं. † घेऊन चुकला. ७ जिवाहून प्यारा. ८ प्राण, आत्मा, जीव. ९ पुनः. १० हल्ला, चढाई. ११ दारावर. १२ तय्यार, हजर. १३ दर्शनाचा भुकेला. १४ मिळतांच, प्राप्त झाल्यावर. १५ मार दिला, घायाळ केलें. १६ आठवणीकरतां, स्मरण म्हणून. १७ तसबीर, चित्र. १८ शरीर प्राण. १९ नष्ट. २० तोंडावर. २१ थोरवी.

कृष्ण लाडका ओढुनि नेई पंचप्राणांला ।
विरमे अजुनि न हल्ल्यांवरती चढवी हल्ल्यांला ॥ २ ॥
त्या प्याऱ्याच्या द्वारीं जाउनि मी केला गिल्ला ।
ज्या साठीं. तें दर्शन घडतां सर्वच बिसमिल्ला ॥ ३ ॥
मम प्याऱ्याच्या दर्शनमात्रें झालों घायाळ ।
सर्व लोपलें मी पण गेलें प्यारा लडिवाळ ॥ ४ ॥
माझ्या 'मीची' कत्तल करुनि आपण अवशिष्ट ।
मेहेरबानी केलित मोठी देवा, ही इष्ट ॥ ५ ॥
काय करूं मी कथूं कुणाला समाधान मोठें ।
प्याऱ्या कृष्णा, तुझ्यां वांचुनि जाउं इतर कोठें ॥ ६ ॥

भक्ताला परमेश्वर दर्शन, त्याच्या उपास्य देवतेचें दर्शन होणें ही गोष्ट तो भक्त साधकावस्थेत असतांना घडलीच पाहिजे व घडतेही. 'अहं ब्रह्मास्मि' हा अनुभव घेण्यापूर्वी साधकाच्या अंगीं ध्यान धारणेचें जें सामर्थ्य यावें लागतें, त्याची ही एक पायरी आहे. त्या स्थितीप्रत तीर्थराम येऊन पोंचले होते.

अद्यापपर्यंत राम नौकरींतच होते. तथापि चित्ताच्या वाढत्या धार्मिक अवस्थेंत व उदारतेच्या स्थितींत निव्वळ पोटासाठीं सहा सहा तास घालविणें त्यांना असह्य वाटूं लागलें. कधीं कधीं तर ही नौकरी महान् स्वार्थ साधण्याकरितां सोडावी असाही विचार त्यांच्या डोक्यांत येई. परंतु वाढत्या संसाराची बिडी त्यांच्या पायांत असल्यानें त्यांना ती इच्छा पुरी करितां आली नाहीं, असें नसून अशा लहरीला अविचारानें बळी पडण्याइतकें त्यांचें मन चळमळीत नव्हतें.

प्रपंचीं जो सावधान, तो परमार्थ करील जाण, ।
प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ ६ ॥
म्हणोनि सावधानपणें, । प्रपंच परमार्थ चालवणें,
ऐसें न करितां भोगणें । नाना दुःखें ।
( दा. बो. द. १२ स. १ )

ही दृष्टि त्यांच्याजवळ असल्याकारणानें त्यांनीं आपल्या एका *मित्राला माझ्या कुटुंबाची चांगली तरतूद केल्याशिवाय मी बाहेर पडणार नाहीं असें उत्तर दिलें होतें. त्या वेळीं तीर्थराम पूर्वीप्रमाणें सहा तासाच्या नोकरीवर नसून 'वेदान्त व गणित' हे विषय लाहोरच्या ओरिएन्टल कॉलेजमध्यें दोनतीन तास शिकवीत.

**सद्वासनापूर्ति करणें हेंच परमेश्वराचें काम आहे. व तें तो करतोही.** या सुमारास द्वारका मठाचे श्रीशंकराचार्य **राजराजेश्वर तीर्थ स्वामी** दैवयोगानें **लाहोरास** आले. ते उपनिषदें, ब्रह्मसूत्रें व वेदान्त इत्यादिकांत अति निपुण होते. शिवाय त्यांची विद्वता व स्वरूपनिष्ठा सर्वांना महशूर होती. लाहोरच्या धर्मसभेचे मंत्री या नात्यानें त्यांची सेवा करण्याची संधि त्यांना मिळाली, व ती त्यांनीं मोठ्या उत्साहानें पार पाडिली. भक्तीच्या सिंचनानें पवित्र झालेली ती तीर्थरामजींची ब्रह्मज्ञानोन्मुख मनोभूमिका पाहून त्यांना आनंद वाटून आपल्याबरोबर येण्याची इच्छा श्रींनीं प्रदर्शित केली. हें पाहून तीर्थरामांना फार आनंद झाला व त्यांनीं श्रींबरोबर जाण्याचा बेत केला. श्रींबरोबर तीर्थराम काश्मीरास जाऊन तेथें त्यांच्या मंत्र्याचें काम पाहूं लागले व त्यानीं मोठ्या प्रेमानें श्रींची सेवा केली. **अध्यात्ममार्गावरील वाटसरूला सत्समागम, संतसेवा व सच्छास्त्र श्रवण या उतान्यांवरून जावें लागतें.** तो सुयोग गुसांईजींना या यात्रेंत आला. वास्तव ब्रह्मसूत्रें व उपनिषदें यांवरील भाष्य त्यांना उत्तम रीतीनें ऐकण्यास व शिकण्यास सांपडलें. 'शास्त्रे परेच निष्णातः' असा श्रींसारखा वक्ता आणि शुद्ध प्रेम आणि श्रद्धायुक्त अंतःकरणाचा गुसांईजीसारखा श्रोता या दोघांची गांठ पडल्यावर या समागमाचा परिपाक द्वैतनिरासांत न व्हावा तर कसा व्हावा ? आतां तीर्थरामजींच्या चित्तावर वेदान्ताचा पगडा पूर्णपणें बसला. 'आत्मज्ञानं विना पार्थ' हें गीतेंतील तत्व त्यांना उमजलें. भक्ति व ज्ञान यांची सहकारिता खुलून दिसूं लागली व तेव्हांपासून ते पूर्ण श्रद्धेनें व प्रेमानें श्रींच्या आज्ञा मानूं लागले. सुट्टी संपतांच

* 'वनस्पतिजी' नांवाचा त्यांचा विद्यार्थीदशेंतील सहाध्यायी व सवंगडी होता. त्याला त्यांनीं वरील उत्तर दिलें.

तीर्थराम परत येण्यास निघाले; तेव्हां त्यांना असा उपदेश मिळाला कीं, "पहा ही ज्ञानाची लाली व मस्ती कमी होऊं देऊं नका; दिवसेंदिवस यांची वाढ करीत जा, आणि लालीचा रंग इतका चढूं द्या कीं तो फुटून अंतर्बाह्य दिसूं द्या. ही अंतिम अवस्था प्राप्त होईपर्यंत अभ्यास सोडूं नका."

## असहकारितेचीं चिन्हें

राम लाहोरास परत आल्यावर वेदान्ताचें अहोरात्र श्रवण मनन करूं लागले. पोटासाठीं व कुटुंबासाठीं करावी लागणारी दोन तीन तासांची नौकरी देखील त्यांना असह्य वाटूं लागली. मथुरा व वृंदावन येथें जाण्यापेक्षां हरिद्वार व हृषीकेश येथें आत्मस्वरूप प्राप्त्यर्थ एकान्तांत काळ घालविणें त्यांना अधिक इष्ट वाटूं लागलें. या इराद्याप्रमाणें त्यांनीं गंगाकांठीं हरिद्वारीं इ० स० १८९७ मध्यें एक घर भाड्यानें घेतलें सुद्धां. वेदान्ताच्या मननानें त्यांना

"प्यारे, नजर कर देखो न ख्वेशों[1]-मे नहीं तेरा।
जनो-फर्जंद[2] सब कूकें, किस तुझको छुडाना है ॥ ३ ॥
गलत-फैहमी[3] यहां तेरी, नहीं आराम है इसजां।
मुसाफीर बे-वतन तूं है कहां तेरा ठिकाना है ॥ ४ ॥

असें वाटूं लागल्यास नवल नाहीं. राम लवकरच संसाराशीं पूर्ण असहकारितेनें वागणार अशीं चिन्हें किती स्पष्ट दिसत होतीं, याचें प्रतिबिंब त्यांनीं आपल्या वडिलांना पाठविलेल्या पुढील पत्रांत चांगलें पहावयास मिळतें.

"लाहोर

२५ आक्टोबर १८९७.

महाराज,

चरणवंदना. आपलें कृपापत्र पोहोंचलें. आनंद झाला. आपल्या मुलाचें तीर्थरामाचें शरीर विकलें गेलें, विकलें गेलें! आतां 'रामाला' त्याचें माझें असा भेद राहिला नाहीं. आज दिवाळीच्या दिवशीं माझें शरीर मी देऊन

---

१ नातेवाइकांमध्यें. २ स्त्रीपुत्र. ३ व्यर्थ, खोटी, फुकट. ४ भूल. ५ या जगांत, संसारांत. ६ वाटसरू, प्रवासी. ७ घरदार रहित.

टाकिलें व महाराजांना जिंकून घेतलें. आतां तुम्हांला जें पाहिजे तें माझ्या मालकाला मागा; ते तत्काळ तुम्हांला देतील. एकदां निश्चय करून मागून तर पाहा. घाबरणें ठीक नाहीं. त्यांची ज्याप्रमाणें आज्ञा होईल त्याप्रमाणें अंमलबजावणी होत जाईल. **भगवान् हें आम्हां गोसाव्यांचें धन आहे.** आपलें घरधन सोडून संसारांतील खोट्या कवड्यांमागें लागणें, हें आम्हांला अयोग्य आहे; आणि त्या कवड्या मिळाल्या नाहींत, म्हणून शोक करणें हें तर फारच लज्जास्पद आहे. असल्या अस्सल दौलतीची मजा एकदां अनुभवून तर पहा ! ”

आतां रामाचें सर्व लक्ष आत्मसाक्षात्कारावर लागून राहिलें होतें. त्यांना आत्मसाक्षात्काराचें वेड लागलें होतें. उपर्युक्त पत्रानंतर चार पांच महिन्यांनीं त्यांनीं ‘ अद्वैतामृतवर्षिणी ’ नांवाची साधु व महात्मे यांची एक सभा भरविली. साक्षात्कारप्राप्तीच्या हेतूनें ही सभा आठवड्यांतून एकदां भरे व वेदान्तावर वादविवाद होऊन सर्वानुमतें जो निष्कर्ष निघेल त्याचा अनुभव प्रत्येकानें एकांतांत घ्यावा व पुनः दुसऱ्या वेळेस आपला अनुभव सभपुढें मांडावा आणि पुनः पुढील मार्गाला लागावें असा कार्यक्रम या सभेचा होता.

याच काळांत मागें उल्लेख केलेला गणितावरील प्रसिद्ध निबंध तीर्थरामजींनीं लिहिलेला होता. महाविद्यालयांतील दोन तीन तासांचें काम संपतांच उपनिषदें व ब्रह्मसूत्रें यांच्या अभ्यासमननांत ते गर्क होऊन जात. एकान्तांत जाऊन केव्हां बसेन असें त्यांना होई, म्हणून ते **हृषीकेश व हरिद्वार** येथें जात. नदीकांठीं, जंगलांत अथवा एखाद्या निर्जन स्थळीं जात, व तेथें साक्षात्कार होण्याची खटपट करीत. उन्हाळ्याच्या सुट्टींत तर ते येथेंच येत. **आत्मसाक्षात्कार हीच सुखाची परमावधि, हेंच खरें सुख आणि हें सुख गजबजलेल्या शहरांत, संसारांत अथवा दुसऱ्या कोठेंही नसून एकान्तवासाचें सेवन केल्यानेंच प्राप्त होणारें आहे अशी त्यांची पक्की भावना झाली असल्याकारणानें ते ‘ सुखालागीं आरण्य सेवूं ’ लागले.**

## आत्मसाक्षात्काराचें वेड

दिवसें दिवस संसारांत असूनही ते संसारांत नव्हते. त्यांचें चित्त व्यवहारापासून निवृत्त होऊं लागलें होतें.

( गजल )

**‘ दुन्याके जंगलोंमें है यह दिल भटक रहा।**
**अटका यहां जो आज, तो कल वहां अटक रहा ॥ १ ॥**

अशी स्थिति त्यांची झाली होती. हृषीकेश व तपोवन येथें दोनदां जाऊनही जेव्हां साक्षात्कार झाला नाहीं, तेव्हां तिसऱ्या खेपेस आत्मसाक्षात्कार झाल्यावांचून लाहोरास परत येणार नाहीं, असा त्यांनीं दृढ निश्चय केला. या वेळचा राम कसा होता याची यथार्थता प्रत्यक्ष अनुभव घेतल्याशिवाय कळणें शक्य नाहीं! तुलसीदासांची भक्ति, चैतन्याचें माधुरी प्रेम, आद्यशंकराचार्यांची संन्यस्त वृत्ति, सिद्धार्थाचें वैराग्य, आणि ध्रुवाचा निश्चय व शिवाय टॅगोरची काव्य माधुरी यांचा अपूर्व मिलाफ त्यांच्या रोम रोमांतून दिसत होता!!

## साक्षात्काराची भीष्म प्रतिज्ञा

मनाचा दृढनिश्चयकरून तीर्थरामजी तपोवनाला जाण्याला निघाले ते हरिद्वारास एक आठवडा राहिले. **देवाला भेटावयाचें असल्यास अथवा देवाचा प्रवेश तुमच्या हृदयमंदिरांत व्हावा असें वाटत असल्यास तुम्हांला देव म्हणजे प्रकाशमान झालें पाहिजे, आशापाशादि उपाधिरूप अंधकाराला रजा दिली पाहिजे.** ह्या कारणाकरितां अगर आर्थिक उपाधींचें लोढणें गळयांत नको म्हणून त्यांनीं आपल्या तीन महिन्यांच्या पगाराची रक्कम साधु, बैरागी व गोरगरीब यांना संतुष्ट करण्यांत खर्च करून टाकिली, आणि अशा रीतीनें कफल्लक बनून अनवाणी पायानें, उघड्या माथ्यानें व उपनिषद् ग्रंथ हातांत घेऊन ते हृषीकेशाच्या मार्गाला लागले. दोन दिवस मुक्काम करून तपोवनांतील ब्रह्मपुरीच्या मंदिरापाशीं आले. तेथें गंगामाईच्या पवित्र तीरावर आसन ठोकून ह्या निश्चयानें बसलें कीं,

' हे ब्रह्मानंद, तुझ्या दाराशीं धरणें धरून बसलों आहे. * राम ' मजनून ' बनल किंवा तुला ' लैली ' बनवील. अंगावर कफनी धारण करून तुझ्या द्वारांत तो बसला आहे......तुला स्वाधीन करून घेईल तेव्हांच हा राम उठेल, व तसें होईपर्यंत या देहाचें कांहीं झालें तरी फिकीर नाहीं ! "

या वेळीं वडिलांस लिहिलेल्या पत्रांत ते लिहितात—' बाबा, तुमचा मुलगा आतां परत येत नाहीं. प्रिय विद्यार्थ्यांनों, तुमचा गुरू आतां परत येणार नाहीं. आप्तेष्टांनों ! तुमचें नातें किती दिवस टिकणार ! बकऱ्याची आई किती दिवस नवस करणार ! बाबा, तुमच्या सर्व आशांवर व संकल्पांवर लेखणीच्या फटकाऱ्यानें पाणी सोडिलें जाईल ! रामाच्या निजानंद लहरींत एकतर देश, काल व निमित्त कोठल्या कोठें पार विरून जातील किंवा निदान रामाचें शरीर तरी गंगाप्रवाहांत अदृश्य होईल. शरीर व मन ह्यांची इतिश्री होणार ! मेल्यानंतर सर्वांच्याच अस्थि गंगेंत पडतात म्हणा, पण रामाला अपरोक्षानुभूति झाली नाहीं, शारीरिक अध्यासाची दुर्गंधि जर शिल्लक राहिली तर जिवंतपणींच रामाचीं हाडें व मांस हीं भागिरथींतील माशांना अर्पण करण्यांत येतील. रामाच्या चरणांतून गंगा झुळझूळ न वाहील तर रामाचें शरीर तरी गंगामाईच्या तरंगांवर जरूर वाहूं लागेल ! '

गतक्या दृढनिश्चयानें बसल्यावर त्यांच्या मनाची जी स्थिति झाली तिचें चित्र त्यांनींच रेखाटलें आहे; तें असें:—

**बैह निकले जेबे-दिलसे, बसले-खांमें बदलूं**
**मेंह बरसो मोतियोंका, तूफान आसुओंका ।**
**झिम् झिम् झिम् ॥**

---

* द्वारीं तुझ्या देवा, घेतलें धरणें । येथून उठणें कैसें होय ।
दरशन तुझें तरी एक होय । ना तरी हा जावो प्राण माझा ॥

१ वाहूं लागले. २ हृदयरूपी कोठडींतून. ३ आत्मसाक्षात्कारांत. ४ बदलले, पालटले. ५ मेघ. ६ वर्षूं लागला.

व अंतःकरणांतून एकदम

गंगा ! तैथों सदै बलैहारे जाऊं (टेक)
हाड चाम सब वाँरके फैंकूं।
यही फूल पताशे लाऊं ॥ १ ॥ गंगा०
मन तेरे बन्दरनको देहूं।
बुद्धि धारामें बहाहूं ॥ २ ॥ गंगा०
चित्त तेरा मच्छली चबं जावें।
अहङ्क गिरिगुहामें दबाऊं ॥ ३ ॥ गंगा०
पाप पुण्य सभी सुलेगाकर।
यह तेरी जोत जगाऊं ॥ ४ ॥ गंगा०
तुझमें पडूं तो तूं बनजाऊं।
ऐसी डुबकी लगाऊं ॥ ५ ॥ गंगा०
थंडे जल थल पवन दशों दिक्।
अपने रूप बनाऊं ॥ ६ ॥ गंगा०
रमण करूं सतधारा मांहिं।
नहीं तो नाम न राम धराऊं ॥ ७ ॥ गंगा०

## रूपांतर

(चाल—अर्ध तनू वारुळीं बुडाली)

गंगामाते, अनंत वेळां ओंवाळुनि टाकितों
तनुस या, पूर्णकृपा भाकितो ॥ १ ॥
अस्थिचर्महीं फेकुनि देतों, ओंवाळुनि तुजवरी
हीं फुलें बत्तासे हे धरी ॥ २ ॥

---

१ तुझ्यावर. २ शेंकडों वेळां. ३ अर्पण करूं. ४ ओंवाळून टाकूं. ५बत्तासे. ६ वानरांना. ७ वाहवीन. ८ मासे. ९ चावतील. १० अहंकार. ११ पर्वताची गुहा. १२ सर्व. १३ पेटवून. १४ बुडी. १५ मारीन. १६ दशदिशा, सर्वभर. १७ सप्तधारा, पवित्र प्रवाह. १८ मध्यें.

स्वमन अर्पितों, तुझ्या वानरां, प्रवाहांत बुद्धिला
सोडिली, तिची काळजी तुला ॥ ३ ॥
तव मीनांच्या अन्नासाठीं चित्त तुला वाहतों
अहंकृति गिरिकुहरीं दाबितों ॥ ४ ॥
सर्व पापपुण्याच्या राशी जाळुनियां टाकितों
भवाचें मूळ सकळ खाणितों ॥ ५ ॥
बुडी मारणें इष्ट वाटलें जरि उदकाभीतरीं
मिसळुनी जाइन ही खातरी ॥ ६ ॥
जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं स्व-स्वरूप होइन
दशदिशा व्यापुनियां राहिन ॥ ७ ॥
जरि न घडे हें शरीर तर हें प्रवाहांत सोडिन
रामनामाभिधान सांडिन ॥ ८ ॥

हे उद्गार बाहेर पडले !

## वैराग्याचा कडेलोट

अशा अंतःस्थितींत तीर्थराम असतांना घराहून एक पत्र आलें त्यांत घरीं येण्याविषयीं आग्रहपूर्वक लिहिलें होतें. तें वाचून लागलीच त्याला जल समाधि देण्यांत आली व त्याला उत्तर म्हणून पुढील मजकूर लिहिण्यांत आलाः—

' ईश्वराचा निदिध्यास लागल्यामुळें माझें सर्व रक्त आटलें व शरीर वाळलें. गृहस्थाश्रमाचा भार वाहण्याची आतां त्यांत मुळींच ताकद राहिली नाहीं मग संसारांत मी परत कसा येऊं ! माझ्या सारख्या ईश्वरपरायण मनुष्याला प्रपंचांत पडण्याचा उपदेश करणाऱ्या लोकांचा बुद्धिभ्रंश झाला असावासें वाटतें. प्रापंचिक क्षुल्लक बाबींसंबंधानें तुम्हांला किती तरी काळजी वाटते; परंतु प्रपंचाला आधारभूत असें जे तुमचें वास्तविक घर—आत्मगृह—त्याचा तुमच्या डोक्याला कधीं तरी विचार शिवतो काय ?

परमेश्वरा ! तुझ्या स्वरूपांत मिळून जाण्याची तयारी चालली आहे. रक्तमांसादि पंचतत्त्वांच्या चिखलानें बनलेल्या शरीरा ! तूं आतां निजधामास जा, आपल्या मूळ स्वरूपांत लीन हो. हा पंजाब देश—हा पंच नद्यांचा चिखल

सोडून पुनः स्वस्थानाप्रत गमन कर. पुनः परत येण्याची शक्यताच राहणार नाहीं अशा केंद्र स्थानीं स्थिर हो. आतां हे प्रपंचाचे—मायेच्या आंधळ्या कोशिंबिरीचे डाव तूं किती दिवस खेळत राहणार! ......... शिंपेंतून निघालेलें मोतीं फिरून शिंपेंत परत जात नाहीं हें लक्षांत ठेवा! माझी हीच अवस्था आहे. प्रपंचांत होतों खरा, पण आतां त्यांतून बाहेर पडलों. आतां मला जगाची पर्वा नाहीं, अथवा लोक लज्जेची चाड नाहीं. माझ्या अंतःकरणांत परमात्म्यानें कायमचें ठाणें दिलें आहे.'

पत्रांतील या उताऱ्यावरून तीर्थरामाच्या अंतःकरणांत वैराग्याग्नि किती प्रज्वलित झाला होता याची कल्पना सहज येईल. हें उत्तर ज्या पत्राचें होतें तें पत्र धन्नाजीच्या मार्फत आलें होते. तेव्हां धन्नाजीनीं ही त्याला घरच्या मंडळीच्या समाधानाकरितां तरी घरीं येण्याविषयीं लिहिले होतें. परंतु 'देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांशि तुटी। सर्व अर्पावें शेवटीं। प्राण तोही वेंचावा॥' हा उपदेश तीर्थरामजींच्या मनावर इतका पक्का ठसला होता कीं, त्यांनीं धन्नाजीचें म्हणणें मान्य तर केलेंच नाहीं, पण उलटपक्षीं त्यांच्याशीं कसा युक्तिवाद केला हें पुढील उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. ते म्हणतातः—

'महाराज, मी आपल्याच आज्ञांबरहुकूम वागत आहें. मी आपल्या स्वामीच्या ( परमेश्वराच्या, आत्मस्वरूपाच्या ) घराचा रस्ता चालूं लागलों आहें:—' **पंजाब-पंचभौतिकदेह—सोडून बाहेर पडल्याशिवाय हरिद्वाराला—परमेश्वराच्या दरवाज्याला—पोंचण्याची आशा नाहीं**......घरच्या मंडळीला त्यांच्या आत्मस्वरूपांत मला भेटण्यास सांगा. तेथ भेटल्यावर आमची ताटातूट होणेंच शक्य नाहीं............मुरालीवाल्यांतील लोक जेव्हां मुरारी–वाले होतील तेव्हांच फक्त तीर्थराम–तीर्थांना शोभा व आराम देणारा, त्यांना भेटेल. जेथें संन्यास–गंगा नाहीं तेथें मला राहणें मुष्किलीचें आहे. कोमेजलेलीं कुसुमें अखेरीस गंगेंतच पडतात, हें जर खरें आहे, तर ज्ञानगंगेंत हें माझें देहकुसुम ताजें तवानें असतांनाच कां पडूं नये! ज्ञानाग्नीला हें अहंगृह घृतार्पण कां करूं नये? आणि अशा रीतीनें

मनुष्य यज्ञाचें पुण्य मी कां पदरांत घेऊं नये ?......... इतकी तयारी झाल्यावर धन्नाजी तरी त्यांना कसे परतवितील ? एवंच ह्या लांबलचक उताऱ्यावरून **अपरोक्षानुभूतीची भागीरथी आणण्याकरितां तीर्थराम भगीरथ बनले होते असें दिसतें.**

!! स्वातंत्र्य !!

! विजय ! आत्मसाक्षात्कार ! विजय !

इतकी तयारी झाल्यावर अपरोक्षानुभूतीला काय उशीर? अखेरीस इ० स० १८९८ च्या सप्टेंबर महिन्यांत ( शा० श० १८२० च्या भाद्रपद पौर्णिमेच्या एक दोन दिवस अगोदर ) तीर्थरामांना हृषीकेशाजवळील ब्रह्मपुरीच्या तपोवनांत साक्षात्कार झाला. त्यावेळीं भागीरथीच्या तीरावर राम एकटे होते. बाजूला निबिडतर कांतार पसरले होते. व वनश्री पुष्पित झाल्यामुळें जणूं काय स्मित हास्य करीत होती. त्यावेळी काय काय दिसलें व मनाची कशी स्थिति झाली तें वर्णन सर्वच्या सर्व येथे दिल्यास फारच लांबट वाटेल. तें वर्णन करणेंही कठीण. कारण त्याला तसा अधिकारीच लागतो. माझ्या सारख्या बद्ध जीवाला तें तसेंच्या तसेंच देऊन स्तब्ध राहण्याशिवाय कांहीं गत्यंतरच नाहीं. मग निवड करण्याचें काम तर विचारावयालाच नको. तथापि रामानें जशी बुद्धि दिली तशी निवड केली आहे. *

---

* जिज्ञासूंनीं ' रामवर्षा '—भाग पहिला ' निजानंद ' व 'निजानन्दमस्ती' हीं प्रकरणें अवश्य वाचावीं, त्यांतूनच पुढील उतारे दिले आहेत.

( १ ) हा आत्मसाक्षात्कार ही काय चीज आहे व ती प्राप्त झाल्यानें कोणती स्थिति प्राप्त होते याचें वर्णन स्वामी आपल्या याच सुमारास लिहिलेल्या पत्रांत करितातः—

" हरद्वार, १९ सप्टेंबर १८९८.

**भिद्यते हृदयग्रंथि श्छिद्यंते सर्व संशयाः ।**
**क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ८ ॥**

( मुंडकोपनिषद् )

( राग झिल्ला–ताल दादरा )

**क्या पेशवाई[1] बाजा, अनाहद शब्द है आज ।**
**वैलकम[2]को कैसी रोशनी[3], समर्दान्या है आज ॥ १ ॥**
**चक्करसे इस जहानके फिरे असल घरको हम ।**
**फुटबॉल सब जमीन है, पा–पेर[6] फिदा[7] है आज ॥ २ ॥**
**चक्करमें है जहान, मैं मर्कज[8] हूं मिहर[9] सा[10] ।**
**धोकेसे लोग कहते है, सूरज चढा है आज ॥ ३ ॥**

---

**भावार्थः**—कारणरूप व कार्यरूप अशा त्या आत्मतत्वाचें ज्ञान झालें म्हणजे ज्ञात्याची ( अविद्या वासनारूप ) हृदयाची ग्रंथि तुटून जाते, सर्व संशयांचा नाश होतो आणि कर्माचा क्षय होतो.

बाहेर जेथें जेथें दृष्टि जाते, तेथें तेथें, प्रत्येक परमाणूंत ' तत्वमसि, ' तत्वमसि, ' याची गर्जना होते; दृष्टि अंतर्मुख करून आत्मानुसंधान करावें तर ' अहंब्रह्मास्मि ' चे ढोल दुसरें कांहीच ऐकूं येऊं देत नाहींत.

मी कोठें आहें ? कोण आहें ? कोण, केव्हां, कोठें इत्यादि गडबड माझ्या महालापर्यंत पोहोंचूं शकत नाहीं. मन वानरांनीं हिसकावून घेतलें. बुद्धि गंगेंत बुडविली. चित्त घारीनें खाऊन टाकिलें. अहंकार माशांना भेट केला. पाप हवेंत उडून गेलें.

**चष्मे लैलाहूं दिले कैस, बदस्ते फरहाद् ।**
**बोसा देना हो तो देले है लबे जाम मेरा ॥**

**भावार्थः**—मी लैलीचा डोळा आहे, मजनूचें अंतःकरण आहे, फरहादचा हात आहे, चुंबन करणें असेल तर कर, माझा अधर समीप आहे. "

लेखक राम. "

---

१ पुढें जाणारा. २ स्वागत. ३ चकाकी, झकाकी. ४ शुद्ध, उत्तम, पवित्र. ५ जिवाच्या. ६ पायांवर. ७ अर्पण केलेली. ८ केन्द्र. ९ सूर्य. १० सारखा.

शाहजादेके जुलूस है अब तख्ते जात पर।
हर ज़र्रहै सदकों जाता है, नगमा-सरों है आज ॥ ४ ॥

## कवितांचा अर्थ

१

( आत्मस्वरूपाचें ) स्वागत सूचित करणारा आनहत ध्वनीचा बाजा किती उत्तम वाजत आहे ! आणि स्वागताकरितां कसा उत्तम व शुद्ध प्रकाश पडला आहे ? ( अभिप्रायः–चित्त प्रणवोच्चाराशीं एक रूप झालें म्हणजे साक्षात्कार होतो. तत्पूर्वी अनाहत नांवाचा एक नाद ऐकूं येऊं लागतो व त्यानंतर जिकडे तिकडे प्रकाशच प्रकाश दिसतो. तोच हा अनुभव राम सांगत आहेत. )

२

ह्या संसारांतून निघून जेव्हां मी बाहेर पडलों व आपल्या खुद्द घराकडे ( आत्मस्वरूपाकडे ) वळलो, तेव्हां सर्व पृथ्वी पायचेंडूसारखी वाटली व माझ्या पायांच्या स्वाधीन झाली. ( अभिप्रायः–जेव्हां मी संसारोन्मुख होतों तेव्हां सर्व संसार माझ्यापासून दूर दूर जात होता. पण आतां जेव्हां संसार विन्मुख होऊन अन्तर्मुख बनलों तेव्हां सर्व संसार पायांवर लोटांगण घालीत आला. )

३

संसार हा विवर्त आहे; पण सूर्याप्रमाणे त्या वर्तुलाचा केन्द्र मी आहें. तथापि चुकीमुळें आज सूर्य वर चढला आहे असें म्हणतात. ( अभिप्रायः–लोक अज्ञानानें ईश्वर कोठें बाहेर आहे असें मानितात, व तत्शोधनार्थ भटकतात; परंतु आत्मदेव सूर्याप्रमाणें सर्वांचा केंद्र असून तो आंत आहे. आपल्या अज्ञानावरणाखालीं तो झांकला गेला असल्यानें अज्ञान दूर झाल्यावर तो पूर्ववत् दिसतो; परंतु लोक बेसमजीनें तो आत्मदेव आम्ही शोधून मिळविला असें म्हणतात.

---

१ युवराजाचा. २ राजतिलक. ३ स्वराज्याची गादी. ४ परमाणु. ५ प्राण देतो. ६ आवाज देतो, गीत गातो आहे.

हर बर्गो-मिहरो-माहका रक्सो-सरोदं है ॥
आराम अमन चैनका तुफां बपां है आज ॥ ५ ॥
किस शोखे-चशमकी है वह आमद कि नूरे-र्बर्क ॥
दीदोंको फाड़ फाड़के राह देखता है आज ॥ ६ ॥
× आता करमफशां, शाहे-अब्रर दस्त है ।
बारंशकी राह पानी छिडकता खुदा है आज ॥ ७ ॥
झुक झुक सलाम करता है अब चांदे-ईद है ।
इकबाल राम रामका खुद हो रहा है आज ॥ ८ ॥

## कवितांचा अर्थ

( ४ ) युवराज आपल्या गादीवर बसण्याचा शुभ समय आतां येत आहे. याकरितां प्रत्येक परमाणु त्यावर प्राण देऊं लागला आहे (अभिप्राय—वृत्तींचा आत्मस्वरूपांत लय होण्याचा समय होत चालला आहे. यास्तव प्रत्येक परमाणु, त्या ज्ञान्यासाठीं प्राण देण्यास तयार आहे.

( ५ ) या वेळीं प्रत्येक पान, सूर्य अथवा चंद्र यांचा नाचरंग होत आहे. आणि सुख, शांति व आनंद यांचा समुद्र जणुं वहात आहे. ( अभिप्रायः—ह्यावर प्रत्येक वस्तु प्रसन्न होऊन नाच करूं लागली आहे, आणि चारी बाजूंस प्रसन्नता, सुख, आणि शांति हीं ओतप्रोत आहेत. )

( ६ ) ज्याच्या व्यवस्थेकारितां विजेचा लखलखाट डोळे भरभरून पहात आहे; अशा कोणत्या प्याऱ्याचें हें आगमन आहे ? ( अभिप्रायः—असा आनंदाचा समय पाहून साधारण मनुष्याच्या चित्तांत संशय उठूं लागावा असा कोण प्रभावशाली येत आहे कीं, वीज देखील अतिशय प्रकाश देऊं लागावी?

---

१ प्रत्येक चंद्र अथवा सूर्य याचा. २ नाच, रंग. ३ आनंद. ४ समुद्र. ५ वाहत आहे. ६ तीक्ष्ण दृष्टीवाला ( आत्मा ). ७ आगमन. ८ विजेसारखा प्रकाश, लखलखाट. ९ डोळ्यांना.

× येत आहे. १ कृपालु. २ मेघावडंबर ३ अतिशय, हात. ४ वर्षास्थानावर. ५ ईदेचा चंद्रमा. ६ स्वागत.

## ( कवितांचा अर्थ )

( ७ ) ज्याच्या हातीं वादळ आहे अथवा जो आतिशय कृपादृष्टी करणारा आहे, [ कृपादृष्टी वादळाप्रमाणें करणारा आहे ] असा कृपाळू महाराजाधिराज ( सूर्य ) येत असून वर्षास्थानीं आनंदरूपीं जलाचा वर्षाव करीत आहे. ( अभिप्रायः—जो कृपेचें अधिष्ठान अथवा समुद्र आहे अशा प्रकाशस्वरूप आत्म्याचा अनुभव येत आहे. आणि वर्षास्थानीं खुद्द ईश्वर आनंदाची वृष्टि करीत आहे.

( ८ ) ईदेचा चांद ( द्वितीयेचा ) निघून जणुं काय रामाला लवून सलाम करीत आहे. या प्रकारें राम आपलें आपणच स्वागत करीत आहे. ( अभिप्रायः—ज्या द्वितीयेच्या चंद्राला लोक नमस्कार करतात तो चंद्रमा आत्मसाक्षात्कारानंतर त्या आत्मज्ञान्यापुढें लवून मुजरा करितो. राम स्वतःचें स्वागत करीत आहे. )

## ( कवितेचें रूपांतर. )

हा अनाहत ध्वनि कसला । कां प्रकाश लख्खचि असला ॥
संसार सकाळ सोडून । आत्मदेव धुंडाळून ॥
पाहिला, अवनि तों सगळी । लोटांगण चरणीं घाली ॥

उडविला जेंवि गगनांत ।
पदकंदुक मैदानांत ।
लोळुनी गांठि चरणांतं[1] ।

स्वामित्व सांडुनी सर्व । दासत्व वरी गतगर्व ॥ १ ॥

२

बाहेर देव ना कोठें । अज्ञान आवरण मोठें ॥
पडद्यास दूर जो करितो । त्यालाच देव हा दिसतो
देव हा आगळ्या जागीं । कां यत्न शोधण्यालागीं ॥

१ ( चरण+अंत ).

छातीस हात लावून ।
बोलतो घसा फोडून ।
काढिला देव शोधून ।
ज्ञानाचा लव ना त्यास । हा असे सर्व आभास ॥ २ ॥

३

सिंहासन या हृदयाचें । युवराज वरि चढायाचें ।
शुभ समय जवळि तो आला । तों वृत्ति निरास जहाला ।
आनंद रसान न्हाल्या । चिद्चिन्मय वस्तू सगळया ।
मुखचंद्र उगवला सारा ।
शांतीचा शीतळ वारा ।
वाहुनी करित उपकारा ।
येतसे कोण हा प्यारा । उत्सवा[1] जन्म देणारा ॥३ ॥

४

जो पूर्ण कृपेचें स्थान । आत्म देव श्री भगवान् ॥
प्रगटुनी वितरि अनुभूति । स्वानंद सुधेची वृष्टि ॥
रामास चंद्र दुसरीचा । कुर्निसात करितो साचा ॥
स्वयमेव आपणा राम ।
वांकुनियां करित सलाम ।
हो कृतार्थ स्वागत–काम ।
आत्मदेव झाले राम । राम झाले पूर्ण काम ॥ ४ ॥

तीर्थराम पुढें लिहितातः—

' आजपर्यंत अज्ञानावरणामुळें माझ्या श्रीकृष्णाचें केवळ अंधुक आणि अस्पष्ट असें दर्शन होत होतें. आज त्याच्याशीं पूर्ण मिलाफ झाला. प्रत्यग्वृत्ति होऊन त्याला पोटभर पाहिलें. तो नंगा व मीही नंगा ! छातीला छाती लावून कडकडून भेटलों. हे अस्थिचर्मांच्या हृदया ! तूं मधून निघून जा; व जिवशीवांचें तादात्म्य–पूर्ण भेट–होऊं दे. हे भेद दृष्टे माये ! दूर ! एकदम

---

१ आनंद, उल्हास.

दूर ! मी प्यारा ! मी प्यारा ! काय हा आनंद ! डोळ्यांतून आनंदाश्रूंची धारा चालली आहे व रोमांच उभे आहेत.

हा विवाहोत्सवाचा आनंद कीं, मृत्युसमयींचा शोक ! सर्व संस्कारांवर शेवटचा संस्कार झाला; वासनांचें निर्मूलन झालें. सूर्य प्रकाश पडला असतां अंधकार नाहींसा व्हावा त्या प्रमाणें दुःख आणि दारिद्र्य ह्यांचा मागमूसही नाहींसा झाला आहे. पापपुण्याची शृंखला अजीबात तुटून गेली. ह्या मनाचें एकदां मोठें स्तोम माजलें होतें, पण आतां पहावें तों त्याचा कोठें पत्ताच लागत नाहीं. ते उन्मत्त झालें आहे. मित्राच्या–श्रीकृष्णाच्या–भेटीमुळें ब्रह्मभाव झाल्यानें वासनेचा पूर्णपणें क्षय झाला. मीच जर आतां मित्र झालों तर आतां पत्र कोणाला पाठवूं ? निजानंदांत निमग्न झाल्यामुळें खाण्यापिण्याचें सुद्धां भान नाहीं. अंतरालांत भ्रमण करितां करितां अदृश्य होणाऱ्या विहंगमाप्रमाणें तुर्यातीत स्थितीप्रत जाऊन पोहोंचलों. भगवंताला निराळा म्हणून मानीत होतों पण आतां तोच मीं झालों !

हा सामान्य अश्रुपात कीं, भगवद्भक्ताच्या निरतिशयानंदाचा हा वर्षकाल ! हे मस्तका ! तुझा जन्म आज सफल झाला ! नेत्रांनों ! तुम्हीं धन्य आहांत. तुम्हीं कृतार्थ झालांत. कर्णांनों तुम्हींही आज कृतकृत्य आहां. हा आनंद धन्य होय ! धन्य होय !! धन्य होय !!! धन्य हा शब्द ही धन्य होय !"

ह्या स्थितीला पोंचल्यावर त्यांना पुढें दिल्याप्रमाणें वाटावें यांत नवल काय ?

( **राग–धनासरी**–ताल–दादरा )

**जिसको हैं कहते खुदा हम ही तो हैं ।**<br>
**मालके–अर्ज–ओ–संमा हम ही तो हैं ॥ १ ॥**<br>
**तालवाने–हक जिस्से है ढूंढते ।**<br>
**अर्शपर वह दिलरुबा हम ही तो हैं ॥ २ ॥**

---

१ पृथ्वी व आकाश ह्यांचा स्वामी. २ सच्चिदानंद जिज्ञासू. ३ शोधितात. ४ आकाशांत ५ माशुक, प्यारा.

तूरको सुरमा किया इक आनमें ।
नूर मुसाको दिया हम ही तो हैं ॥ ३ ॥
तिशना-ए-दीदारे-लबके वास्ते ।
चशमा-ए-आबे-बका हम ही तो हैं ॥ ४ ॥
नारमें, माहमें, कौकबमें सदा ।
मिहरमें जल्वानुमा हम ही तो हैं ॥ ५ ॥
बोस्ताने-नूरसे बेहरे-खलीलें ।
नारको गुलशन किया हम ही तो हैं ॥ ६ ॥

वरील कवितेचें रूपांतर

( चाल—गुरुदत्त दिगंबर भजरे )

परमेश जयाला म्हणती । तो मीच ठसो हें चित्तीं ॥ धृ० ॥
विशाल भूमी नभ हें विस्तृत यावरि माझी सत्ता ।
चिदानंद सद्रूपान्वेषक जिज्ञासूंची मत्ता ॥ २ ॥
दिव्य दृष्टि देउनि मूसाला दिधला साक्षात्कार ।
घटकेमाजीं तूरपर्वतीं तो मी माशुक प्यार ॥ ३ ॥
दर्शनास जे आतुर झाले, त्यांची तृष्णा शांती ।
करीं सुधेच्या धारांमध्यें पालटुनी ममकांती ॥ ४ ॥
अग्नि, चंद्र, रवि, शुक्र यांमध्यें तेज मीच तें नान्य ।
प्रकाशाग्निची क्रीडोद्यानीं परिणति करुनी धन्य ॥ ५ ॥
सागर फुटुनी प्रचंडवातें तुफान वादळ झालें ।
पैगंबर नौकेला तरुनी पार मीच तें नेलें ॥ ६ ॥

---

१ तूर नांवाच्या पर्वत शृंगावर २ एका ३ घटकेंत ४ प्रकाश ५ (मूसाला तूर नांवाच्या पहाडावर साक्षात्कार झाला. ) ६ दर्शनेच्छूंची तृष्णा शमविण्याकरितां ७ अमृताची धारा ८ अग्नीमध्यें ९ चंद्रामध्यें १० सितारे ( शुक्र ) ११ सूर्यामध्यें १२ भ समान, प्रकट. १३ प्रकाश स्वरूप बागेपासून-मध्यें १४ खऱ्या लुब्ध झालेल्या करितां १५ बाग ( ज्यानें अग्नीचे, बागेंत रूपांतर केलें तो मीच आहें. )

नूहकी[1] किश्ती[2] को तूफांसे[3] बचा[4] ।
पार बेडा * कर दिया हम ही तो हैं ॥ ७ ॥
मर्दो-जन[5], पीरो-जवां[6] वैह्शो-त्यूर[7] ।
औलिया-ओ[8] अंबियां[9] हम ही तो हैं ॥ ८ ॥
खाको-बादो-आबो-आतिश और खलां[10] ।
जुमला मा दर[11] जुमला मां[12], हम ही तो हैं ॥ ९ ॥
कौन किसको सिर झुकाता अपने आप ।
जो झुका, जिस्को झुका, हम ही तो हैं ॥ १० ॥
उकद्-ए-वहदत-पसंन्दोंके[13] लिये ।
नाखुनें-मुश्कील-कुंशा[14] हम ही तो हैं ॥ ११ ॥

( पुढे चालू )

पशू पक्षि, वा वृद्ध तरुण, अवतारि, मुक्त नर नारी ।
मीच रम्य संसार नाटकीं विविध भूमिका धारी ॥ ७ ॥
पंचमहाभूतांचीं तत्त्वें मजमध्यें असती ।
त्या सर्वांना खेळविणारी मीच प्राणज्योती ॥ ८ ॥
कोणकुणाचा करीत येथें नमस्कार सत्कार ।
कर्ता-कृत-द्वैतांत घडवितों अद्वैत चमत्कार ॥ ९ ॥
अद्वैतावरि प्रेम करी जो त्याचा संकट वर्ग ।
समूल निरसुनि उदार हस्तें देतों त्या अपवर्ग ॥ १० ॥

## स्वराज्यप्राप्ती नंतर

केवढा, कोणता, व कोणत्यास्वरूपाचा हा विजय ! आणि तो तरी कोणत्या वयांत त्यांनीं संपादिला * ? याचें उत्तर वयाच्या पंचवीस व सव्वीस यांचे

१ पैगंबराची २ नौका, जहाज ३ वादळापासून ४ बचावलें * संकट, समुद्र. ५ स्त्रीपुरुष ६ म्हातारा व तरूण ७ पशु व पक्षी ८ अवतारी व्यक्ति ९ नवी, मुक्त १० पृथ्वी, वायु, जल, अग्नी, व आकाश ११ सर्व माझ्यामध्यें १२ सर्व मीच १३ अद्वैत विचार पसंत करणाऱ्यांसाठीं १४ अडचणी दूर करणारीं साधनें.

* ' तेजस्विनां न समीक्ष्यते वयम् ' ।

दरम्यान हें आहे ! दारू गोळा वगैरे सर्व स्फोटकें तोफेमध्यें तयार असल्यास त्यांचा स्फोट करण्यास एक ठिणगी देखील पुरेशी आहे. तद्वत् अशा महात्म्यांची स्थिति असते. ओजाचा दारूगोळा पूर्णपणें सज्ज असल्यामुळें वैराग्याची ठिणगी देखील पुरेशी झाली. या विजयाचा परिणाम स्वराज्य प्राप्तींत झाला एवढेंच नसून देहभावाच्या पारतंत्र्यांत खितपत असणाऱ्यांना तीर्थराम हे एक दीपकच झाले !

ज्या स्वराज्य प्राप्ती करितां त्यांनीं देहेंद्रिय प्राणादिकांचीं आहुती दिली ते प्राप्त झाल्यावर त्यांना परत येण्याचे काय कारण आहे ? याचे उत्तर असें कीं, त्यांनीं परत कां न यावे ? ही स्थिति प्राप्त होऊन देखील देहादिकांचीं कर्मे सुटली काय ? किंबहुना ज्ञानोत्तरकालीं देखील कर्मे सुटत नाहींत. म्हणून 'कर्मयोगी' होणें हेंच चांगले हें जगाला पटविण्यासाठी ते परत आले असें वाटतें. गुलाब कलिका मुग्ध असे पावेतों ती फक्त मोहकच दिसते. परंतु ती एकदां का पूर्ण होऊन उमलली म्हणजे ती नुसती मोहक दिसते इतकेंच नाही तर तिच्या सुगंधानें दशदिशा भरून जातात व त्यायोगें ती सर्व प्राणी सृष्टीला आपल्याकडे बोलाविते, खेचून घेते, व कांहीं प्राण्यांना तर लोहचुंबकाप्रमाणें आकर्षून घेते. तद्वतच **रामाची** स्थिति झाली. त्यांच्या चेहऱ्यावर अलौकिक तेजाची छटा दिसूं लागली. एक प्रकारचें अपूर्व हास्य त्यांच्या चेहऱ्यावर नाचूं लागलें. आत्मानंद त्यांच्या रोम रोमांतून फुटून बाहेर वाहूं लागला; व तो लुटण्याकरितां लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या, त्यांच्या महानुभावित्वानें लोकांच्या चित्तवृत्ति वेधून घेतल्या, दर्शनाकरितां आलेले लोक तृप्त होऊन जाऊं लागले. निराश झालेलीं अंतःकरणें प्रफुल्लित व हर्षभरित होऊं लागलीं. त्यांच्या अमृत दृष्टीचा व सुहास्याचा एकदां तरी आपल्याला लाभ घडावा याबद्दल आलेल्या लोकांमध्यें अहमहमिका सुरू होई. श्रुतिस्मृत्यादिकांतील वाक्यें, विचार व दाखले, धर्म व तत्वज्ञानाचीं प्रश्नोत्तरें, राजकारण व समाजशास्त्र यांचे सिद्धांत व विवरणें हीं त्यांच्या वदनांतून अभिनवरूप व सौंदर्य धारण करून बाहेर पडतांना '**रामत्वा**'चा ठसा असल्याचें उघड उघड दिसे. ते स्वतःला सर्व जगभर व जगाला

आपल्या स्वतःमध्यें पाहूं लागले. * आणि '**राम** जेव्हां स्वतःला अखिल जगन्मय पाहतो तेव्हां तें अखिल विश्व त्याला स्वतःच्या शरीराप्रमाणें वाटतें.' असा महान् सिद्धांत ते प्रतिपादूं लागले. यामुळे त्यांची भक्तसंख्या वाढूं लागली. हिंदु व मुसलमान त्यांना सारखे भजूं लागले आणि त्यांचें दर्शन घेणें म्हणजे नवीन विचार, नवीन कल्पना, नवीन संकल्प आणि नवीन भावना प्रस्फुरित व उद्दीपित करावयाच्या असें सर्वांना वाटूं लागलें. परंतु वाढत्या भक्तसंख्येची त्यांना उपाधी वाटूं लागली.

संसारांतून त्यांचें मन आतांतर पार उडाले. कांगारकान्ता हीं तर त्यांना 'काष्ठलोष्ठसम' वाटूं लागलीं आणि ते अगदीं 'उदासीन' बनले. पगार येतांच दोन दिवसांचे आंत ते पुनः कफल्लक बनत.† अशा स्थितींत शके १८२१ मध्यें ( इ. स. १८९९ मध्ये ) उन्हाळ्याची सुटी लागतांच तीर्थरामजींनीं **अमरनाथ**ची यात्रा केली. हा प्रवास त्यांनीं एका वस्त्रानिशीं केला. ज्या ठिकाणीं थंडी मी म्हणत असते अशा अमरनाथाचे देवालयांत त्यांनीं कांहीं तास नग्नावस्थेंत काढिले ! केवढें हें सामर्थ्य ! ही यात्रा केल्यावर त्यांच्या अंतःकरणांत शांति ओतप्रोत नांदूं लागली व ते आत्मानंदांत तरंगूं लागले.

यावेळीं श्रीमान् **नारायणस्वामी** हे त्यांच्या सहवासाला होते. त्या सहवासानुभवासंबंधानें ते म्हणतातः—"वेदान्ताकडे तेव्हां माझी बिलकूल प्रवृत्ति नव्हती. परंतु गीता व इतर वेदान्तविषयक ग्रंथांतील रहस्य समजावून घेण्याचा जोरानें प्रयत्न चालविला होता. परंतु तें न उमजल्यामुळें नानातऱ्हेच्या शंकाकुशंका येत. शास्त्रीपंडीतांकडे जाऊन माझें शंका निरसन होईना. परंतु गुसांईजीच्या दोन दिवसांच्या सहवासानें सर्व शंका जागच्याजागीं

---

* '**जुमला मादर जुमला मा**' 'हरमकाँ मुझमें, हरमकाँ मे मै ॥
'हें विश्वचि माझें घर'। ऐशी जयाचि मति स्थिर।
किंबहुना चराचर। आपणचि झाला ॥' ( ज्ञाने० ).

†वरील म्हणण्याची सत्यता याच वेळीं लिहिलेल्या त्यांच्या पत्रावरून स्पष्टपणें येते.

विरून गेल्या व समाधान वाटून त्यांच्या सहाय्यानें मी उपनिषदांच्या अध्ययनास प्रारंभ केला व शंकानिरास पूर्ण होतांच परतलों. तेव्हां त्यांच्या सेवेला स्वात्मार्पण करून मी सर्वस्वी त्यांचा झालो."

यानंतर थोड्या दिवसांनी ते आजारी पडले. या आजारीपणांत त्यांना एकदोनदां भयंकर मूर्छाही आली. पण **नारायण**स्वामींनीं त्यांची अहोरात्र सेवा केली. एके दिवशीं दोन वाजेपर्यंत त्यांना झोंप येईना. पण पुढें थोडीशी झोंप लागून जरा बरें वाटल्यावर ते **नारायण**स्वामींस म्हणाले "बेटा, भारतवर्षाला कदाचित् चांगले दिवस येणार असें दिसतें, कारण **रामा**च्या शरिराला आराम पडत चालला." ह्या त्यांच्या उद्गारांत फार खोल रहस्य भरलेलें आहे, असें विचार केल्यास दिसेल. आजारीपणांत ज्याच्या तोंडीं भारतवर्षाच्या स्थितीबद्दलचे विचार येतात, स्वतःच्या देहाची, व संसाराची फिकीर यत्किंचितही वाटत नाहीं त्याचा आत्मा केवढा असला पाहिजे? तो संसारांतून पूर्ण बाहेर पडला असून राष्ट्रीय प्रपंचाची काळजी वहात होता असेंच नाहीं का दिसत? त्याच्या ठिकाणची स्वदेशभक्ति पराकाष्ठेची मोठी असली पाहिजे असेंच नाहीं का सिद्ध होत? या सर्व विधानांच्या पुष्टीकरितां स्वामींचेच उद्गार पाहूं या. राय. ब. लाला बैजनाथ* बी. ए. ह्यांनीं लिहिलेल्या 'प्राचीन व अर्वाचीन हिंदुधर्म' या पुस्तकाला स्वामींनीं प्रस्तावना लिहिली आहे. तींत ते म्हणतातः—"आपण स्वदेशभक्त बनावें, अशी तुमची इच्छा आहे काय? तसें असल तर आपलें राष्ट्र आणि आपल्या राष्ट्रांतील जनपद यांच्यावर प्रेम करून त्यांच्याशीं एकतानता पावा. तुम्हीं आणि राष्ट्रांतील जनता यांच्या दरम्यान् आपल्या अहंकाररूपी वृत्तीची यत्किंचितही छाया पडूं देऊं नका. मातृभूमीच्या हितार्थ आपलें जीवित अर्पण करणारे खरेखुरे आध्यात्मिक शिपाई बना. आपल्या देहावरील अहंकार काढून टाका. आणि स्वतः सर्व राष्ट्र बना. म्हणजे अशी स्थिति होईल कीं, तुम्हीं ज्या भावना कराल त्या तुमच्या राष्ट्राच्या भावना होतील. मग तुम्हीं पुढें चालूं लागा कीं

---

* हे संयुक्त प्रांतांत एक जिल्हा न्यायाधीश होते. ते रामतीर्थांच्या शिष्यशाखेंत मोडतात. यांचा व स्वामींचा पत्रव्यवहारही चाले.

राष्ट्र तुमच्या मागोमाग आलेंच म्हणून समजा. तुम्हीं आरोग्याची भावना करा म्हणजे तुमच्या राष्ट्रांतील सर्व लोक आरोग्यसंपन्न झाल्यावांचून राहणार नाहींत. तुमचें सामर्थ्य, तुमची शक्ति सर्व लोकांच्या रक्तवाहिन्यांतून वाहूं लागेल. 'मी अखिल भरतखंड आहें. भरतभूमी माझें शरीर आहे. कन्याकुमारी माझे पाय व हिमालय हे माझें शिर. माझ्या केंसापासून भागीरथी वहाते. मस्तकापासून ब्रह्मपुत्रा व सिंधू हे नद उगम पावतात. विंध्याचल हा माझा कमरपट्टा आहे.....एवंच सर्व भरतखंड मी असून त्याच्या पूर्व व पश्चिम बाजू हे माझे हात आहेत व अखिल मानव जातीला आलिंगन देण्यासाठीं ते मी पुढे केले आहेत. माझ्या शरिराची स्थिति अशी आहे. पण माझें प्रेम मात्र विश्वव्यापी आहे. अनंत आकाशभर माझी दृष्टी आहे. सर्वांचा आत्मा तो माझा अंतरात्मा ! जेव्हां मी चालूं लागतो तेव्हां सर्व भरतखंड चालत आहे असें मला वाटतें. माझ्या सर्व क्रिया ह्या सर्व भरतखंडाच्याच क्रिया आहेत असें मी पाहतों. मी भरतखंड आहे–शंकर, शिव आहें. स्वदेशभक्तीचें अत्युच्च ध्येय तें हेंच आणि यालाच प्रवृत्तीपर वेदान्त म्हणतात." यांतील रहस्य आज आम्हांला पटूं लागलें आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

" ६ मार्च १८९९

एवढीच प्रार्थना आहे की, येथें कोणत्याच प्रकारचा हिशोब करावा लागला नाहीं. या महिन्यांत सत्तरांतही एकदोन रुपये कमीच मिळाले होते. **त्यांतून एक कवडीही शिल्लक ठेवावयाची नव्हती.** ज्या ज्या वस्तूंची गरज भासत गेली, त्या त्या प्राप्त होत गेल्या; बाकीच्या बाबींना साफ नाहीं म्हणावें लागलें. अर्थात् त्या त्या आवश्यकता पुऱ्या होऊं शकल्या नाहींत. घरांत आठ मनुष्यें खाणारीं आहेत. पण फक्त बाराच रुपये घरीं पाठविले. आणि ही गोष्ट उघड आहे कीं, भ्रमरांप्रमाणें अनेक पुष्पांकडे ( घरोघर ) माधुकरी मागणें हें ज्यांना भूषणरूप आहे अशा साधू लोकांपेक्षां प्रपंचांत राहणारे गृहस्थ, स्त्रिया, बालकें, आणि वृद्ध यांच्या गरजा अधिक असतात. **गृहस्थ बिचारे अत्यंत दरिद्री असतात आणि त्यांचें दारिद्र्य हें सर्वस्वी रास्त आणि वाजवी होय.** राम."

## अलिफ् ( अल्ला, परमेश्वर ) मासिक.

दुखण्यांतून बरे झाल्यावर आपले विचार जनतेपुढें मांडावे अशी इच्छा **तीर्थरामजींना** झाली. **कोणतीही व्यक्ति एकदां कां आंतून पूर्ण झाली म्हणजे तिचें तें पूर्णत्व बाहेर हें पडलेंच पाहिजे.** हीच स्थिति **तीर्थरामजींची** झाली. ह्या काळपर्यंत **तीर्थरामांनीं** नोकरी सोडिली नव्हती. लाहोरच्या पौर्वात्य महाविद्यालयांत ते दोन तासपर्यंत शिकवीत व तेवढ्यावर आपला व आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालवीत. मासिकाकरितां लागणाऱ्या द्रव्याची तजवीज त्यांचे भक्त **लाला हरलाल** साहेब यांनीं केली. लागलीच ' **आनंद मुद्रणालय** ' नांवाचें एक मुद्रणालय उघडण्यांत आलें, व त्याची सर्व व्यवस्था **नारायण** स्वामींवर सोंपविण्यांत आली. ह्या जबाबदारीच्या कामगिरीमुळें **नारायण** स्वामींनीं आपल्या नौकरीचा राजीनामा दिला. अशा रीतीनें ' अलिफ ' मासिकाचा पहिला अंक शके १८२१ च्या पौषांत निघाला. यांतील सर्व लेख स्वामीच लिहीत. व ते अगदीं स्वतंत्र असत. त्यांच्या आंगचें कडकडीत वैराग्य या वेळच्या त्यांच्या लेखांतून पूर्णपणें प्रतिबिंबित झालेलें आहे. या लेखन व्यवसायाचा स्वामींवर असा परिणाम झाला कीं, तीन अंक निघण्यापूर्वींच त्यांनीं आपल्या नौकरीचा राजीनामा दिला ! व तपोवनाचा रस्ता धरिला. लेखांची नक्कल करण्यासाठीं व सत्समागमाचा लाभ घेण्यासाठीं **नारायण** स्वामी देखील त्यांच्या बरोबर गेले.

महाविद्यालयांतील दोन तास नौकरी करणें सुद्धां स्वामींना जड वाटूं लागलें व त्यांनीं तीही पोटाची व कुटुंबाची सोय टाकून देणाचा इरादा केला. तेव्हां ही बातमी तीर्थरामाच्या विद्यार्थ्यांना त्याचप्रमाणें त्यांच्यावर प्रेम करणाऱ्यांना असह्य वाटूं लागली. म्हणून त्यांपैकीं एक जण त्यांच्याकडे येऊन तीर्थरामजींच्या मनांत उठलेल्या तरंगाबद्दल चौकशी करूं लागला. तेव्हां त्यांच्यामध्यें पुढें दिल्याप्रमाणें संवाद झाला.

प्रश्न १—आपण नौकरी कां सोडतां ? नौकरी सोडिल्यास आपली गुजराण कशी होईल. ' शरीर रक्षितो धर्मः ', अशी आज्ञा असल्यामुळें आपली व

आपल्या कुटुंबाची तजवीज करणें हें कर्तव्य आहे. भगवीं वस्त्रें धारण करून व दारोदार तुकडे मागून कांहीं देव भेटत नाहीं, गृहस्थाश्रमाच्या यथायोग्य पालनानें सर्व कांहीं साध्य होतें. शिवाय गृहस्थानें त्यागी (संन्याशी) बनणें हें पाप आहे.

उत्तरः—नौकरी करणें नौकराचें काम आहे. मी खुद्द राम बादशहा आहें. मी नौकर नाहीं व माझा कोणी मालकही नाहीं. राजेमहाराजे माझ्यापुढें हात जोडून उभे असतात. मी म्हणजे हा देह नव्हे. मी देहप्राणांहून निराळा आहें. मला देह समजणें ही तुमची चूक आहे. मी तुमचा आत्मा आहें. अखिल विश्वाचा आत्मा आहें. पंचतत्वें माझीं नौकर आहेत व त्या सर्वांतही मीच भरलेला आहें. असा एकही पदार्थ नाहीं कीं, ज्यामध्यें मी नाहीं. जोंपर्यंत मी आपल्याकडे देहात्मबुद्धीनें पहात होतों तोंपर्यंत हें शरीर नौकरी करीत होतें. आतां रामानें त्याकडे सत्स्वरूपाच्या दृष्टीनें पाहिलें तेव्हां त्याने सर्वत्र आपल्यालाच पाहिलें. तुम्हीं नौकरीचें विचारतां. पण शरीर, मन, अंतःकरण व प्राण यांची कुर्वंडी झाली. राम मालक आहे. व आत्मा सूर्य आहे. इंद्रियां-चें इंद्रियपण गेलें व रोमारोमांतून अमृत स्रवूं लागलें आहे. आकाश सलाम करूं पहात आहे, सूर्य रामाच्या दर्शनानें तेजस्वी बनला, चंद्रमा चकाकूं लागला आणि शुक्र तेजस्वी दिसूं लागला. सर्व दृश्यजात माझेंच तेज आहे. अरे प्यारे ! देहात्मभावाला रामस्वरूपांत गर्क होऊं दे, म्हणजे तुला सत्स्व-रूपाची दाद लागेल.

मी सर्वांचा गुजारा असल्यामुळें कोणत्याही असद्वस्तूवर माझा गुजारा अवलंबून नाहीं. प्रत्येक शरीर व प्रत्येक प्राण माझ्यावर अवलंबून आहे. ज्याला ज्याला म्हणून तूं गुजारा, गुजराण असें म्हणतोस तो केवळ तुझा भ्रम आहे. अरे प्यारे, अखिल वस्तु जातीमध्यें भरलेल्या सत्तत्त्वाचा तपास, तर कर. वस्त्राचें तंतू, व तंतूचें कापूस हें अस्सल स्वरूप आहे. कापूस जमिनी मधून ॐ ॐ असा ध्वनि करीत बाहेर आला. जमीन व सूर्य यांचा कार्य-कारण संबंध आहे. अशा त्या सूर्याचें अस्तित्व हे प्यारे, या रामावर अवलं-बून आहे. खुद्द सूर्याचाच जर मी आत्मा आहे तर मग इतरांची कथा काय ?

खुद्द शाहंशाहा माझ्या हुकमतीनेंच वागतो तर रयत व शिपाई यांच्या बडबडण्याला कोण भीक घालतो !

पोटाकडे लक्ष देणें हा खरोखरच धर्म आहे. पण या धर्माचेंच पालन करणें हा श्रेष्ठतर धर्म आहे. हे प्यारे, दृढविश्वासाचा, अढळ श्रद्धेचा आधार घे म्हणजे भासाभासाचा निकाल लागेल. जेवूं नको, वस्त्र धारण करूं नको, रोजमुरा कमाऊं नको, कामकाज करूं नको असें माझें सांगणेंच नाहीं. तर माझें एवढेंच सांगणें आहे कीं, आपण कोण हें जाणणें हेंच खरें सत्कार्य आहे, बाकी सर्व कार्यें असत्य व फजूल आहेत. पोटाकरितां काम करितां करितां, त्याच्यासाठीं काबाडकष्ट करितां करितां त्याच्याच जाळयांत गुरफटून जात आहेस, यास्तव पोटाची फिकीरच सोडून दे. तुझें पोट भरण्याकरितांच मी हें सांगत आहें. आतां गाडी बैलांचा कारभार संपला; आगगाडी, तारायंत्र, जहाज, विमान हीं सर्व तुझ्या सेवेला हजर आहेत. खुद्द जलदेवता व अग्नी हीं तुझ्या खास तैनातीला आहेत. आधिभौतिक शास्त्रांचे सर्व आविष्कार, हे प्यारे, पोटाकरितांच आहेत. ज्या अर्थी आतां देवताच तुझ्या पोटाची सेवा करीत असतात. त्या अर्थी पोटाचा खटाटोप करण्याचें तुला प्रयोजन नाहीं. तर उलटपक्षीं सद्वस्तूच्या गादीवर तक्याशीं टेंकून बैस. व बसल्या बसल्या पंचभूतांपासून नौकरी करवून घे. तूं स्वतः परमेश्वर असून तद्भावनाभावीं कमजोर झालेला आहेस. तथापि खाण्यापिण्याची व पचन करण्याची ताकद आहे. व्यवहार कसा चालला आहे पहा. समज कीं, कोर्टांत दावा चालू आहे तो बुडाल्याचें पत्र आलें. तों तें वाचून तुझाही दम बुडाला. दुसरें, व्यापारांत एक हजार रुपये नफा झाला असें पत्र वाचतांच पुनः दम आला व चेहऱ्यावर तेज चढूं लागलें असें होतें. घरच्या म्हशीनें दूध दिलें नाहीं असें समजतांच 'बदमाष नौकर ! द्या त्याला काढून द्या. बेपर्वा आहे, त्याचें बिलकूल लक्ष नाहीं. म्हणून वासरूं दूध प्यालें.' याच वेळीं धन्याला थोडासा चुटका लागला व लागलेंच स्वप्न पडलें. स्वप्नांतच नौकराला खूब शिव्या दिल्या, काठीनें म्हशीला यथेच्छ बडविलें आणि पक्क्या मजबूत दाव्यानें तिला बांबराच्या गळ्यांत पुनः असें दुधाचें नुकसान न व्हावें म्हणून बांधून टाकिलें. अशी जगताची स्थिति आहे.

तुम न पेट जुबान पदारथ हो।
तुमआतमराम यथारथ हो ॥ १ ॥
* क्यूं शोर मचाते अकारथ हो।
तुम दीन दयान पदारथ हो ॥ २ ॥

सारांश राम तुला खूब नाचवील, खेळवील, आत्मस्वरूपांत रमवील,बद्धावस्थेंतून काढून मुक्तावस्थेंत नेऊन सोडील. त्या पोटाचें पोट दाखवील. पण केव्हां ? दृढविश्वास ठेवशील तर. याकरितां श्रद्धा ठेव, आत्मदेवावर प्रेम कर म्हणजे तुझा तूंच आत्मदेव आहेस असें पटेल. कारण—

मर्ज लगा है तुमको, भारी दवाई उसको कारी है ॥
हर एकको तुम रामही जानो नसखे वाहेद बारी है ॥१॥

**भावार्थ**—तुला इजा झाली आहे याकरितां मोठें औषध लावणें जरूर आहे. प्रत्येकाला रामदृष्टीनें पहाणें हें औषध लावतांच सर्व कांही ठीक होईल.

"आपल्या नातेवाईकांची व कुटुंबाची सोय केली पाहिजे त्याची फिकिर केली पाहिजे, हे प्यारे, हेंच ना म्हणणें ?

प्रश्न फार चांगला आहे. पण 'आपलें' कोण ? आपले नातेवाईक कोण ? त्यांचा 'आपल्याशीं' काय संबंध हा विचार नकोका करावयाला ! काय ? हें शरीर म्हणजे आपण व आपलें ? अथवा या शरिराची जीवन स्थिति दुसऱ्या कशावर अवलंबून आहे ? अर्थात् हें शरीर ज्या अर्थी तदंतस्थावर अवलंबून आहे. त्या अर्थी हें बाह्य तुमचें आमचें काय कामाचें ? अशा लंगड्या, लुळया, म्हणजे परावलंबी शरिराला आपलें मानणें म्हणजे मोठें संकटच ओढवून घेणें आहे. मग अशा स्थितींत दुसऱ्या परावलंबी शरिरांना-नातेवाईकांना आपलें म्हणण्यांत काय अर्थ ? यास्तव त्या सर्वांचा जो आधारस्तंभ आत्मा त्याला 'आपला' म्हणणें योग्य आहे. बाकी काका, मामा, आई, बाप, बहिण भाऊ वगैरे नामस्वरूपांचें शरीर आहे तें आपलें नव्हे हेंच नव्हेका सत्य ? जिकडे तिकडे चोहोंकडे आत्माच आत्मा आहे. म्हणून हे, प्यारे, हे भगत्, अशा ह्या आपल्या 'आपणाला' 'आपण,

* उगीच निष्कारण धडपड कां करितोस ?

" आपला " असें म्हणण्याकरितां भिऊं नकोस. विचार कर म्हणजे सर्वत्र रामच राम, दिसेल. अशी वस्तुस्थिति आहे ह्मणून त्या सर्वव्यापी रामाच्या तर्फेनें ' मी राम आहे ' असें जोरानें ह्मण. राम तुला असें सांगत आहे कीं, ' मी राम आहें, मी राम आहें, मी राम आहें ' असें म्हण. तसेंच प्रत्येक शरिरावर रामाचा शिक्का आहे. किंबहुना प्रत्येक शरीर हें रामाचा शिक्का आहे. हें जो कबूल करणार नाहीं, मानणार नाहीं तो गिरफदार केला जाईल-- तो बद्ध होईल. ' अहं ब्रह्मास्मि ' असें ह्मणण्याचें ज्या वाणीला धैर्य होत नसेल ती तुमची नव्हे ती रामाची आहे असे समजा; व त्या रामवाणीनें ' मी राम आहें, मी आत्माराम आहें, मी बादशहा आहे, मी सर्व व्यापी आहें, मी ब्रह्मही ब्रह्म आहें, ' असें म्हणा. ' मी राम आहें ' ही सत्य मोहोर ( शिक्का, मोर्तब ) जवळ बाळगा. ' मी बद्ध आहे, मी राम नव्हे ' ही खोटी बनावट मोहोर जवळ ठेवूं नका.

जर कदाचित् ती कोणाजवळ असेल तर ती ताबडतोब रामाच्या खजिन्यांत आणून द्या व राम त्याबद्दल खरी मोहोर मोठ्या प्रेमानें व आनंदानें देईल.

हे प्यारे भगत् , रामाला सर्वत्र रामच दिसतो, तसा तुलाही दिसतो. पण द्वैताची जी भावना तुझ्यापाशीं आहे तो चष्म्याचा, दृष्टिरूप चष्म्याचा दोष आहे. रामाला जर द्वैत दिसूं लागलें तर त्याचें अद्वैतपण कोण सांभाळील ? राम सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाश आहे. पण लोकांना मात्र तसा दिसत नाहीं.

जो स्वात्मरत असतो तो गृहस्थ. आपल्या आत्मस्वरूपांत नेहमीं दंग असणें याचें नांव गार्हस्थ्य, एतद्विरुद्ध जो तो जंगली पशुच म्हणावयाचा, नव्हे तो मुरदा आहे. त्याग करणें हें जर गृहस्थाला पापकारी असेल तरीहि राम आपल्या आत्मस्वरूपांत कायम आहे. यास्तव रामाला पाप नाहीं. भगतजी, खाणें पिणें, उठणें, निजणें, वास घेणें, बोलणें, ध्यानांत धरणें, वगैरे सर्व गोष्टी रामाच्याच नांवानें चालतात. राम कुलुपाला आंतून चावी लावील. व मायेचा पडदा दूर करील. सत्स्वरूप जाणिवेच्या अभावानें हें असें होतें हें पक्कें ध्यानांत ठेव. ॐ राम ॐ राम ! "

---

## प्रकरण ५ वें.



### वानप्रस्थाश्रम.

वनं विविक्षुः पुत्रेषु भार्यां न्यस्य सहैव वा।
वन एव वसेच्छान्तृतीयं भाग मायुषः॥ १॥
( श्री. भा. अ. १ स्कंध ११ )

गृहस्थाश्रमांत असतांनाच तीर्थरामजींची जी मानसिक तयारी झाली होती ती आतांपर्यंत आपण पाहिली. व तीवरून त्यांना वानप्रस्थाश्रमाची आवश्यकता होतीच असें दिसत नाहीं. वानप्रस्थाश्रमांतील इष्टसिद्धी त्यांनीं प्राप्त करून घेतल्यासारखीच होती, असें असून सुद्धां व मनोभूमिकेचा इतका विकास झाला असतांनांही त्यांनीं वानप्रस्थाश्रम स्वीकारिला. जे जगदुद्धारक महात्मे या जडमूढ जीवांचा उद्धार करण्यासाठीं कालान्तरानें या कर्मभूमीवर अवतरतात त्यांना धर्मातील सनातन तत्व पटविण्याच्या कामांत आचार शुद्धच रहावें लागतें. व याचा हेतु एवढाच असतो कीं, लोकांनां त्यांच्या आचरणांत बोट दाखविण्यालाही जागा मिळूं नये. पती व पत्नी हीं परस्परांचीं पूरकें आहेत. या करितां ज्याची तयारी अगोदर होईल त्यानें दुसऱ्याला आपल्या समपातळींत आणून ठेवणें इष्ट आहे. हा काळ-पर्यंत राम संसारांतच ह्मणजे आपल्या कुटुंबांतच राहत असत. यामुळें अर्थातच रामाच्या अंगच्या वैराग्याची योग्य कल्पना त्याच्या पत्नीस नव्हती व नसावी हें सामान्यच आहे. यास्तव आपल्याबरोबर पत्नीचीही क्रमाक्रमानें तयारी करावी व तशी तयारी लवकर झाल्यास मगच आपण संन्यास घ्यावा असें तीर्थरामजींच्या मनांत आलें असल्यास तें कांहीं गैर नाहीं. शिवाय 'आधीं केलें मग सांगितलें' या स्वरूपाचा आदर्श आपल्या आचारांत लोकांना दिसला पाहिजे ही जाणीवही त्यांनां होतीच. या सर्व

कारणसमुच्चयामुळें त्यांनीं वानप्रस्थ स्वीकारण्याचें ठरवून लागलीच ते आपल्या परिवारासह लाहोराहून निघाले. यावेळीं त्यांचा परिवार ह्मणजे पत्नी, **मदनमोहन** व **ब्रह्मानंद** × हे दोन मुलगे व एक मुलगी हा होता. याशिवाय **नारायणस्वामी** हेही त्यांच्या सान्निध्याला होते. आनंदानें, प्रेमानें आणि उत्साहानें वानप्रस्थाश्रम स्वीकारणाऱ्या विभूतींचें दर्शन घेणें हें किती रम्य, आनंददायी व स्फूर्तिदायक असतें हें या वेळच्या **रामा**च्या प्रयाण समारंभावरून ध्यानांत येण्याजोगें आहे.

त्यांनां पोचविण्याकरितां त्यांच्या भक्त मंडळीची सारखी थडी लागली होती; पण **तीर्थराम**जी मात्र केवळ एका वस्त्रानिशीं अनवाणी पायांनीं चालत होते व त्यांची भक्त मंडळी वैराग्यपूर्ण कवनें ह्मणत मागोमाग येत होती. **तीर्थरामजीं**च्या विरहकल्पनेनें सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहविण्यास सुरवात केली होती. जागोजाग पुष्पहारांनीं **तीर्थरामजींचे** स्वागत केलें जात होतें, आणि पुष्पवृष्टि होत होती. गाडीच्या विश्रामस्थानापर्यंत असाच प्रकार चालला होता. तेथें आल्यावर त्यांच्या भक्त मंडळींनी सुमारें अर्धा तास भजन केलें. पुढें जेव्हां **तीर्थराम**जी गाडींत बसले तेव्हां तर सर्वांचीं हृदयें भरून आलीं व नेत्रांमध्यें प्रेमाश्रू उभे राहिले. जरी कांहीं मंडळी त्यांनां पोंचविण्यासाठीं हरिद्वारपर्यंत आलेली होती तथापि बाकीच्या लोकांची परवानगी घेतांनां **तीर्थरामजीं**च्या तर्फे नारायणस्वामींनीं पुढील पद्य ह्मटलें:—

**अल्वदा[1] मेरी रियाजी[2] ! अल्वदा ।**
**अल्वदा ऐ प्यारी रावी[3] ! अल्वदा ॥ १ ॥**
**अल्वदा ऐ ऐहले-खाना[4] ! अल्वदा ।**
**अल्वदा मासूमे-नादाँ[5] ! अल्वदा ॥ २ ॥**

---

१ नमस्कार. २ गणित विद्या. ३ रावी नदी. ही लाहोर मधून वाहते. इच्या कांठीं तीर्थराम बराच काळ एकान्तांत घालवीत. ४ घरांतील लोक. ५ नादान बच्चे.

× हे दोघेजण सध्यां विद्यमान आहेत.

अल्वदा ऐ दोस्तो-दुश्मन् ! अल्वदा ।
अल्वदा ऐ शीतो-ओशन् ! अल्वदा ॥ ३ ॥
अल्वदा ऐ कुतबो-तद्रीसे ! अल्वदा ।
अल्वदा ऐ खुबसो-तर्कदीस ! अल्वदा ॥ ४ ॥
अल्वदा ऐ दिल ! खुदा ! ले अल्वदा ।
अल्वदा राम ! अल्वदा, ऐ अल्वदा ॥ ५ ॥

असा निरोप घेतांना कोणाच्या डोळयांतून अश्रू आल्याशिवाय राहिले असतील ! पुढें सर्व मंडळी **टिहरीला** गेली. तेथून एका कोसावर गंगातटाकी **शेट मुरलीधर** यांच्या सुंदर बगीच्यांत **तीर्थरामजींनीं** सात आठ महिने काढिले.

## योगक्षेमं वहाम्यहम्

वानप्रस्थाच्या शास्त्रोक्त नियमाप्रमाणे वानप्रस्थानें जंगलांतील कंदमुळें व फळें यांवर उपजीविका करून कोणत्याही वस्तूचा थोडादेखील संग्रह करूं नये. मनुष्याच्या मनांतील संग्रहबुद्धि कमी करून अखेरीस तिचा पूर्ण निरास करणें हा एक महत्वाचा धडा या आश्रमांत शिकावयाचा असतो. रामानेंही येथें आल्यावर तो धडा घेतला व आपल्या मंडळीला सर्व पैसाअडका गंगार्पण करून परमेश्वरावर अढळ विश्वास ठेवून त्याच्या ध्यानाचा अभ्यास करण्यास सांगितलें. खाण्यापिण्याच्या पदार्थांबद्दलही कोणी अस्वस्थता न दर्शविली पाहिजे अशी सक्त आज्ञा त्यांनी केली होती. **जेव्हां तुम्हांला कोणत्याही वस्तूची गरज भासूं लागेल व त्यामुळें तुम्हांस त्रास होईल तेव्हां परमेश्वरावरील-जगत्पालकावरील श्रद्धेमध्यें कमतरता आहे असें समजा.** आणि अशा मनुष्यानें परमेश्वरावरील डळमळीत विश्वासाचें दुःखमय जीवित जगण्यापेक्षां मेलेलें बरें असें तीर्थराम म्हणत. परमेश्वरावर पूर्ण भार टाका म्हणजे तो तुमचा योगक्षेम वहावयास एका पायावर तयार आहे असें समजा.

---

१ मित्र-शत्रु. २ सरदी गरमी. ३ पुस्तक व पाठशाला. ४ चांगला-वाईट. ५ मन. हे मना तुलाही नमस्कार असो.

बरोबरच्या मंडळीची तितकी तयारी नसल्यामुळें त्यांना कष्ट होऊं लागले. पण काय करतात ? एकीकडे रामाची आज्ञा व दुसरीकडे पोटाचा चिमटा अशा कात्रींत ती सांपडली. अशा रीतीनें जबरदस्तीनें कां होईना सर्वांन् पोटासाठीं परमेश्वरावर भार टाकून बसणें अथवा पोटासाठीं एकसारखी देवाची करुणा भाकणें या दोहोंतून एक गोष्ट करणें भाग पडलें.

चमत्कार असा झाला कीं गंगोत्रीला जाण्याच्या मार्गावरील क्षेत्रांची व्यवस्था करण्याच्या उद्देशानें **हृषीकेश** येथील कलकत्ता क्षेत्र मंडळाचे व्यवस्थापक **स्वामी रामनाथ** हे प्रवास करीत तेथें आले होते. त्यांना **तीर्थरामादि** मंडळीची हकीगत समजली. म्हणून ते तावडतोब त्यांच्या दर्शनाकरितां त्या बागेंत आले. त्या सर्व मंडळीना ईश्वर ध्यानांत निमग्न पाहून त्यांनी आपखुषीनें ह्या सर्व मंडळीकरितां दरमहा दहा रुपयांचें धान्य देण्याला तेथील एका दुकानदाराला सांगितलें व ते गेले.

अयाचितवृत्तीनें परमेश्वरावर सर्व भार टाकून बसल्याबरोबर लागलेली सोय पाहून त्या सर्व मंडळीला आश्चर्य वाटून त्यांची श्रद्धा दुणावली. अशा रीतीनें परमेश्वर आपला योगक्षेम चालवितो असा अनुभव येतांच त्याचें ध्यान व भजन ह्या गोष्टी अधिक उत्साहानें त्यांच्याकडून होऊं लागल्या. निरासक्तवृत्तीनें कसें रहावें हा धडा इतर मंडळी शिकत असतां तीर्थरामजी तर पुष्कळच पुढचे धडे शिकत होते; व मधून मधून ' अलिफ ' मासिका-करितां लेख लिहिण्याचें कामही करीत होते.

## तीर्थरामजींच्या पत्नीवरील भयंकर आघात

अथवा

## रामाची निजानन्दमस्ती

अशी प्रगति चालली असतां एके दिवशीं रात्रीं सर्व मंडळी गाढ झोंपली होती. अशा वेळीं **तीर्थराम**जी अकस्मात् उठले व त्या भररात्रीं उत्तर काशी-च्या रस्त्याला लागले. काय स्थिति ! अंधार मी म्हणत होता, ज्या जागे-वरून चालत होते तो रस्ता नसून ती डोंगराची चढण होती. वाटेंत नद्या

नाले होते. तथापि त्याच वेळीं एकाएकीं आकाशांत मेघ जमले. गडगडाट सुरू झाला, विजा चमकूं लागल्या, जोराचा पाऊस व वादळीवारा सुरू झाला. तथापि हा निधड्या छातीचा पण कोमल प्रवासी अनवाणी, आंगांत नाहीं, डोक्याला कांहीं नाहीं, फक्त नेसूं एक धोतर अशा स्थितींत गवत अथवा वेली यांना धरून एकामागून एक कडे उतरत व चढत पुढें चालला होता! त्यांना वन्य श्वापदें अथवा कठीण जागा यांच्याबद्दल बिलकुल दिक्कत वाटत नव्हती! केवढी ही निर्भय स्थिति! मृत्यूचें सुद्धां भय वाटेनासें झालें!!! केवढी ही तयारी! आत्मानंदांत मग्न असतांना कशी स्थिति होते याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. किंबहुना तीर्थरामजींच्या आंगीं सर्वात्मभाव कसा बाणला होता हें यावरून स्पष्ट होतें. अशा स्थितींत अखेरीस ते एका टेकडीच्या माथ्यावर जाऊन बसले व तोंडानें ‘ ॐ, ॐ, ॐ, ’ असा जप करीत निजानन्दांत रंगून गेले. ‘ अहं ब्रह्मास्मि ’ ह्या स्थितींत ते होते! आनंदांत राम जे रंगले ते कांहीं दिवस येथून हाललेच नाहींत!! केवढी ही एकतानता–समाधि!

जागी होऊन पहातांच पतिराज जवळ नाहींत असें पत्नीला आढळलें. ह्या पिशाच्चवत् गमनाचा धक्का त्यांच्या पत्नीला इतका मोठा बसला कीं, त्या ताबडतोब आजारीच झाल्या. या स्थितींत त्यांच्याजवळ थोडे दिवसपर्यंत तीर्थरामजीही नव्हते. कारण ते वर सांगितल्याप्रमाणें निजानंदमस्तींत गुंग होते. पुढें राम परतले; पण त्यांना पत्नीच्या स्थितीचें जसें कांहींच वाटलें नाहीं. पतिराज आले व पूर्ववत् राहूं लागले. तथापि पत्नीच्या मनाला जो एकदां धक्का बसला तो कायमचा बसला. शिवाय त्यांत जंगलांतील कष्टाच्या रहाणीची भर पडली. त्यामुळें त्यांच्या पत्नि ज्या एकदां अंथरुणाला खिळल्या त्या शेवटपर्यंत तशाच होत्या. थोड्या दिवसांनीं मुलांसह पत्नीला तीर्थरामजींनीं नारायणस्वामींबरोबर घरीं रवाना केलें. परंतु त्यांची प्रकृति सुधारण्याऐवजीं अधिकाधिक खंगत चालली. आणि अखेरीस ता. २४ मे १९०७ रोजीं म्हणजे स्वामींच्या समाधीनंतर सात महिन्यांनीं तिचें देहावसान झालें.

यापुढचे चारपांच महिनें **तीर्थराम, नारायणस्वामी व तुलाराम** एवढ्याच मंडळीसह राहिले. या काळांत **तीर्थरामजी** आत्मानंदांत मग्न असत. या काळांतील त्यांचे विचार कोणत्या अवस्थेला पोहोंचले होते याची कल्पना त्यांच्या पुढील काव्यावरून होते. त्याकडे वळूंः—

## ज्ञान्याचें घर.

( राग पहाडी–ताल–धुमाळी. )

**सिरपर आकाशका[1] मंडल है, धरती पैं सुहानी[2] मखमल है।**
**दिनको सूरजकी[3] महफेल[4] है, शबको[5] तारोंकी सभा बाबा ॥ १ ॥**
**जब झूमके[6] यहां घन आते हैं, मस्तीका रंग जमाते हैं, ।**
**चश्मे तंबूर बजाते हैं, गाती है मल्हार[7] हवा बाबा ॥ २ ॥**
**याँ पँछी[8] मिलकर गाते है, पीतमके[9] संदेसे[10] सुनाते[11] है ।**
**याँ रूप अनूप दिखाते हैं, फल–फूल–और बर्गेनवा[12] बाबा ॥ ३ ॥**
**धन दौलत आनी जानी है, यह दुन्या[13] राम कहानी है।**
**यह आलम[14] आलमफानी[15] है, बाकी है जाते खुदा[16] बाबा ॥ ४ ॥**

## ज्ञान्याचें घर.

मस्तकावरतिं हें पसरे नभ नीळ वर्तुळाकर ।
धरणीस मनोहर व्यापी मखमल ही हिरवी गार ॥
सूर्याची दंगल दिवसा, रजनींत तारका–भार ।
करितात पयोधर ढंग ।
मस्तीला भरिती रंग ।
वाद्यांचा धरिती संग ।
तोषवी समीरण फार गाउनी राग ' मल्हार ' ॥ १ ॥

---

१ पृथ्वीवर. २ मनोहारक, ३ सूर्याचे. ४ घर; दंगल. ५ रात्रीस. ६ जमा होऊन. ७ ढग. ८ मल्हार नांवाचा राग; या रागांत गाणें चालू असतां पाऊस पडतो. ९ पक्षी, पोपट. १० प्याऱ्याचे, जिवलगाचे ( आत्मारामाचे ). ११ बातमी, निरोप. १२ सांगतात, ऐकवतात. १३ गवताचीं पानें व काड्या. १४ संसार; दुनिया. १५ फुकट, व्यर्थ. १६ सत्यस्वरूप परमात्मा.

गानोत्सुक पक्षी गान करितात विसरुनी भान ।
कुश–काश–पुष्प–फल–निचय निजरूपीं विलसति छान ॥
कीं वस्तू करिती दिव्य–संदेश–पद–व्याख्यान ॥
धन दौलतही जाणारी ।
आभासिक दुनिया सारी ।
ज्ञात्यास न वाटे भारी ।
सत्स्वरूप हा ईशान, एकला एक निर्वाण ॥ २ ॥

## ज्ञान्याचें भ्रमण.

मैं सैरंकरने निकला, ओढे अबरंकी चादर ।
पर्वतमें चल रहा था, हवाके बाजूंवो पर ॥ १ ॥
मतवाला घूमता था, हरतरफ घूमता था ।
झरने नदी–ओ नाले, पैह * चान कर पुकारे ॥ २ ॥
'नेर्चरसे' गूंजे उट्ठी, उस वेदकी ध्वनीकी ।
'तत्वमसि,' 'त्वमसि,' तूंही है जान सबकी ॥ ३ ॥
यह नजारा प्यारा प्यारा, तेरा ही है पसारा ।
जो कुछ भी हम बने हैं यह रूप बस तो तू है ॥ ४ ॥
सीनोमें फिर हमारे, है मुनअक्स तो तू है ।
जो कुछ भी हम बने है, यह रूप बस तो तू है ॥ ५ ॥
यह सुन मैंनें जो झाँका, नीचे को सीधा बाँका ।
हर आबशारो–चश्मा, गुलोबर्गका क्रशमा ॥ ६ ॥

---

१ भ्रमण. २ निघालों. ३ मेघमंडळ. ४ पक्ष, पंख. ५ मस्त. ६ फिरत. होतों. ७ बाजू. ८ सृष्टीमधून. ९ उठला. १० दृश्य. ११ छातीमध्यें, हृदयांत १२ भरलेला, प्रतिबिंबित. १३ झरा. १४ पत्रपुष्पांची जादू.
* ओळखून.

अल्वाने[1]-नौ दर नौ, अशखासे[2]-जिन्स हरैनौ[3] ।
हर रंगमें तो मैं था[4], हर संगमें[5] तो मैं था ॥ ७ ॥
माँ[6] ममताकी मारी, जाती है वारी[7] न्यारी[8] ।
शोहरको[10] पाके[11] दुलहन[12], सौंपे[13] है अपना तनमन ॥ ८ ॥
मुद्दतका बिछुडा बच्चा[14] रोता[15] है माँको मिलता ।
बे इखत्यार[16] मेरा, दिलो[17] जाँ बैह[18] ही निकला ॥ ९ ॥
बैह निकला जेबे-दिलसे[19], वसेले[20] खां में बदले ।
मेंह[21] बरसा मोतियोंका, तूफा आसुओंका[22]
झिम् ! झिम् ! झिम् ! ॥ १० ॥

## ज्ञान्याचें भ्रमण.

( चाल—शिवतनया वक्रतुंडा गौरीच्या बालका ).

पंखी मी बैसुनीयां वायूच्या चाललों ।
मेघपटा पांघरोनी गिरिमधुनी भटकलों ॥ १ ॥
फिरतांना चित्तवृत्ती बेफिकिर जाहली ।
निजनयनें सृष्टिदेवी म्यां तेव्हां पाहिली ॥ २ ॥
' तत्वमसि ' स्फुरण देवी प्रतिशब्दें उमटवी ।
सिंचुनियां वचनवारी दे जीवा टवटवी ॥ ३ ॥
सर्वांचा प्राण तूंच सर्व तुझे पल्लव ।
बहिरन्तस्तत्व जें जें मामक तूं पेलव ॥ ४ ॥

---

१ निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे रंग. २ पुरुष. ३ प्रत्येक प्रकारचे. ४ होतों. ५ साथीदार, घोंडा. ६ आई. ७ बढाई, मोठेपणा. ८ अंडीं वाळून. ९ निराळ्या तऱ्हेनें. १० पतिराजाला. ११ मिळतांच, भेट होतांच. १२ पत्नी. १३ हरपलें. १४ छोकरा, पुत्र. १५ रडत आहे. १६ अधिकाराबाहेरील, आटोक्याच्या पलीकडे. १७ अंतःकरण. १८ बाहेर पाहूं लागले. १९ अंतःकरणरूपी कोठडींतून. २० दुःखादिकांचें रूपांतर आनंदांत झालें. २१ मेघ. २२ अश्रूंचें.

स्थिरचर हें विश्वसारें त्वद्रूपीं बिंबलें ।
विश्वमुखा मोहका या भक्ता त्वां चुंबिलें ॥ ५ ॥
ऐकुनि उत्साहवाणी विनयभरें खालती ।
वांकतसे मान, वृत्ती चिंतनि डोलती ॥ ६ ॥
देखावें नामरूपें मधुर फुलें भासती ।
मी रज्जू त्यांस गुंफीं यास्तव तीं हांसती ॥ ७ ॥
मातेचें प्रेम लाजे अनुभूती पाहुनी ।
आणि वदे दूर सारा जवळि मला बाहुनीं ॥ ८ ॥
वाटे कीं, नववधूनें प्रियपतिला अर्पिलें ।
तनमन आणीक धन हें, त्यागें तर्पिलें ॥ ९ ॥
कोमल या अर्भकाला रडतांना पाहिलें ।
तोडुनियां बंधनाला हृदय पहा चाललें ॥ १० ॥
हृत्कुहरांतून तेव्हां पूर पुढें लोटला ।
दुःखाचा कहर जेव्हां गर्दीनें उसळला ॥ ११ ॥
दुःखपरी निमिषमात्रें आनंदें मुरडलें ।
बचमागा कीं क्षुधेचें जीवन तैं लाधलें ॥ १२ ॥
नयन नभांतून खाली मुक्ता वोळंघती ।
अश्रुधारा तुफानाची चालविती संतती ॥ १३ ॥

## अंतर्दर्शन.

( राग–कल्याण, ताल–त्रिताल. )

बसा है दिलमें मेरे दिलबर,* है आयीनांमें खुद आयीनागर ।
अजब तहय्यैर हुआ यह कैसा, कियार मुझमें, मैं यारमें हूं ॥१॥
मुकाम पूछो तो लामंका था, नरामही था न मैं वहाँ था ।
लिया जो करवट तो होश आया, कि राम मुझमें, मैं राम मेहूं॥२॥

१ आरसा. २ आरसा बनवणारा. ३ आश्चर्य. ४ देशरहित. ५ तेथे. ६ स्थिति. ७ उत्साह, जोश.

* प्राणप्रिय, जिवलग, परमेश्वर.

अललंत्वार है पाके जल्वा, कि दिल बना तूरे–बर्के–सीना।
तडपके दिल यूं पुकार उठ्ठा, कि राम मुझमें, मैं राममें हूं ॥ ३ ॥
जहाज दरयामें और दरया जहाजमेंभी तो देखिये आज।
यह जिसमें कशती है रामदरया, है राम मुझमें, मैं राम मेंहूं ॥४॥

**अंतर्दर्शन ( वरील कवितेचें रूपांतर. )**

**( चाल—आनंदाचा कंद ).**

परमेश्वर मम हृदयमंचकावरती घेई अधिवास।
मुकुर रचयिता असुनि पावतो, आरशांत प्रतिबिंबास ॥ १ ॥
माझ्यामध्यें प्रवेश करूनी आश्रय दे मज निज ठायीं।
नवल कसें केवढें दिसत हें वर्णाया शक्ती नाहीं ॥ २ ॥
त्या प्याऱ्याचा ठावठिकाणा पुसतां लागेना पत्ता।
मीही नव्हतों मम राम स्थल–कालातीतहि नव्हता ॥ ३ ॥
परस्परांना परस्परांमधिं पाहुनि ऊर भरुनि आला।
मी तदंतरीं तो मदंतरीं तत्तेजानें ध्वनि उठला ॥ ४ ॥
नाव सागरीं सागर नौकेमधीं अशी ही परिस्थिति।
देह तरी मी **रामसागरीं** उभय उभयगत सांवरती ॥ ५ ॥

सर्वत्र मीच भरलेला आहे ही भावना झाली होती. यामुळें त्याच आनंदांत तीर्थराम मग्न असत. त्यांना परत लोकवस्तीत जावें ही कल्पना सुद्धां आवडेना. **ज्याला एकदां ब्रह्मानंदाची लज्जत लागली तो जगाची काय पर्वा करणार ?** त्याला एकांतवासच आवडणार. ज्ञानेश्वर म्हणतात ‘ बहु एकान्तावरी प्रीति । जया जनपदाची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ति । ज्ञानाची तों ॥ ६१४ ॥ ( ज्ञाने. अ. १३ ) ही स्थिति तीर्थरामांना प्राप्त झाली होती.

---

१ निरंतर. २ शुद्धदर्शन. ३ प्रकट. ४ विजेच्या पर्वताप्रमाणें. ५ शरीर. ६ नाव; होडी. ७ राम वानप्रस्थाश्रम घेण्याच्या अगोदर व नौकरी सोडिल्यावर समुद्र पहाण्याच्या इरादानेंच कराचीला गेला होता.

## प्रकरण ६ वें.

## संन्यास व कार्य.

एकश्चरेन्महीमेतां निःसंग संयतेंद्रियः ।
आत्मक्रीड आत्मरत आत्मवान् समदर्शनः ॥ २० ॥
( श्रीम. भा. स्कं. ११ अ. १८ ).

इंद्रियांचा पूर्ण विरोध झाला, तीं पूर्णपणें ताब्यांत आलीं, कोणतीही इच्छा शिल्लक राहिली नाहीं, पूर्ण निरासक्तता अंगीं बाणली, स्वात्मरूपांतच आनंद वाटूं लागला, सर्वत्र आत्मतत्व दिसूं लागलें, किंबहुना जो 'अहं ब्रह्मास्मि' झाला तो खराखरा संन्याशी बनला असें समजावें. संन्यासोत्तर कर्म करावें का नाहीं, संन्यास म्हणजे कर्मसंन्यास का कर्मयोग वगैरे भानगडीच्या वादविवादांत न पडतां तीर्थरामजींच्या आचाराकडे पाहिल्यास सर्व प्रश्नांचीं उत्तरें आपोआप मिळून तो सुखसंवाद होईल म्हणून त्याकडे वळूं.

यावेळीं रामाची मानसिक स्थिति कोणत्या दर्जाची होती हें त्यांच्याच शब्दांनीं आपणांस पहावयास सांपडतें. ते म्हणतातः—

मेरा मन लगा फकीरीमें । ( टेक )
डंडा कूंडा लिया बगलमें, चारों चक जागीरीमें ॥ मेरा० ॥
भंग तंग के टुकडा खाँदे, चाल चले अमीरीमें ॥ मेरा० ॥
जो सुख देखियो राम संगत में, नहीं है वजीरीमें ॥ मेरा० ॥

---

* तुका आतां ऐकलेंचि भलें । बैसोनि उगले राहावे तें ॥
एकान्तवास हा पसंत साधूसंतां ।

*



संन्यासी राम
( शेवटचें दर्शन. )

(राग–आनंद भैरवी. ता.–गजल)–बेदिली.

न गम दुन्याका है मुझको, न दुन्यासे किनारा है।
न लेना है, न देना है, न हीला है, न चारा है॥ १॥
न अपनेसे मुहब्बत है, न नफरत गैरसे मुझको।
सभोंको जातेहक देखूं, यही मेरा नजारा है॥ २॥
न शाही में मैं शैदा हू. गदाईमें न गम मुझको।
जो मिल जावे सोई अच्छा, वही मेरा गुजारा है॥ ३॥
न कुफ्र इस्लामसे फारिग न मिल्लत से गरज मुझको।
न हिंदु गिबरो–मुसलीम हूं, सभोंसे पंथ न्यारा है॥ ४॥

द्वारका मठाधीश शंकराचार्य **राजराजेश्वर तीर्थ** यांनीं पूर्ण वैराग्य प्राप्त होतांच संन्यास घेण्याचा उपदेश तीर्थरामजींनां केला होता. तीर्थरामजींचा विविदिषा * संन्यास पूर्वींच झालेला होता.

बेदिली (नाहिं सुभद्रा या वार्तेतें)

मज भिन्नाला या जगताची पर्वा मुळिं नाहीं।
देणें घेणे ढंग चोचले करणें नच कांहीं॥ १॥
सत्स्वरूप वस्तूंच्या–ठायीं बघणें मम धर्म।
तो वैभवगिरी अथवा फकिरी देती सम शर्म॥ २॥

---

१ जरूर, पर्वा, २ जगाची, ३ उदासीनता, पृथकपणा, ४ बहाणा, ५ लुच्चेगिरी, ६ भिडस्तपणा, भीड, प्रेम. ७ तिरस्कार, निष्काळजीपणा, ८ विरुद्धपणा, शत्रुत्व. ९ सर्वांनां, १० खरें स्वरूप, सत्स्वरूप, ११ दृश्यस्वरूप, १२ बादशाही वैभव. १३ आसक्त, मोहित. १४ फकीरी. १५ रहाणी, चरितार्थ, १६ फकीर, १७ निराळा, १८ मतमतान्तर, १९ पारशी.

* जो का वैराग्याच्या निर्धारीं। ज्ञानसाधनार्थ विचारी। शिखासूत्र कर्म त्याग करी। आत्मचिंतनावरी॥ ८२॥ ऐसा जो त्याग विलास। या नांव विविदिषा संन्यास। ऐशिया निष्ठें वर्ते तो हंस। एक परमहंस हा म्हणती॥ ८३॥ (ए. भा. अ. १८)

मिळेल त्यावरि चरितार्थाची करीन गुजराण ।
न मी निराळा काफिर अथवा तुल्य मुसलमान ॥ ३ ॥
हिंदु पारशी मुसलमान वा कोणि न यां पैकीं ।
सर्वांहुनि जो भिन्न असे त्या मजला अवलोकीं ॥ ४ ॥

जो संन्यास यावेळीं घ्यावयाचा होता तो विद्वत्सन्यास होय. तपोवनांतील सुमारें एक वर्षाच्या एकान्त सेवनानें प्रज्वलित वैराग्य व स्वरूपस्थिति हीं **तीर्थ**रामजींच्या आंगीं बाणलेलीं होतीं हें आपण पाहिलेंच आहे. त्यामुळें इ. स. १९०१[1] च्या आरंभाला ( शके १८२२ च्या मार्गशीर्ष महिन्यांत ) आपल्या वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी तीर्थरामजींनीं गंगामाईच्या पवित्र व रम्य तीरावर बसून शिखासूत्रन्यास केला, आणि 'ओम्, ओम्' असा एकसारखा जप करीत त्यांनीं भगवीं वस्त्रें परिधान केलीं ! ह्या विधीपासून त्यांना इतका आनंद झाला की, ते कांहीं तासपर्यंत तसेच समाधि स्थितींत बसले होते. हा सर्व सुखसोहळा पाहण्याचें भाग्य त्यांचे पट्टशिष्य **नारायण** स्वामी ह्यांना लाभलें ! तीर्थरामजींस संन्यासदीक्षा घेण्याविषयीं उपदेश करणारे आचार्य हे तीर्थसंन्यासी होते म्हणून तीर्थरामजींचें संन्यासाश्रमींचें नांव 'रामतीर्थ' असें प्रसिद्ध झालें. **राम 'तीर्थ' म्हणजे 'सत्य' झाले.** एकान्तीचें सुख कांहीं औरच आहे. संन्यास ग्रहणानंतर पुनः पांच सहा महिने रामतीर्थ एकान्तांत होते.

## तीर्थाटन.

यानंतर त्यांनीं उत्तर खंडाची यात्रा केली. **रामतीर्थांनीं** 'विचारें बरें अंतरा बोधवीजे' हा मार्ग प्रथम स्वीकारिला व मग तीर्थयात्रा प्रकरणाला आरंभ केला. हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. आत्मदेव प्राप्यर्थ्य त्यांनीं एकांतच * सेविला. गुलाब कलिका पूर्ण होऊन विकास पावली म्हणजे तिचा

---

१ याबंतर थोड्याच दिवसांनीं **विवेकानंद** ब्रह्मीभूत झालें.

* एकांतीचें सुख देई मज देवा ( तुका ).

चाळणा करावी सर्वे । येकांतीं राहतां बरे । येकांत मानला ज्याला । त्याला साधे हळू हळू ॥ ( स्फु. प्र. रामदास ).

आमोद आसपास पसरतो व त्याचा स्वाद घेण्याकरितां भ्रमरादि प्राणी धांवत येतात. त्याचप्रमाणें **रामतीर्थां**ची स्थिति झाली. पुष्कळ लोक त्यांच्या दर्शनाला येऊं लागले, हें पाहून स्वामींनीं आपला मुक्काम चार पांच मैल पुढें सरकविला. पण तेथेंही लोक आले तेव्हां **नारायण**स्वामी, **तुलाराम** यांना बरोबर घेऊन त्यांनीं **जन्मोत्री**ला प्रयाण केलें. येथें ते कांहीं दिवस एका गुहेंत व कांहीं दिवस पर्णकुटिकेंत होते.

येथें असतांना **यम्नोत्री**च्या उगमावर, हिमाच्छादित **सुमेरू** नांवाच्या शिखरावर ते गेले. एक महिन्यानंतर तेथून आठ नऊ कोसांवरील **बंदर पूछ** ( वानर पुच्छ ) या तीर्थाला ते आले. पुढे **वामसरू**च्या हिमलयमार्गानें **गंगोत्रीला** आले. हा मार्ग इतका बिकट आहे कीं, इतरांना दहा बारा दिवस तरी लागतात. परंतु **रामतीर्थ** फक्त तीन दिवसांतच आले. येथें एक महिना राहिल्यानंतर **वृद्ध केदार व त्रिजुगी** नारायण यांवरून **बडे केदार व बदरी नारायण** यांची यात्रा त्यांनीं केली. अशा रीतीनें सहा महिनें तीर्थें करून इस० १९०१ च्या डिसेंबर महिन्यांत ते **आलमोरा** ( रामकृष्ण कार्यालयाचें मुख्य ठिकाण ) येथे गेले व तेथून **मथुरेस** आले.

## मथुरेत राम.

' भारत धर्म महा मंडळाच्या ' आश्रयाखालीं भरलेल्या धर्ममहोत्सवाच्या अध्यक्षस्थानावर स्वामी शिवगणाचार्यांनीं × रामतीर्थांची योजला केली होती.

---

× स्वामी शिवगणाचार्यः-हे पूर्वी टपालखात्यांत नौकर होते. त्यांच्या ठिकाणीं वैराग्य उत्पन्न होऊन त्यांनीं संन्यास घेतला. पंजाबांत वेदान्तधर्म प्रसारार्थ त्यांनीं ' शांति आश्रम ' नामक धर्मसंस्था स्थापिली. इ. स. १९०० सालीं लाहोरला त्यांची व तीर्थरामजींची गांठ पडून त्यांच्याच विचारानें व सहाय्यानें त्यांनीं धर्म महोत्सव संस्था स्थापिली. तीर्थरामजीं बरोबर हे देवप्रयागपर्यंत गेलें. व तेथून परत फिरले. पुढें त्यांनीं मथुरेला इ. स. १९०० सालीं ' शांति आश्रम ' स्थापन केला. पुढें १९०१ सालीं मथुरेला एक मोठी धर्मसभा भरली होती. तिथें स्वामी रामतीर्थांनीं अध्यक्षपद स्वीकारिलें होतें. स्वामीं बरोबर कांहीं दिवस धर्मप्रवर्तनाचें कामही यांनीं केलें. हे इ. स. १९१४ च्या सुमारास ब्रह्मीभूत झाले.

या सभेच्या व्यास पीठावरून स्वामींनीं केलेल्या उपदेशाने लोक इतके मोहित झाले होते कीं, व्याख्यान बराच वेळ होऊनही श्रोत्यांची तृप्ति म्हणून होईना. गर्दी इतकी अतोनात होती कीं, अखेरीस सर्वांना यमुनेच्या वाळवंटांत जाणें भाग पडलें. तो काल शरदृतूचा असल्यानें तेथील रेती अगदी ओली होती. तथापि **राम** तेथे जाऊन उभा राहतांच कृष्णा मागें जशा गोपी तद्वत् श्रोतृगण त्यांच्यामागें गेला. व त्या रात्रीच्या वेळीं कडाक्याच्या थंडीत **रामाच्या** तोंडचीं मुक्ताफळें ऐकण्यास बसला. **रामतीर्थां**ची वाणी इतकी प्रेमरस पूर्ण होती कीं, ज्यांनां ज्यांनां तें वाळू गंगेचें अमृत प्यावयास सांपडले ते ते इतके आनंदित झाले की, त्यांना तेथून उठावेंसेंही वाटेना ! खरेंच आहे. सच्चिदानंद स्वरूप प्रत्यक्ष पुढे उभें असतां तें सोडून जावें असें कसे वाटेल !

येथून पुढे त्याला **सुर्जन लाल** पांड्ये यांनीं फेब्रुवारी १९०२ मध्यें ' साधारण धर्मसभेंत रामतीर्थाला फैजाबादेस नेलें. पुढें स्वामीनीं लखनौ, आग्रा, इत्यादि शहरी फिरून सनातन वैदिक धर्माचा लोकांना उददेश केला. याच सुमारास स्वामींनीं आपला **शिष्य नारायण** यास संन्यास दीक्षा देऊन सनातन धर्माचा उपदेश करण्यासाठीं सिंध प्रांतांत पाठविलें आणि आपण पुन एकदां **टिहरी** संस्थानांतील दाट जंगलांत गेले.

याच सुमारास **टिहरीच्या** महाराजांची स्वारी फिरतां फिरतां या अरण्या जवळ आली. तेव्हां येथें **राम** असल्याची खबर त्यांना समजली. म्हणून ते ताबडतोब रामतीर्थांच्या दर्शनाकरितां गेले. पूर्णत्वाला पोचलेल्या, अहंब्रह्मास्मीचा अनुभव घेतलेल्या महानुभाव साधूच्या दर्शनानें सामान्य व नास्तिक मनुष्य कसा छिन्नसंशय होतो याचें स्वामी रामतीर्थांसंबंधांचें हें दुसरें उदाहरण आहे. टिहरीचे महाराज हे स्पेन्सरसारख्याच्या तत्वज्ञानानें पूर्ण निरीश्वरवादी बनले होते. परंतु रामाच्या मुलाखतीनंतर त्यांचे सर्व संशय फिटून ते पूर्ण आस्तिक बनले. एवढेंच नव्हे तर वे त्यांचे भक्त बनले.

## दिग्विजयार्थ संचार.

' तो मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरिला । योगबळें

आवरला । सज्ज होवोनी ॥ ६ ॥ तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम । तें माझें निजधाम । होवोनि ठाके ॥ ७ ॥ *

( ज्ञाने. अ. ८ ).

ही योग्यता **स्वामीरामतीर्थांना** प्राप्त झालेली होती असें आतांपर्यंतच्या चरित्रावरून कळलेंच आहे- अशा स्वरूपाचा तेजस्वी सूर्य पश्चिमेकडे गेल्यास तिकडे अंधःकार कसा राहणार ? तिकडील सर्व विद्या व विद्याविभूषित लोक ह्यांची स्थिति ह्या ज्ञानरवीपुढें खद्योतासारखी झाली असल्यास काय नवल ?

इ० स० १९०२ च्या जुलई महिन्याच्या वर्तमानपत्रांत अमेरिकेतील शिकागोप्रमाणें जपनांत टोकियो येथें एक सर्व धर्म परिषद् भरावयाची आहे असें प्रसिद्ध झालें होतें. **स्वामी विवेकानंदासारख्या** तेजस्वी महानुभावानें शिकागो येथें दाखविलेल्या कर्तबगारीची स्मृति भारतवासी यांच्या मनांत ताजीच होती. अमेरिकेंत **विवेकानंदांनीं** रोविलेला आर्यतत्वज्ञानाचा खुंटा हलवून बळकट करण्याचा असा योग्य समय आणि **स्वामी रामतीर्थांसारखा** अधिकारी पुरुष ह्या दोन्ही गोष्टी अनायासानें जुळून आल्यास त्यांचा फायदा घेण्यास कोण चुकेल ?

अशा संधीचा फायदा टिहरीच्या महाराजांनीं घेतला व त्याप्रमाणें त्यांनीं **रामाला** आपला मनोरथ कळविला. ताबडतोब रामतीर्थांनींही आपली संमति दिली. लागलीच **थॉमस कुक** कंपनी मार्फत **रामतीर्थांना** जपानला पाठविण्याची त्यांनीं व्यवस्था केली; आणि स्वामी **रामतीर्थही** जाण्याकरितां कलकत्त्याला निघून आले व तेथें श्रेष्ठी **सीतारामजी** नांवाच्या सुप्रसिद्ध व्यापाऱ्याकडे मुक्काम केला.

## जपानांत संचार.

**कलकत्त्यास आल्यावर मंडळीच्या आग्रहावरून त्यांनीं नारायण स्वामींना बरोबर घेतलें व इ. स. १९०२ या वर्षाच्या आगष्ट महिन्याच्या**

* ' मिळवायाचें मेळविलें । आतां कांहीं नच उरलें ।

२८ व्या तारखेस वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी **वैदिक धर्मांत पारंगत होऊन व ब्रह्मानुभवांत रंगून, वैदिक धर्माचें प्रतिनिधी ह्मणून आधुनिक शास्त्रज्ञानाच्या प्रकाशांत वैदिक धर्माचें उज्ज्वल अलम दुनियेला दाखविण्याकरितां व जगाच्या आध्यात्मिक ज्ञानभांडारांत अमूल्य भर टाकण्याच्या महत्कार्याकरितां स्वामी रामतीर्थांनी** 'वन्दे मातरम्' म्हणून प्रयाण केले. जपानांत जाऊन दाखल होण्याला त्यांनां सुमारें दोन महिने लागले. वाटेत जातांनां पेनांग, हांगकॉग, शांघाय, नागासाकी, याकोहामा वगैरे ठिकाणे त्यांनां लागली व त्या त्या ठिकाणच्या सिंधी व्यापाऱ्यांनी त्यांचा हांमकॉग येथे आठ दिवस मुक्काम करविला. तेथें रामतीर्थांनी उत्सुक श्रोतृगणाला धर्मामृत पाजिलें. जपानांत पोहोंचल्यावर धर्मपरिषदेची ती निव्वळ गप्प होती असे त्यांनां टोकिओ येथे समजलें. ह्मणून जरी **रामतीर्थ** तेथें थोडेच दिवस होते तरी त्या थोडक्या काळांतील त्यांनीं केलेले कार्य मात्र फारच मोठें होतें.

## 'वेदान्ताची मूर्तिमंत प्रतिमा.'

'जपानांत असतांनां स्वामींची व्याख्यानें इंग्रजींत झालीं. इंग्रजी भाषा जाणणारे लोक फारच थोडे होते तथापि स्वामीचे शब्द 'एखाद्या ज्वालामुखी पर्वतांतून निघणाऱ्या ज्योतीप्रमाणें भासतात व विद्युत्स्फुलिंगांप्रमाणे अंतःकरणावर परिणाम करितात' असें उद्गार इंग्रजी न समजणाऱ्या लोकांच्या तोंडून निघाले! एका वर्तमानपत्रकारानें त्यांना '**वेदान्ताचे उत्साही आचार्य**' असें ह्मटलें आहे तर जपानी चित्रकार म्हणतात 'स्वामींच्या भाल प्रदेशीं चमकणारें तेज आमच्या पवित्र 'फुशिमा' पर्वताच्या बर्फाच्छादित शिखरांप्रमाणें मनोवेधक वाटे आणि त्यांच्या मुखांतून वाहणारे स्फूर्तिजनक शब्द जणुं काय **चैतन्याचा गाभाच** आहेत असें वाटे.'[1]

**टोकियो** येथील बादशाही विश्वविद्यालयांत स्वामींचें 'यशाची गुरुकिल्ली' ह्या विषयावर व्याख्यान झालें. याचा तेथील विद्यार्थी व अध्यापक

---

१ रा. फडके कृत भाग ५

वर्ग यांच्या मनावर तर अगदीं विलक्षण व टिकाऊ असा परिणाम झाला. त्या विद्यालयांतील संस्कृत भाषेचे मुख्य अध्यापक पंडित **टाकाकात्सू** हे स्वामींसंबंधानें म्हणाले 'संस्कृत भाषेच्या अभ्यासाकरितां इंग्लंडमध्ये असतांना पंडित मोक्षमुल्लर यांच्या घरीं किंवा जर्मनींतील कांहीं ठिकाणीं हिंदुस्थानांतील मोठमोठ्या पंडितांच्या किंवा साधूंच्या भेटीचा लाभ मला घडला; परंतु स्वामी रामतीर्थासारखा सत्पुरुष आजपर्यंत आढळला नाहीं. थोडक्यांत सांगावयाचे तर स्वामी हे **वेदान्ताची मूर्तिमंत प्रतिमा होत !'**

जपानांतील बौद्धपंडित व चिकागोच्या धर्मपरिषदेंतील बौद्धधर्माचे प्रतिनिधि **किन्झा हिराई** ह्यानां तर चिनी व जपानी धर्मग्रंथांत वर्णन केलेल्या बुद्धकालीन महात्म्यांप्रमाणेंच स्वामी रामतीर्थ आहेत असें वाटे व ते रामतीर्थांचा '**केवल ज्ञानीराम**' या गौरवपूर्ण व यथार्थ शब्दांनीं उल्लेख करीत.

## पूरणची भेट.

स्वामी रामतीर्थ जपानांत गेले त्या काळांत बरेच भारतीय तरुण कला व शास्त्रें शिकण्याकरितां तेथे गेलेले होते. त्यांना स्वामींच्या आगमनाची वार्ता समजतांच त्यांनीं त्यांचें उत्तम स्वागत केलें. अशा विद्यार्थ्यांमध्यें **पूरण** नांवाचा एक उत्साही शीख विद्यार्थी असून त्यानें जपानांतील हिंदी विद्यार्थ्यांनां प्रोत्साहन व मदत देण्याच्या इरायानें 'हिंदु—जपानी मंडळ' नुकतेंच स्थापिलें होतें व त्याच्या चिटणविसाचें काम तो करीत होता. **रामतीर्थांचीं** व्याख्यानें ऐकून त्याच्या मनावर असा परिणाम झाला कीं, त्यानें परोपकाराकरितां देह कारणीं लावण्याच्या दृढ इरायानें संन्यास घेतला व वेदान्ताचा उपदेश करीत जपानांत खेडोपाडीं फिरूं लागला. तसेंच 'गडगडणारा उषःकाल' नांवाचें मासिकपत्रही सुरू केलें. यांमध्यें प्रथमतः स्वामी रामतीर्थ पुष्कळ लिहीत असत; पण पुढें हिंदुस्थानांत आल्यावर पूरण सिंहजींनीं गृहस्थाश्रमांत पुनः प्रवेश केला. * तथापि हे अजूनपर्यंत स्वामींचे कट्टे भक्त आहेत.

---

* हे सध्यां हयात असून ह्यांनीं 'In The Woods of God Realization' ह्या पुस्तकांपैकीं एकाला (भाग ४ था) प्रस्तावनेदाखल लिहिलेलें '**रामचरित्र समीक्षण**' महत्त्वाचें आहे.

याच सुमारास प्रो. छत्रे यांची जगविख्यात सर्कस जपानांत होती. तिचे मालक खुद्द विष्णुपंत छत्रे हे रामाच्या आनंदी चेहेऱ्यानें व उपदेशामृतानें इतके मोहून गेले कीं, त्यांनीं स्वामींना आपल्याबरोबर अमेरिकेंत येण्याला विनविलें व स्वामी गेले.

## अमेरिकेंत संचार.

स्वामी **रामतीर्थ अमेरिकेंत** कां गेले ? तेथें जाऊन त्यांना कांहीं कर्तव्य होतें काय ? वगैरे प्रश्न मनांत येतात. परंतु रामतीर्थ हे कोणताही विशिष्ट हेतु मनांत धरून तेथें गेले नसून परमेश्वरी योजनेनुरूप जगदुद्धाराचें काम करण्यासाठीं त्यांना तेथें जाण्याची बुद्धि झाली हेच वरील प्रश्नांना योग्य उत्तर आहे असें वाटतें. अर्थात् अमेरिकेंत असा महात्मा येण्याची आवश्यकता होती असेंच म्हणावें लागते. कारण अमेरिकेनें तिला आज प्राप्त झालेल्या वैभवाचा व मोठेपणाचा प्रारंभ त्याच वेळीं म्हणजे विसाव्या शतकाच्या प्रारंभीं केलेला होता. जडविज्ञानाच्या प्रयोगशाळेंत बसून नानातऱ्हेचे ऐहिक ऐश्वर्यवर्धक प्रयोग करून पहाण्यांत ती अगदीं चूर होती, धार्मिक प्रवृत्ति अगदीं नष्ट होऊन अधार्मिकपणा, व बहिर्मुखता वाढत चालली होती, लक्ष्मीच्या उपासनेंत जो तो गर्क होता. यामुळें ईश्वर आहे ही भावना पार मावळली होती, पुनर्जन्म व आत्म्याचें अमरत्व ह्या निव्वळ काल्पनिक गोष्टी आहेत, त्यांत सत्यांश बिलकुल नाहीं अशी सर्वसाधारण लोकांची भावना झाली होती. यामुळें 'वेदांत उर्फ आत्म्याचें रसायनशास्त्र' असें एखादें प्रयोगार्ह व अनुभवप्रमाणशास्त्र असेल अशी कल्पनाही तेथील लोकांच्या मनाला शिवली नव्हती ! अशा स्थितींत स्वामी **विवेकानंदांनीं** वेदान्ताच्या मात्रेचे कांहीं वळसे अमेरिकन लोकांना दिलें होते. हेंच काम पूर्ण करून भरतभूमीचें स्वभावप्राप्तकर्तव्यकर्म तिच्या हातून करविण्याचें महत्कार्य स्वामी रामतीर्थांकडून व्हावयाचें होतें व तें त्यांनीं निर्दोष व आश्चर्यकारक रीतीनें केलें. किंबहुना वेदान्त व भौतिकशास्त्रें यांच्या मर्यादा निश्चित केल्या, आणि विसाव्या शतकांतील सांस्कृतिक स्थित्यंतराची प्रर्वतप्राय लहरी उठवून देण्याचें अलौकिक कार्य केलें ! हें एवढें अचाट कार्य करणारे महात्मे केवळ्या मोठ्या ओजाचें

असले पाहिजेत ह्याची कल्पना येऊन ते खरेखुरे जगदुद्धारक महात्मेच होत अशी खात्री पटूं लागल्यास त्यांत काय नवल ?

स्वामींच्या या संचाराचा आणखी थोडा व्यापक दृष्टीनें विचार करितां येण्याजोगा आहे.

एकोणिसाव्या शतकांत भौतिक शास्त्रांचा उदय होऊन त्यांची अतोनात प्रगति झाली. आणि तिनें पश्चिमेकडील सर्व जग व्यापून टाकिलें. गेल्या शतकाच्या अखेरच्या वर्षांत व विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून तर त्या प्रगतीपासून जन्म पावलेल्या संस्कृतीची मस्ती इतकी वाटली कीं, तिच्या थैमानाला तें जग अपुरें पडून पूर्वेकडील जगांत तिचा धुमाकूळ सुरू होऊन त्यालाही तिने आत्मसात् करण्याचा तडाका झपाट्यानें चालविला आणि अशा रीतीनें पौर्वात्यांच्या पौर्वात्यपणाला खग्रास ग्रहण लागण्यास सुरुवात झाली. ही संस्कृति म्हणजे निखालस माया आहे असे आज जसें पुष्कळांना वाटूं लागलें आहे तसें त्या वेळीं फारच थोड्यांना वाटलें होते. या मायेची, या संस्कृतीची सर्व मदार भौतिक म्हणजे पंचमहाभूतांच्या सामर्थ्यावर आहे. या संस्कृतीनें पंचभूतांवर विजय मिळविलेला नसून त्यांच्या अचाट सामर्थ्यांचा आगगाड्या, तारायंत्रें यांसारख्या विविध रूपांत उपयोग करणें, त्यांतच गढून जाणें, अशा रीतीनें भौतिकभाव, आणि भौतिक अहंकार वाढविणें हीच जीवाची इतिकर्तव्यता आहे, हे कार्य त्या संस्कृतीनें केलें. ह्याच कार्याला ' पंचमहाभूतांवरील नवीन स्वरूपाचा विजय ' हें गोंडस व मोहक नांव देऊन तिनें सर्वत्र बाजार मांडला. हा मायेचा बाजार पाहून पूर्वेकडील पुष्कळ राष्ट्रें भुलली हें आश्चर्य नसून पौर्वात्यांचें अंतःकरण व आध्यात्माची खाण अशा भारत वर्षाला देखील तिनें भुलविलें ! मायाच ती ! !

भारत वर्षावर ही भूल, ही माया चढाई करीत आहे असें दिसतांच भारत वर्षांतील ' देही ' खडबडून जागा झाला व त्यानें आपला प्रकाश, आपला प्रभाव रामकृष्ण विवेकानंदादिकांच्याद्वारें मायेला दाखविण्यास सुरुवात केली. पण ही सुरुवात, भारतवर्षाच्या दिव्यप्रभावाचा हा उपक्रम, आशियाच्या अंतःकरणांतील तेजोराशीचा उदय, जगाच्या आध्यात्मकेंद्राच्या आक-

र्षणाचा उपक्रम, फक्त स्वसंरक्षणाच्या संकुचित स्वरूपाचा नसून जगरूपी विराट देहावर पडलेल्या मायापाशांना व तिच्या मोहिनीला तोडून टाकण्याच्या व्यापक स्वरूपाचा होता असेंच म्हणावें लागतें. कारण भगवान् रामकृष्ण, विवेकानंद, रामतीर्थादि महात्मे व्यक्तीविषयक अथवा राष्ट्रविषयक संकुचित भावनेच्या पलीकडे असून 'अहंब्रह्मास्मिाच्या' उत्तुंग शिखरावरून 'आत्मवत्सर्वभूतेषु' या दृष्टीनें अखिल मानवजातीकडे पहात होते. शिवाय पाश्चात्य संस्कृतीने ज्या मोहिनीनें जगाला भुलवून त्याचें अधःपतन आरंभिले होते व आहे, तिच्या जाळ्यांतून पूर्वेकडील व त्याच बरोबर पश्चिमेकडील समाजांना मुक्त करण्याचे वेदान्त, बौद्ध धर्म, थिऑसफी, *बाहैपंथ आणि इतर संप्रदाय यांच्याद्वारें त्यांच्या आचार्यांनी जे प्रयत्न केले व चालू आहेत, त्या सर्वांचा इतिहास पाहिल्यास वेदान्त ज्ञान-

---

* बाहैपंथः—शिराझ ( इराण ) येथील एका मुसलमानी व्यापाऱ्याच्या 'बाब' नांवाच्या मुलानें इ. स. १८४४ साली 'जगावरील सर्व मनुष्यामध्यें बंधुभावाचें नातें आहे' या मताचा प्रसार करण्यास सुरवात केली. पांचसहा वर्षांत त्याला देहान्त प्रायश्चित्त मिळालें. परंतु ईश्वरी प्रेरणेने 'मीर्झा हुसेन अल्ली' नांवाच्या इसमानें त्याची गादी चालविली. तेव्हांपासून त्याच्या पंथाला 'बाहा–ओ–अल्ला' ( ईश्वराचें ऐश्वर्य ) हें नांव मिळालें. यालाही आयुष्याचीं ४० वर्षे हद्दपारी व कारागृहवास यांत घालावीं लागलीं ! याच्या मागून त्याचा मुलगा 'अबदुल बाहा अब्बास' ह्यानें ती गादी चालविली. यालाही कारागृहवासादि यातना व छळ सोसावे लागले. हा नुकताच मरण पावला ( नोवेंबर १९२१ ). हा अनुभवी आत्मज्ञानी होता अशी त्याची प्रसिद्धी आहे. याचे पुष्कळ अनुयायी हिंदुस्थान, इराण, अमेरिका इत्यादि देशांत आहेत. गेले महायुद्धापूर्वी किती तरी वर्षें अगोदर ह्यानें '**पुढें महायुद्ध होणार**' हें भाकित केलें होतें. याच्याच मतांमुळें '**राष्ट्रसंघासारखी**' शांतताप्रवर्तक संस्था उदयास आली असें म्हणतात. हा या पंथाचा तिसरा आचार्य होता. 'सार्वत्रिक शांतता व बंधुभाव' हेंच या पंथाचें आद्यसूत्र आहे.

मंगेचें कार्यच त्याच्या व्यापकता, समर्पकता, गांभीर्य इत्यादि असामान्य गुणसमुच्चयामुळें विशेष उठावदार दिसतें हें निःपक्षपातीबुद्धीला सहज कळण्याजोगें आहे. आतां हें खरें कीं, जगतावर जमलेलें मायापटल अद्यापि मुळींच दूर सारलें गेलें नसून, मायापटल आहे एवढी जाणीव काय ती, आज होऊं लागली आहे. ही 'दुरत्ययामाया' सहजासहजी दूर होत नसते. त्याला पुष्कळ कालावधीच पाहिजे. '**वेदान्ताची छाप सर्व जगावर पडली पाहिजे–सत्याची ध्वजा सर्वत्र फडकलीच पाहिजे** ! ह्या स्वामी रामतीर्थांच्या अमोघवाणीची सत्यता पटण्याला किती तरी काळ लोटावा लागेल हें 'वैभवसूर्य पश्चिमेकडे जात असून लौकरच तो पूर्वेकडे उगवून भारतवर्षावर प्रकाशत राहील' ह्या त्यांच्याच उद्गारांवरून कळण्याजोगें आहे. सारांश वेदान्तज्ञान हेंच सत्यज्ञान आहे. ही जाणीव पाश्चात्य संस्कृतिरूप मायेच्या पोटांत–अमेरिकेसारख्या राष्ट्रांत–उत्पन्न करून खुद्द मायेलाच रोगयुक्त करण्यासाठीं, मायेला लागणाऱ्या खग्रास ग्रहणाचा 'वेध' लावण्याकरितां परमेश्वरी योजनेनेंच **रामतीर्थ** तिकडे गेले असें म्हणावें लागतें व तें त्यांच्याच उद्गारांवरून स्पष्ट होतें:—

'तुमच्या प्रत्येक कृत्यांत आणि हालचालींत ईश्वरत्व भरलेलें आहे. जर्मनी इंग्लंड, अमेरिका, हिंदुस्थान, तसेंच सर्व देश यांनां जागृत करून स्वतंत्र करणें हें माझें कर्तव्य आहे....स्वप्नांत भटकणाऱ्या लोकांनो ! माझ्या तुताऱ्यांचा आवाज तुमच्या कानांपर्यंत पोहोचला नाहीं काय ? प्रत्यक्ष हिमालया हलवून सोडणारी मेघगर्जना तुमच्या कानांवर येऊन आदळली नाहीं काय ? **रामाचा** तुमच्यांतील परमात्म्याचा हा हुकूम आहे. आणि **रामाची** आज्ञा अलंघ्य आहे.'

विवेकानंदांची ती भव्य मूर्ति, तो पाणीदार चेहेरा आणि त्यांनी केलेली कामगिरी ह्यांची स्मृति अमेरिकन लोकांनां ताजीच होती, यामुळें हिंदु लोक ज्यांला 'साधू साधू' असें ह्मणतात ते इकडील साधूंपेक्षां अगदीं निराळे असून विशेषतः हिंदुस्थानांतील साधुपुरुष हे खरोखरीच असामान्य असतात, असा अनुभवजन्य विश्वास त्या लोकांत उत्पन्न झाला असून हिंदुस्थानांतील

साधूं विषयीं त्यांच्या मनांत आदरभावाला जागा मिळाली होती. अशा वेळीं स्वामी रामतीर्थांच्या गमनानें हिंदू साधूंविषयींचा आदर वाढला. एवढेंच नसून हिंदुस्थानबद्दल सहानुभूति उत्पन्न झाली. हिंदू धर्माबद्दल, सनातन वैदिकधर्माबद्दल आदर वाढत चालला आणि हिंदुस्थानांतील साधु हे खरेच अद्वितिय पुरुष असतात असें अमेरिकन लोकांनां मनापासून वाटूं लागलें.

स्वामी **रामतीर्थ** हे जसे उद्दिष्ट हेतु नसूनही अमेरिकेंत गेले तशी त्या परक्या देशांत त्यांची ओळखही नव्हती अथवा एकादा जिवलगही नव्हता. परंतु स्वामी सारख्या संन्याशाला सर्वच जिवलग होते; कारण स्वतः **रामतीर्थांनीं** सर्वांचे जिव-लग ( अगदीं निकट ) असल्याचा अनुभव घेतला होता. याचें उदाहरण स्वामींनीं अमेरिकेंत पाय ठेवण्यापूर्वींच दिसून आलें होतें स्वामी ज्या आगबोटींत होते ती सानफान्सिस्को ( अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील मोठें बंदर ) या बंदराला लागावयाची होती, ती किनाऱ्याजवळ येतांच सर्व उतारूंत एकदम हालचाल सुरू झाली. जो तो आपलें सामानसुमान बांधू लागला. पुष्कळजण आप्तेष्टांनीं फुललेल्या आगबोटीच्या धक्याकडे पाहूं लागले, पण स्वामीमात्र जाग्यावरून न हालतां अगदीं शांत व बेफिकीर राहिले. ती त्यांची भगवें वस्त्र परिधान केलेली, तेजःपुंज, आनंदी, शांत, गंभीर आणि बेफिकिर मूर्ति पाहून निवळ कुतूहलामुळें एक अमेरिकन सद्गृहस्थ त्यांच्याजवळ गेला. तेव्हां त्यांमध्यें पुढें दिलेला संवाद झालाः—

**गृहस्थः**—' आपलें सामानसुमान कोठें आहे ' ?

**स्वामीः**—स्वतःला नेतां येईल इतकेंच सामान **राम** बाळगतो.

गृ०ः—आपणाजवळ कांहीं द्रव्य आहे का ?

**स्वा०ः**—नाहीं, **राम** द्रव्याला शिवत नाहीं.

गृ०ः—आपण येथेंच उतरणार असाल ?

**स्वा०ः**—होय.

गृ०ः—मग आपणांला मदत करणारी मंडळी येथें असेल तर ?

**स्वा०ः**—होय.

गृ०:—कोण बरें ?

स्वा :—( त्या गृहस्थाच्या खांद्याला स्पर्श करून ). 'तुह्मी' !

स्वामींच्या या शब्दाचा त्या गृहस्थावर असा कांहीं विलक्षण परिणाम झाला कीं, स्वामी अमेरिकेंत असेपर्यंत त्यांची बरदास्त ठेवण्याचें काम हाच गृहस्थ करी. केवळ हा परकेपणाचा अभाव ! सर्वात्मभाव आंगीं बाणल्याशिवाय असे हृदयस्पर्शी उद्गार निघतील काय ?

**सानफ्रान्सिस्कोहून सियाटल वॉशपर्यंतचा** स्वामींचा संचार प्रो. छत्रे यांच्या द्वारें झाला. पण या थोड्या अवधींतील स्वामींच्या परिचयामुळें अमेरिकन लोकांचीं मनें इतकीं ओढलीं गेलीं कीं, त्यानां स्वामी हे आपलेच आहेत असें वाटूं लागलें व तेव्हांपासून स्वामींच्या या पुढील अमेरिकेंतील संचाराची व्यवस्था व जुळवाजुळव त्यांनीं केली. हे गृहस्थ डॉ. आल्बर्ट हिलर हे होते.

## अमेरिकेंतील रहाणी.

स्वामी हे जन्मतःच संन्याशी होते असें म्हटल्यास चालेल. तशांत यावेळीं तर ते लौकिक दृष्टयाही संन्यासी बनले होते. यामुळें त्यांची रहाणी त्या आश्रमधर्माला अनुरूप असणें हेंच योग्य व इष्ट होतें. अयाचित वृत्तीची रहाणी हा संन्याशाचा धर्म स्वामींनां जन्मतःच प्राप्त झालेला होता. शिवाय 'आह्मीं काय कुणाचें खातोरे ! तो राम आह्मांला देतोरे' ( रामदास ) हा अनुभव घेऊन ते चुकले होते. एवढेंच नव्हे तर त्यांनीं हा अनुभव वानप्रस्थाश्रमांत आपल्या बरोबरच्या मंडळीलाही आणून दिल्याचें वाचकांना स्मरत असेलच. याचमुळें अमेरिकेंत एका गृहस्थाला उत्तर देतांनां स्वामी म्हणाले ' मी परमात्म्याशीं एकतानतेनें रंगतों, भूक लागली असतां अन्न घालणारा आणि तहान लागली असतां पाणी देणारा ह्या जगांत कोणी तरी आहे अशी माझी पूर्ण श्रद्धा आहे. अन्न आणि पाणी याशिवाय मला कशाचीही जरूर भासत नाहीं यामुळें मला कसलीच अडचण पडत नाहीं. *

* जगीं पाहतां देव हा अन्नदाता । तया लागली तत्त्वता सार चिंता॥९३॥ ( म. श्लोक ).

स्वामी सुमारें अमेरिकेंत अडीच वर्षे होते. तथापि व्याख्यानांचा काळ-खेरीज करून राहिलेला वेळ ते क्यालिफोर्नियाच्या जंगलांत काढीत. स्वामीं-सारखा विद्वान् व आत्मानुभवी संन्यासी आपल्या आनंदविलासी राजवाड्यांत येऊन रहावा असे तेथील लक्ष्मीधरांना वाटणें अगदीं साहजिकच आहे परंतु हे पडले संन्यासी. त्यांनीं आत्मानंदाचें सेवन केलें होते, त्यांनीं 'सर्व दृश्य विसंच केलेलें होतें,' मायेला व तिच्या नानाविध ढंगांना ओळखून पलीकडे जाऊन आसन मांडिलें होतें आणि 'जाणिवेची मक्षिका भक्षिली होती.' यामुळें ज्या भ्रामक आनंदाचा आस्वाद घेण्याला ते लक्ष्मीधर स्वामींना विनवीत होते त्याकडे ढुंकूनही पहाण्याचें त्यांनी नाकारावे हेंच योग्य होय. * स्वामींनीं त्या सर्वांच्या विनंत्या नाकारून एका टेकडीवर आपला तळ दिला. येथील त्यांच्या रहाणीचें एका अमेरिकन गृहस्थानें वर्णन केलें आहे. त्यांत तो म्हणतो 'ज्या टेकडीवर स्वामी रहातात, ती उंच असून सभोंवार हिरव्या गार गर्द झाडीच्या मच्छरदाण्या लाविलेल्या आहेत, जवळूनच साक्रामेन्टो नदी धो धो वहात आहे. मधून मधून सुंदर पक्ष्यांची गाणी व आलाप चाललेलेच असतात. स्वामींना फिरण्याचा शोक असल्यामुळें ते लांबवर सहल करितात. जरी ते नेहमीं विचारांत गर्क असतात तरी ते अगदी आनंदी, साधे बेफिकिर आणि उत्साही असतात.

कधीं कधीं साक्रामेन्टो नदीमधील खडकावर बसून तासच्या तास चिंतनांत घालवितात, व कधी कधीं तर ते दिवसच्या दिवस व आठवडेच्या आठवडे तेथेंच घालवितात. त्या काळांत कधीं पुस्तकें वाचतात व कधीं कधी उदात्त विचारांनीं भरलेल्या काव्यगंगेचा ओघ आम्हांला सोडितात. +शास्ता

*'वारके फैकूं मै इसपर दो जहां का मालोजार' (स्वामीराम).

(ह्या आत्मानंदावर मी दोन्ही जगांतील धनदौलत ओंवाळून फेकून देतों.)

ब्रह्मरस गोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ (तुका.)

+'शास्ता स्प्रिंग' हे अमेरिकेंतील वनश्रीच्या अपूर्व सौंदर्याचें एक ठिकाण आहे. येथें मोठे मोठे लोक येऊन हवापालटाकरितां रहात असतात.

येथून येणाऱ्या पाहुण्यांचें ते अति प्रेमानें स्वागत करितात. व एखाद्या लहान मुलाप्रमाणें हंसतात, व खिदळतात. कधीं कधीं दिवसच्या दिवस ध्यानांत असतात. त्यांची स्वदेशभक्ती, व स्वदेशोद्धाराची कळकळ हीं अत्युच्च दर्जाचीं आहेत.

येथें रहात असतांना स्वामी स्वतःला लागणारीं लांकडें स्वतः डोक्यावरून आणीत. आणि फळें, मुळें, दूध आणि शाकभाजा यांवर उपजीविका करीत. स्वामींच्या या आहारविहार पद्धतीवरून परदेशांत जाणाऱ्या हिंदी तरुणांना पुष्कळच बोध घेण्यासारखा आहे. असें कोणीही विचारी मनुष्य कबूल करील. स्वामी विवेकानंदांच्या अमेरिकेंतील खानपान व्यवहाराकडे बोटे दाखविण्यास लोक चुकले नाहींत, हें ध्यानांत बाळगूनच स्वामींनीं ही रहाणी पत्करिली असावी असें मनांत आणण्याऐवजीं आपल्या आचरणांत दोषास्पद नसावें ह्या जाणीवेनेंच तसें आचरण त्यांनीं केलें असें मानणें इष्ट व योग्य आहे असें वाटतें.

स्वामी ही एक दिव्य विभूति होती, हेंच खरें. कारण त्यांच्या सहवासाची इच्छा तेथील सर्व लहान मोठ्या लोकांच्या मनांत उत्पन्न झालेली होती. खुद्द प्रेसिडेन्टही स्वामींच्या दर्शनाला आले होते. त्यांच्या सहवासांत असतांना कोणीही यत्किंचित् दुःखी नसे. त्यांचें सूर्यप्रकाशासारखें उज्वल मुखकमल पाहतांच शंकितांच्या मनांतील शंका पार वितळून जात. आणि त्यांचें पूर्ण समाधान होऊन जाई. पूर्णावस्थेला पोंचलेल्या म्हणजे खुद्द परमेश्वर बनलेल्या महात्म्यांच्या दर्शनाबरोबर वर वर्णन केलेली स्थिति होत असते, याचा अनुभव पुष्कळ हिंदवासीयांना आहे. तथापि पश्चिमेकडील नास्तिक व भोगप्रधान भूमींतील लोकांनाही तसाच अनुभव आल्याचीं एकदोन उदाहरणें दिल्यास तीं अनावश्यक होतील असें नाहीं.

---

१. रूझवेल्ट यांच्याच तडजोडीनें १९१३ सालीं अमेरिका व जपान ह्यांचें युद्ध टळलें.

एकदां एक अमेरिकन बाई स्वामींशीं वादविवाद करण्याच्या उद्देशानें आली. ती पक्की नास्तिक होती. ती आली तेव्हां स्वामी समाधिसुखांत पोहत होते. म्हणून समाधी उतरेपर्यंत ती तशीच त्यांच्याकडे पहात राहिली. स्वामींची समाधि उतरतांक्षणींच ती म्हणाली, ' महाराज, मी नास्तिक नाहीं. तुमच्या दर्शनानें माझे सर्व संशय पार मावळले '

**बेलमन** नांवाच्या दुसऱ्या एका बाईची स्वामींच्या ठिकाणीं इतकी दृढ भक्ति व निष्ठा जडलीकीं, तिनें आपल्या पाश्चात्य पोषाखाचा त्याग करून संन्याशासारखी भगवी कफनी धारण केली. एक पैदेखील जवळ न बाळगतां परमेश्वरावर विश्वास टाकून निरनिराळीं क्षेत्रें केलीं, आणि अखेरीस स्वामींच्या जन्मभूमीचें दर्शन घेण्याकरितां इकडे येऊन दर्शन घेऊन धन्यता मानली.

स्वामींच्या उज्ज्वल, चारित्र्याचा, अनुकरणीय आचरणाचा, विश्वव्यापी प्रेमाचा, त्यांच्या ठिकाणीं दृग्गोचर होणाऱ्या परब्रह्मत्वाशिवाय दुसऱ्या कशाचाही हा परिणाम नव्हे. असेंच कबूल करावें लागतें. कारण स्वामींनीं ज्या ज्या ठिकाणीं संचार केला त्या त्या ठिकाणीं आपल्या विशिष्ट मतांचा प्रसार करणें, अगर आपलें प्रस्थ माजविणें ह्यांपैकीं एकही गोष्ट त्यांचें ध्येय नव्हतें. हें त्यांच्याच उद्गारांवरून स्पष्ट होतें. ते ह्मणतातः—" **बुद्ध**, **महंमद**, **ख्रिस्त**, किंवा, इतर अवतारी पुरुष ह्यांच्याप्रमाणे लाखों अनुयायांची खोगीर भरती करणें हें कांहीं **रामाचें** कर्तव्य नव्हे. तर यच्चयावत् स्त्रीपुरुषांमध्यें भरलेला जो **राम** त्याची सर्वांना ओळख करून देणें हेंच **रामाचें** इतिकर्तव्य आहे. " स्वामींनीं अशा त्या सर्व व्यापी रामाची ओळख करून घेतली होती म्हणूनच त्यांना इतरांनां असें सांगतां आलें.

अमेरिकेंतील सर्व लोक लक्ष्मीचे निःस्सीम भक्त असल्यामुळें प्रत्येक गोष्टीला किंमत पडते. नामांकित वक्त्यांचीं व्याख्यानें फुकट होत नसतात, व्याख्यानांच्या जागांचें भाडें देखील अतीशय पडतें. अशी परिस्थिती असून देखील स्वामी आपलीं व्याख्यानें मोफत करवीत. अशा स्थितींत व्याख्यान करविण्याचा खर्च अर्थातच तेथील लोकांवर पडे. तरीसुद्धां ते स्वामींच्या व्याख्यानांनीं इतके मोहून गेले कीं, कधीं कधीं स्वामींना दिवसांतून चारचार

पांचपांच [illegible] यावी [illegible]. या [illegible] स्वामींवर त्यांचें केवढें प्रेम जडलें होतें व त्यांच्या [illegible] ते किती दगदग सोशीत असत हेंही दिसतें. पुढें पुढें तर स्वामींच्या परिश्रमामुळें त्यांच्या व्याख्यानांनींही अमेरिकन लोकांची ज्ञानलालसा अतृप्तच राहूं लागली. म्हणून वेदांत शिकविण्याचे वर्ग काढिले. अशा रीतीनें स्वामी जरी सर्वदा गुंतलेले असत, तथापि त्यांनीं त्या दोन अडीच वर्षांच्या काळांत तेथील सर्व वाङ्मयाचें आलोडन केलें. तिकडील तत्वज्ञांपैकीं वॉल्ट व्हिटमन, इमर्सन, व इंगेरसाल आणि थोरो हे विशेष आवडीचे होते.

---

१ वॉल्ट व्हिटमनः—हा प्रसिद्ध तत्वज्ञ १९ व्या शतकांत होऊन गेला. त्यानें पुष्कळ दिवस सैन्यांत नौकरी केली. याचा मुख्य लेखसंग्रह कविताबद्ध असून तो 'कुशपर्ण' ( 'Leaves of Grass' या नांवानें प्रसिद्ध आहे. यापैकीं ' Myself ' नांवाचें काव्य स्वामींना फार प्रिय होतें. शिवाय ' Democratic Vistas ' या नांवाचा एक निबधंही तत्वज्ञानपूर्ण आहे. स्वामींनीं या तत्वज्ञ कवीच्या धर्तीवर ' Drizzle, Drizzle ' या त्यांच्या कवितेचा अनुवादही केला आहे. जिज्ञासूंनीं रामवर्षा भाग पहिला यांतील त्रेपन्नावी कविता पहावी.

( २ ) इमर्सनः—हा अमेरिकन तत्वज्ञ व्हिटमन याचा समकालीन होता. याचें सर्व वाङ्मय गद्यस्वरूपाचें असून तें प्रसिद्धच आहे. त्यापैकीं ' अधिकृत व्यक्ति ' ( Representative men ) हा निबंध मशहूर आहे. याच्या तत्वज्ञानावर वेदान्ताचा पगडा–विशेषतः उपनिषदें व भागवत यांचा पगडा—विशेष दिसतो.

( ३ ) इंगरसॉलः—हा एक प्रख्यात न्यायाधीश होता. त्याचे अध्यात्म व प्राणिशास्त्र हे आवडते विषय होते.

( ४ ) थोरोः—हा वॉल्ट व्हिटमन याचा समकालीन तत्ववेत्ता होता. हा अमेरिकेंतील सुप्रसिद्ध ग्रंथकार व विद्वान पुरुष होता. त्याचा तत्वज्ञानावरचा ग्रंथ ' Walden ' ( जंगलांतील जीवनक्रम ) हा असून आणखी छोटे छोटे पांच सहा ग्रंथ आहेत. महात्मा गांधी यांच्या लेखांत ज्याचा उल्लेख आहे तो हाच थोरो होय.

## अमेरिकेंतील कार्य.

स्वामींनीं अमेरिकेंत काय कार्य केलें व तेथील लोकांवर केवढा परिणाम केला त्याबद्दल 'अमेरिकेंत गेल्याशिवाय तें ( कार्य ) समजणार नाहीं' असें त्यांचे शिष्य **पूरणसिंग** म्हणतात. यावरून त्यांच्या कार्याचें महत्व लक्षांत येईल. स्वामीचें अमेरिकेंतील कार्य दोन स्वरूपांत दिसतें तें असें:-( १ ) संस्था स्थापून केलेली विचारक्रांती व ( २ ) व्याख्यानांनीं घडवून आणिलेली विचारक्रांती. यांचा विचार यथामति करूं.

( १ ) वेदान्ताचा अभ्यास करण्यासाठीं पोर्टलंड, डेल्वर, शिकागो, मिनिआपोलिस इत्यादि ठिकाणीं कित्येक 'रामसभा' स्थापन झाल्या. त्यांपैकीं 'Hermitic Brotherhood' ही विशेष प्रसिद्ध आहे. शिवाय येथील गरीब हिंदु विद्यार्थ्यांस मदत देण्याकरितां पुष्कळ संस्था स्थापन केल्या गेल्या. ही मातृभूमीच्या तर्फेची एक महत्वाची कामगिरी स्वामींनीं केली. दुःखाची गोष्ट ही कीं, स्वामींच्या दक्षिण अमेरिकेंतील संचाराची माहिती अद्यापि उपलब्ध नाहीं !

( २ ) स्वामींनी तेथें दिलेल्या व्याख्यानांचें वर्गीकरण एका अमेरिकन गृहस्थानें पुढें दिलेल्या शीर्षकांखालीं केलेलें आहे:--

( १ ) तुह्मीं कोण ?
( २ ) आनन्दाचा इतिहास व स्थान.
( ३ ) पापाचें निदान, कारण व उपाय.
( ४ ) प्रकाश.
( ५ ) आत्मविकास.
( ६ ) प्रकाशाचा प्रकाश.
( ७ ) यथार्थवाद व आदर्शवाद यांचें एकीकरण.
( ८ ) प्रेमाच्या द्वारें ईश्वराचा अनुभव.
( ९ ) व्यावहारिक वेदान्त.
( १० ) भारत.

त्याच सद्गृहस्थानें स्वामींच्या इतर व्याख्यानांचें सार पुढें दिल्याप्रमाणे काढिलें आहेः—

( १ ) मनुष्याचें ईश्वरत्व.

( २ ) ज्याचें जगताशीं तादात्म्य झालें त्याच्या इच्छेनुसार अखिल दुनिया चालते.

( ३ ) कायेनें अविश्रांत उद्योग, आणि मन शांत व प्रेमपूर्ण करणें हीच जिवंतपणींची मुक्ति आहे.

( ४ ) सर्वांशीं अभिन्नतेचा ह्मणजे ऐक्याचा अनुभव आपण घेतला ह्मणजे स्थितप्रज्ञता येते.

( ५ ) रसायनशास्त्राचा जसा आपण अभ्यास करितों तसा सर्व धर्मग्रंथाचा करावा व प्रत्यक्ष अनुभव हेंच मुख्य प्रमाण मानावें.

स्वामींची उत्तर अमेरिकेंतील सर्व व्याख्यानें, प्रश्नोत्तरें व संवाद हीं आज उपलब्ध आहेत.* त्या सर्वांकडे पाहतां त्यांचीं शिकवण, व त्यांची मते हीं अतीशय व्यापक स्वरूपाचीं असून खास अमेरिकनांकरितां अगर खास पाश्चात्यांकरितांच होतीं असें नाहीं. स्थिरचरादि अखिल निसर्गस्वरूपांत ओतप्रोत भरलेला 'राम' त्यांना सर्वांच्या प्रत्ययास आणून द्यावयाचा होता, तसेंच प्रत्येक प्राणीमात्राच्या ठिकाणीं असलेला 'राम' सर्वांच्या प्रत्ययास आणून द्यावयाचा होता, व हें काम त्यांनीं स्वतःच्या अद्वितीय व्यक्तित्वाने प्रत्यक्ष दाखवून दिलें. त्यांची व्यापक शिकवण, त्यांचें विराटस्वरूप, व सर्वव्यापी मन ह्या गोष्टी अद्यापि सर्व जगाच्या गळीं उतरावयाच्या आहेत. त्यांचें विराटत्व तेव्हां जगाच्या नजरेस मात्र पडलें व त्यानें जगाला चकित करून सोडिलें एवढेंच काय तें कार्य झालें. अर्जुन जसा भगवान् श्रीकृष्णांचें विराट स्वरूप पाहून मुग्ध होऊन भगवंताचें स्वरूप आकलन करण्यास असमर्थ बनला तशीच स्थिति अमेरिकन लोकांची झाली असावी असें त्यांनीं स्वामींचा शेवटचा निरोप ज्या शब्दांनीं घेतला त्यावरून व्यक्त होतें; ते म्हणालेः—

---

* 'लाला अमीरचंद दिल्ली' यांनीं प्रसिद्ध केलेलीं इंग्रजी पुस्तकें अगर रा. फडके यांनीं मराठींत केलेला त्यांचा अनुवाद.

## रामस्तुति.

### दिंडी.

देवदारूच्या आश्रया बसून ।
दिव्य उज्वल कन्यकेसम हंसून ॥
राम करित असे कर्ण मधुर मान ।
तोषवी करुनी मंगल प्रदान ॥ १ ॥
प्राच्य विद्या भांडार सर्वे आणी ।
वितरि पाश्चात्यां जनां सुभग वाणी ॥
सर्व संम्राट्र संदेश ये हरून ॥
विहंगासम उड्डाण आचारून ॥ २ ॥
स्पष्ट आणी रोकडी हाक मारी ।
जगन्नाथ प्रीत्यर्थ भेदणारी ॥
हांक मारुनियां लोक समाजाला ।
सुचवि ईश असे लोकसंग्रहाला ॥ ३ ॥
कथुनि संदेशा दूर निघुनि जाई ।
गगनीं कीं उल्कापात जलद होई ॥
दिव्य तेजाचा ठसा ठेविताहे ।
स्वकीयां ठायीं नवप्रेम वाहे ॥ ४ ॥
नमो रामा सुंदरा तुझा हास ।
नरक पतिता देईल सुखावास ॥
पुनः भेटीचा योग जरी नाहीं ।
संसृतीच्या संभ्रमक्रमा पायीं ॥ ५ ॥
तरी जाणतसों सकल मंगलांचा ।
तुझ्या ठाई तो मेळ जुळायाचा ॥
ईश्वरीं तूं, तो देव तुझ्या ठायीं ।
ॐ स्वरूपीं आमुचें चित्त जाई ॥ ६ ॥
। ॐ । ॐ । ॐ ।

विवेकानंदाला अमेरिकेंत जाऊन जशी पौर्वात्यांतर्फे व हिंदुधर्मातर्फे विशिष्ट कामगिरी बजावावयाची होती, तशी स्वामी रामतीर्थांना नव्हती. भौतिक शास्त्रांतील शोध व प्रगति, आणि लक्ष्मीची उपासना यांच्या योगें मनुष्याचें समाधान होणें अशक्य आहे. भौतिकशास्त्रें व धर्म यांची फारकत करून चालणार नाहीं, फाजील धर्माभिमान व्यर्थ आहे, सर्व धर्माबद्दल सहिष्णुता दाखविली पाहिजे, वेदातांत सांगितलेला विकासवाद हाच टिकाऊ आहे. वगैरे प्रकारची विशिष्ट शिकवण पाश्चात्यांनां देऊन पाश्चात्य पौर्वात्य संस्कृतीचा उत्कृष्ट मिलाफ करून उच्च दर्जाची संस्कृति तयार करणें ही विशेष कामगिरी स्वामी विवेकानंदांनां करावयाची होती. तिचा त्यांनीं मजबूत पाया तर घातलाच आणि हा पाया घातल्यामुळें टागोर व अरविंदबाबू यांना जें कार्य करावयाचें आहे ते सोपें जाणार आहे. हा पाया विवेकानंदांनीं घातला नसता तर स्वामी रामतीर्थांची शिकवण ग्रहण करण्याला, किंबहुना तिच्याकडे लक्ष देण्याला पाश्चात्य मनें अगदीं अक्षम झालीं असती. कारण स्वामी रामतीर्थांची शिकवण अखिल मानव जातीला उद्देशून आहे. प्रत्येकानें द्वेषामधून प्रेमांत, रागामधून शांतीमध्यें, सान्तामधून अनंतत्वांत, विविधते मधून एकतानतेंत, परिच्छिन्नामधून अपरिच्छिन्नांत, व्यक्तित्वामधून विश्वात्मत्वांत कसें आवें हें स्वामी रामतीर्थांनी जगापुढें मांडिलें. यालाच ते व्यावहारिक वेदान्त व व्यावहारिक धर्म असें म्हणत. हें त्यांचें म्हणणें अनुभव जन्य होतें. वास्तव अशा ज्या या व्यापक मनोभूमिकेवरून ते बोलत होते, तिचें आकलन करण्याकरितां, निदान तिचें ओझरतें दर्शन घेण्याकरितां दर्शन घेणाऱ्यांचीही मनोभूमिका तयार पाहिजे. ही तयारी विवेकानंदांनीं केली होती. सारांश रामतीर्थांनीं विवेकानंदांच्या कामगिरीची पूर्ति केली अथवा रामतीर्थांच्या कामगिरीची पूर्व तयारी विवेकानंदांनीं केली यापैकीं कांहींही म्हटलें तरी चालेल. कारण रामतीर्थांनीं ' मी पूर्ती करण्याकरितां येत आहे,

१ रवीन्द्र बाबू हे पूर्व व पश्चिम यांचा अपूर्व मिलाफ करूं पहात आहेत व तोही देवघेवेच्या तत्वावर. पण ( २ ) अरविंद बाबू हे सार्वत्रिक धर्माच्या पायावर ( Universal religion ) सर्व जगाचें ऐक्य करूं पहात आहेत.

गोशाकरितां नाहीं असें जे क्यालिफोर्नियांत उद्गार काढिले होते, त्यांतील रहस्य तरी वर सांगितल्याप्रमाणेंच असावें असें वाटतें.

अमेरिकेंतील व्याख्यानांच्या द्वारें स्वामींनीं जी एक महत्वाची क्रान्ति घडवून आणिली ती ख्रिस्ताच्या शिकवणींतील हृग्दातांत होयः—**ख्रिस्ताच्या शिकवणुकीचा सध्यां विपर्यास झालेला आहे आणि त्यामुळेंच ख्रिस्तानुयायांमध्यें अनर्थापात चालू आहेत** असें त्यांना ताबडतोब आढळून आलें. याचमुळें त्यांनीं आपल्या व्याख्यानांतून ठिकठिकाणीं बायबलांतील वाक्यांचा रहस्यार्थ ख्रिस्तानुयायांना इतक्या अचुक व समपर्क रीतींनें समजावून दिला कीं, " कुरुक्षेत्र, जेरुसलेम, मक्का या ठिकाणीं मीं धर्मोपदेश केला; पण माझें हृदय लोकांना बरोबर समजलें नाहीं या साठीं मी पुनः उपदेश करीत आहे" हे त्यांचें उद्गार सर्वथैव सत्य आहेत असें पटूनच कीं काय कोण जाणें अमेरिकेंतील वर्तमान पत्रकारांनीं स्वामींचें छायालेख घेऊन 'अमेरिकेंत जिवंत ख्रिस्त' या शीर्षकाखालीं ते प्रसिद्ध केले ! यावरून स्वामींचें तेथील कार्य व अमेरिकन लोकांवर झालेला परिणाम याची कल्पना वाचक वर्गाला येईल असें वाटतें.

## इजिप्तमध्यें संचार.

अशा रीतीनें अमेरिकेंतील संचार संपवून स्वामी स्वदेशाला येण्याकरितां अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरून निघाले—त्यांना वाटेंत इजिप्तमध्यें थांबावें लागलें. तेवढ्या अवधींत ते केरो ह्या राजधानींत गेले. तों

> होतां विकास पहिल्या समयीं फुलातें ।
> येती जसे मधुप सार लुटावयातें ।

अशी स्थिति तेथील हिंदुमुसलमानांची झाली. तेथील मशिदींत हिंदुसंन्यासी स्वामी रामतीर्थ जाऊन त्यांनीं आपल्या उपदेशामृताचें पान सर्वांना आकंठ करूं दिलें. या वेळचें स्वामींचें व्याख्यान अस्सल पर्शीयनमध्यें झालें. त्यामुळें त्यांचें त्या वाङ्मयांतील ज्ञान, व अधिकार, त्यांची पूर्ण ओळख श्रोतृवृंदाला पटून स्वामी हे आपलेच आहेत असें त्यांना वाटूं लागलें. किंबहुना हा ' महंमदच ' अवतरला आहे कीं काय असें त्यांना वाटलें असल्यास नवल नाहीं.

निसर्गात्म्याशीं समरस होऊन जाणें हा स्वामींचा स्वभावच होता. यामुळें जरी ते सर्वत्र उपदेश करीत फिरत होते, तथापि जागोजागच्या सृष्टीचें, मानवसमाजाच्या रहाणीचें व कार्याचें सूक्ष्म निरीक्षण चालूच होतें. अशा रीतीनें संचार करीत असतांनाही त्यांचें अध्ययन चाललेंच होतें. 'सर्व खल्विदं ब्रह्म' हा अनुभव स्वामींनीं घेतलेला असल्यामुळें निसर्गाचीं कोडीं जशीं त्यांना झटकन् समजत तसें मानवी कृतीतील रहस्यही त्यांना ताबडतोब कळे. याचा पुरावा मातृभूमीस परत आल्यावर ज्या कल्पना आपल्या देश-बांधवांपुढे मांडिल्या त्यांत व त्यांच्या काव्यांत आढळतो. यांचा पुढील प्रकर-णांत विचार व्हावयाचा असल्यानें येथें त्याचें दिग्दर्शनच पुरेसे आहे. इजिप्त-मधील व सर्व जगांतील एक आश्चर्यकारक गोष्ट म्हटली म्हणजे 'मनोरे' हीं होय. हे मनोरे स्वामींनीं पाहिले व आज ते आपल्यास काय शिकवीत आहेत हें रहस्य त्यांनीं किती बहारीनें ओळखिलें हें त्यांच्या पुढील काव्यावरून दि-सतें. ते वेदान्त आलमगीरमध्यें म्हणतातः—

मिसर[1] की खोद[2] लें जो[3] मीनारें[4]।
हाये! मुर्दों[5] भरीं वह[6] मीनारें ॥ १ ॥
मम्मी[7] मुर्दे उन्होंमें[8] सक्खे[9] थे।
ऐसी तर्कीबो[10]-अकलेमन्दीसे[11] ॥ २ ॥
गो हजारों बरसें[12] भी हों बीतें[13]।
मुर्दे आते नजर[14] हैं जूं[15] जीतें[16] ॥ ३ ॥
प्यारे भारतके हिंदू बाशिन्दो[17]।
गुस्सा[18] मत[19] करना[20] जाहिदो[21]! रिन्दो[22] ॥ ४ ॥
जी[23] रहे होकि मरगये हो तुम।
मम्मी मीनार बनगये[24] हो तुम ॥ ५ ॥
जीते[25] तुम थे[26] ऋषीमुनी थे जब[27]।
मम्मी क्यों हो हजार सालके अब[28] ॥ ६ ॥

---

१ इजिप्तमधील. २ खोदून काढा. ३ जे. ४ मिनारे, मनोरे. ५ प्रेतांनीं. ६ ते. ७ मसाला भरलेलें प्रेत. ८ त्यांत. ९ ठेविलेले होते. १० तजवीज, व्यवस्था. ११ अज्ञानामुळें. १२ वर्षे. १३ लोटली. १४ दृष्टीस पडतात. १५ जणुं काय. १६ जिवंत. १७ रहिवासी. १८ राग. १९ नका. २० करूं. २१ कर्मकाण्डी. २२ मस्त. २३ जिवंत अहां. २४ बनलेत. २५ जिवंत. २६ होते. २७ जेव्हां. २८ आता.

* क्यों हो जिन्दा बदस्ते मुर्दा आप ।
नाम रौशन डबोया उनका आप ॥ ७ ॥
वह तो जीते थे, तुमभी जी उट्ठो ।
मुर्दा बच्चे न उनके हो बैठो ॥ ८ ॥
नाम तो ले रहे व्यासका तुम ।
काम करते हो अदना दासका तुम ॥ ९ ॥
बेटा वही सपूत होता है ।
बापसे बढके जो पूर्त होता है ॥ १० ॥
छोड दो, नाम लेना ऋषियों का ।
खुद ऋषी हो अगर न अब बनना ॥ ११ ॥

## उपदेश.

( चाल—नानापरिचे विडे मनोहर ).

मिसर देशचे उंच मनोरे खोदुनि बघतां दिसति ' ममी ' ।
कर्म पूर्वजीं अज्ञानानें केलें परि नच कांहि कमी ॥ १ ॥
सहस्रावधी वर्षे झालीं परिजणु मुर्दे जीवंत ।
प्यारे, भारतवासी ! सांगा तुम्हीं मृत कीं विपरीत ॥ २ ॥
मला वाटतें कर्म सोडुनी तुम्ही मुर्दे बनलेत ।
ऋषी खरे असतांना पूर्वी जीवन सागर होतेत ॥ ३ ॥
' ममी 'पणाला टाकुनि, निश्चय करुनि उठा व्हा जीवंत ।
नष्ट पुरातन नांव मिळविण्या कृती कराहो धीमंत ॥ ४ ॥
व्यासादिक तीं नांवें केवळ धारण करुनी काय मिळे ।
नीच दास्य वृत्तींत लोळतां कर्तबगारी दूर पळे ॥ ५ ॥
बापाहुनि जो पवित्रतर तो सत्पुत्रपदा अधिकारी ।
ऋषी तरि बना अथवा त्यांच्या नांवा टाका खरोखरी ॥ ६ ॥

---

*तुम्हीं ( आप ) जिवंत असून मुर्द्याच्या हाडांप्रमाणें कां ?

१ त्यांचा उत्तम नांवलौकिक तुम्हीं बुडविलांत. २ बापेरडे ३ सुपुत्र ४ पवित्र.

स्वामी रामतीर्थ जपानमधून निघून पृथ्वीभोंवतीं एक पूर्ण फेरी करून पुनः मातृभूमीकडे आले. तथापि युरोपांतील मुख्य देशांत त्यांचा संचारच झाला नाहीं. त्यामुळें त्यांची कामगिरी अपूर्ण राहिली असें वाटण्याचा संभव आहे. कारण 'जर्मनी, इंग्लंड, अमेरिका, हिंदुस्थान वगैरे सर्व देशांनां जागृत करून स्वतंत्र-स्वाधीन-मुक्त करणें, हें माझें कर्तव्य आहे' हें आपलें ध्येय त्यांनीं जाहीर केलें होतें. म्हणून त्याची जणुं काय पूर्ती करण्याकरितां आपल्या **कल्याणाला-नारायणस्वामींनां**-त्यांनीं जपानांतूनच परत पाठवून दिलें होतें.

नारायण स्वामी जपानांतून निघालें ते सिंगापूर, पेनांग, ब्रह्मदेश आणि लंका यांत वेदान्ताचा उपदेश करीत फिरले. यानंतर आफ्रिकेंत जाऊन पोर्ट सय्यद, केरो, अलेक्झांड्रिया येथें संचार करून पुढें झाले. ते गोझे, टयुनिस अल्जिअर्स, माल्टा, मोरोक्को, जिब्राल्टर वगैरे शहरांतून अखेरीस इ.स. १९०३ मध्यें लंडनशहरांत दाखल झालें तेथें सुमारें पांच महिने होते.पण पुढें कडाक्याच्या थंडीमुळें त्यांनां लंडन शहर सोडून जाण्याचा सल्ला मिळाला. इतक्यांत इ. स. १९०४ च्या जानेवारी महिन्यांत परत येण्याबद्दल स्वामींचाही आदेश त्यांनां मिळाला. यास्तव ते ताबडतोब निघून हिंदुस्थानांत आले व यानंतर सहा महिन्यांनीं स्वामी मुंबईस येऊन दाखल झाले.



## प्रकरण ७ वें.



## स्वामींचें प्रयाण.

---

वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृह्णाति नरोपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णा-
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ १ ॥

( भ. गी. अ. २–२२ ).

### मातृभूमीस आल्यानंतर.

इजिप्तमधील कार्य आटोपून स्वामी इ. स. १९०४ या वर्षी मुंबईच्या किनाऱ्यावर येऊन दाखल झाले. आपला लाडका राम, पूर्वेकडील प्रकाश पश्चिमेकडे नेऊन, आपलें स्वभावज कर्म करून, आपल्या जन्मभूमीचें जगद्विषयक काम करून परत आला तेव्हां त्याची माता, आर्यमाता, त्याचें स्वागत करण्यास किती उत्कंठेनें, आनंदानें व उत्साहानें आली असेल हें वाचकानींच ठरवावें ! स्वामींच्या या स्वागताला भारतभूमींतील सर्व पंथांचे लोक आलेले होते, तसेंच पुनः एकदां तपोवनांत जाईपर्यंत स्वामींनीं ज्या ज्या ठिकाणीं संचार केला त्या त्या ठिकाणींही असेंच अपूर्व प्रकारचें त्यांचें स्वागत झालें. स्वामी सर्वांकडे आत्मौपम्य दृष्टीनें पाहूं लागले, सर्वांमध्यें 'रामत्व' ओळखूं लागले म्हणूनच सर्वजण त्यांच्याकडे लोहचुंबकाप्रमाणें खेंचले गेले. मातृभूमीस परत आल्यावर प्रथम कांहीं दिवस स्वामींचा मुक्काम मुंबईस होता. ते आग्रा, मथुरा, लखनौ यांवरून पुष्करतीर्थाला ( अजमीर ) गेले. पुनः तेथून संयुक्तप्रांत व बंगाल यांत त्यांनीं संचार केला आणि अखेरीस इ. स. १९०५ च्या आक्टोबर महिन्यांत हरिद्वारला गेले.

या संचारकालांत त्यांनीं वेदान्तधर्माचें रहस्य, प्रवृत्तिपर व निवृत्तिपर वेदान्त, वगैरे विषयांची आपल्या देशबांधवांनां यथार्थ ओळख करून दिली, एवढेंच नसून त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या देशभक्तीच्या जिवंतपणामुळें मातृभूमीचें कल्याण व्हावें ही जिव्हाळ्याची कळकळ असल्यामुळें सद्यः स्थिति सुधारण्याकरितां काय केलें पाहिजे याचें विधायक स्वरूप जागोजाग आपल्या देशबांधवांपुढें मांडिलें. त्यांत त्यांनीं **सहकार्य व संघटना** या दोन मुद्यांवर विशेष जोर दिला होता. कारण व्यावहारिक वेदान्तांतील हीं दोन मुख्य तत्वें असून त्यांची विशेष उणीव आपल्या राष्ट्रांत असल्याचें त्यांनां दिसत होतें. शिवाय या दोन तत्वांचा राष्ट्रोद्धाराच्या कामीं केवढा दांडगा उपयोग होतो याचीं प्रत्यक्ष उदाहरणें नुकतींच त्यांनीं जपान व अमेरिका ह्या देशांच्या इतिहासांत पाहिलीं होतीं. किंबहुना त्या सर्व देशांच्या इतिहासाचें--धार्मिक, राजकीय व सामाजिक त्यांनीं गुणग्राहकतेच्या दृष्टीनें सूक्ष्म निरीक्षण केलेलें होतें आणि खुद्द भारतवर्षाच्या वर्तमान व भूतकालच्या सर्व इतिहासाचें–धार्मिक, राजकीय व सामाजिक–अध्ययन किती खोल दृष्टीनें केलेलें होतें ह्याची साक्ष प्राचीन आर्य संस्कृतीचे युरोप व अमेरिका ह्या देशांतील संस्कृतीवर किती उपकार झाले आहेत हें मार्मिकपणें सिद्ध करितांना अमेरिकेंत दिलेल्या व्याख्यानांवरून चांगलीच पटतें.* यामुळें आपल्या देशाच्या उद्धाराकरितां काय काय गोष्टी केल्या पाहिजेत याचें त्यांनां अलौकिक ज्ञान होऊन योग्य अशा विधायक सूचना पुढें मांडिता आल्या. '+भारतवर्षापुढील प्रश्न,' 'सांप्रतच्या

---

* ' भारताच्या वतीनें अमेरिकेस विनंती ' ( स्वा. रा. भा. ११ फडके ).

' सुधारलेल्या जगास हिंदुस्थानचें आध्यात्मिक ऋण. ( स्वा. रा. भा. ११ फडके ).

' प्राचीन भारतवर्षांतील आध्यात्म ( स्वा. रा. भा. ११ फडके ).

हीं व्याख्यानें वाचकवर्गानें हें पुस्तक वाचतांना ( English Vol. III ) पुनः एक वार वाचावीं. अशी त्यांनां आग्रहाची विनंति आहे.

+ स्वा. रा. भाग अकरा ( फडके कृत ).

गरज' या आपल्या लेखांत ते म्हणतातः--"हिंदुस्थानच्या उन्नतीकरितां अनंत शक्ति काम करीत आहेत. परंतु त्या शक्तींत एकतानता नसल्यामुळें त्याचा इष्ट परिणाम यत्किंचितही घडून येत नाहीं ! एक प्रेरणेला काट देतें तिचा परिणाम नाहींसा करून टाकिते. या मुळें फलित प्रेरणा जवळ जवळ शून्यच असतें. हिंदुस्थानांतील कोट्यवधि मेंदू व हात वहात चाललेले दिसत आहेत. कोठल्या दिशेनें आणि कोणीकडे वहात जात आहेत कोणाला ठाऊक ! अर्धकच्च्या समजुतीप्रमाणें हिंदुस्थानांतील हजारों समाज आणि संस्था हिंदुस्थानची राष्ट्र नौका आपल्या आवडत्या दिशेनें वल्हवून नेण्याचा यत्न करीत आहेत. परंतु या नौकेला दूरदर्शी कर्णधार मिळाल्याचें अद्यापि दिसत नाहीं ! तुमच्या हातांतील वल्हीं आहेत तशींच असूंद्यात. तुम्हीं बसलां अहांत तसेच बसले रहा. जाग्यावरून हालण्याचें कारण नाहीं. तुम्हां सर्वांचें वल्हवणें एका दिशेनें असूं द्या म्हणजे झालें ! संकेतस्थान निश्चित असलें, उद्देश्याबद्दल एक्यवाक्यता असली तरच प्रगति होऊं शकते; मग वरवर दिसण्यांत कितीही भिन्नता असली तथापि ती प्रगतीच्या आड येऊं शकत नाहीं. **भेदांत अभेद हेंच प्रगतीचें बीज आहे.** म्हणून आपापल्या ठिकाणांवर बसून मजेनें गात गात ही राष्ट्रनौका प्रेमानें व झपाट्यानें पुढें वल्हवीत न्या. राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अशा प्रकारच्या एकोप्याची अत्यंत जरूरी आहे. **सर्व राष्ट्राचें कल्याण होण्यांतच** राष्ट्रांतील घटक व्यक्तींचें कल्याण असतें.........समाज बुडत असेल तर तुम्हीं तराल काय ? समाज तरेल तरच तुम्हीं तराल. **अपूर्ण समाजांत एखादा मनुष्य पूर्णत्व मिळवूं म्हणेल तर तें शुद्ध मूर्खपणाचें** आहे.........होतकरू तरुणानों ! हिंदुस्थानचा भाग्योदय हा तुमचा भाग्योदय आहे. त्याची सर्व जबाबदारी तुमच्यावर आहे.........**शुद्ध आणि बाणेदार आचरण हा इतिहासाचा उत्तोलन दंड आहे.** समाजांत ज्या मानानें उच्च शीलाचीं आणि कर्तबगारीचीं माणसें निपजतात त्या मानानें समाज वर किंवा खालीं जात असतो.........लोकांना अज्ञानांत ठेवून त्यांचें ऐक्य घडवून आणणें शक्य होईल काय ! वेडगळ धर्मसमजुती आणि अनिष्ठ

रुढी यांची गुलामगिरी करण्याच्या शपथा घेतल्यानें राष्ट्रांत ऐक्य उत्पन्न होऊं शकेल काय ?.........राष्ट्रीय ऐक्य घडवून आणण्याची इच्छा बाळगणाऱ्या वीरांनों ! कित्येक अमानुष चालींना तुम्हीं प्रथम समाजांतून फांटा दिला पाहिजे. मनुष्य जातीच्या कल्याणाकरितां, सत्याच्या उत्कर्षांकरितां, आणि राष्ट्राच्या उन्नतीकरितां बहुजनसमाजाचा छळ होईल, तर त्याबद्दल वाईट वाटणार नाहीं. राष्ट्रांतील सात्विकता जिवंत आहे, राष्ट्राची जीवनक्रिया योग्य प्रमाणांत चालली आहे, हेंच उलटल्यावरून दिसून येईल. उच्च ध्येयाकरितां मरणें याच्या सारखें दुसरें सुख नाहीं.........ज्याला आपल्या कामवासना ताब्यांत ठेवितां येत नाहींत, आणि जगांतील अत्यंत गंभीर असा जो पतिपत्नीसंबंध त्याची जो मूर्ख थट्टा करितो, तो आपण होऊन आपल्या जीवितावर घाला घालितो. पण हें त्याच्या लक्षांत येत नाहीं. दैवी सामर्थ्याचा, ओजाचा, अनाठायीं व्यय हेंच सर्व पापांचें बीज आहे. पाप ही अनाठायीं खर्च केलेली दिव्य शक्ती आहे.........तुमच्या आरोग्याकरितां, बौद्धिक उत्कर्षाकरितां, तुमच्या धर्माच्या कल्याणाकरितां, तुमच्या ऐहिक व पारलौकिक कल्याणाकरितां, तुमच्या प्रिय भारतवर्षाकरितां, तुम्हाला पवित्र बनणें जरूर आहे.........बहुजनसमाजाला सुशिक्षित करा. याचा अगदीं जवळचा व साधा उपाय म्हटला म्हणजे हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांची स्थिति सुधारणें हा होय. उपयुक्त ज्ञानाचा प्रसार करणारीं नवीन नवीन पत्रें काढा. आणि जुन्यांत योग्य त्या सुधारणा करा. हीं पत्रें देशी भाषेंत काढा. म्हणजे स्त्रियांना व बहुजनसमाजाला त्यांचा उपयोग होईल.........प्रापंचिक, सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यें हेंच तुमचें 'कर्मकांड' होय. जिवंत श्रद्धा आणि प्रज्वलित ज्ञान हें सर्व प्रकारच्या यशस्वी चळवळींचें जीवन तत्व आहे.

वर दिलेल्या उद्गाराकडे पाहिल्यास स्वामी रामतीर्थांच्या ठिकाणीं राजकार्याची दूर दृष्टी, परिस्थितीचें सूक्ष्मावलोकन, शिवाजी महाराजांची व्यावहा-

रिकता वगैरे गुण होते असेंच पटतें नाहीं का ? वर उध्दृत केलेल्या लेखांतील* ( १ ) व्यावहारिक ज्ञानाचें दारिद्र्य (२) शिक्षण (३) अन्न (४) आणि धर्म या मुद्यांवर स्वामीनीं जो अपूर्व प्रकाश पाडिला आहे त्यावरून त्यांच्या ठिकाणीं मॅझिनी व काव्हूर यांच्या सारख्या राष्ट्रोद्धारकांचे व कट्टया देशभक्ताचें गुण होते असें नाहीं का दिसत ? ' लोकसंख्येचा अतिरेक ' ह्या मुद्यावर स्वामींनी जो प्रकाश पाडिला आहे तो वाचल्यास महात्मा गांधीनीं लिहिलेल्या In Confidence[२]' या लेखाची आठवण होते.

' हृदयें एकवटून द्या, म्हणजे शिरें व बाहू आपोआप एकवटतील, ' ' आपण तमोगुणाच्या विरुद्ध इतकी ओरड केली आहे कीं त्याचा प्रतिकार करण्यामध्येंच आपण त्याची आपल्यामध्यें भयंकर वाढ केली आहे. ' ' संन्यासी वृत्तीचा अंत्यजाच्या हाताशीं संयोग आला पाहिजे ' वगैरे 'राष्ट्रीय धर्मांतील उद्गार,' ' एकटेच असलेत, तरी नेटानें पुढें चला, माघार घेऊं नका, ' ' जर तुम्हीं सत्पथापासून ढळलां नाहीं, तर सगळा भविष्यत्काल तुमचाच आहे; देशाची बळकटी कोत्या विचाराच्या मोठ्या लोकांनीं वाढत नसून उदात्त विचाराच्या साध्या लोकांनीं वाढते; ' ' पावित्र्यावांचून शांति नाहीं; ' ' खरी श्रद्धा व दिव्य ज्ञान हींच सर्व चळवळी यशस्वी होण्याचीं चिन्हें होत. ' ' हिंदी ही राष्ट्रभाषा करा, ' ' शिक्षण सार्वत्रिक करा, ' ' आत्मोन्नति व राष्ट्रोद्धार हें ध्येय ठेवा, ' ' शेती सुधारा ' वगैरे ' भारतवर्षापुढील प्रश्न ' या व्याख्यानांतील उद्गार

---

* वाचकांनीं सबंध लेख व भाषण मुळांतच वाचावें. (स्वा. रा. भा. ११ फडकेकृत ).

१ मॅझिनीची ' Duties of man ' ' व From Council to God ' हीं पुस्तकें अवश्य वाचावीं. २ पहा ' Young India ' वर्ष २ रें.

३ ' राष्ट्रीयधर्म ' ( स्वा. रा. भा. ११ फडकेकृत ).

आणि ' **यज्ञांचें रहस्य** ' हा लेख ह्या सर्वांकडे पाहिल्यास महात्मा गांधी, बाबू अरविंद घोष वगैरे राष्ट्रीय पुढारी, किंबहुना राष्ट्राचे प्राण, जो उपदेश आज करीत आहेत तोच उपदेश स्वामींनीं पंधरा वर्षांपूर्वी करण्यास सुरवात केली होती असें स्पष्ट दिसतें. **राजकारणाला धर्माची जोड दिल्याशिवाय तें यशस्वी होणार नाहीं हें रामदासांच्या** राजनीतीचें आद्यसूत्र होतें. त्याच सूत्राचा अवलंब आज राष्ट्रानें केल्याचें दिसत आहे. हें तत्व राष्ट्राला आज तरी जें पटल्यासारखें दिसत आहे, हें तत्व ग्रहण करण्यास राष्ट्रीय मन समर्थ झालें अशी जी परिस्थिति आज प्रत्ययास येत आहे, याची पूर्व तयारी स्वामींसारख्या महात्म्यांनीं उपरिनिर्दिष्ट विचारांचें वायुमंडळ बनविण्याचा उपक्रम पंधरा वर्षांपूर्वी करून केली होती असें विचारांतीं पटल्याशिवाय रहाणार नाहीं.

परदेशांतून परत आल्यानंतर स्वामींना **जगदुद्धाराकरितां भारतोद्धार** करण्याचें वेड लागलें असावे असें दिसतें. कारण तपोवनांत जाण्यापूर्वी सहकार्य व संघटना या तत्वाचा पुरस्कार करून व्यावहारिक वेदान्तावर त्यांनीं जागोजाग जीं व्याख्यानें दिलीं, त्यांचें सूक्ष्मावलोकन केल्यास ते सबंध भारत वर्षाला स्वतःमध्यें पहात होते असें दिसतें. ते म्हणतात, ' एखादा शैव जसा शिवाची, वैष्णव जशी विष्णूची, ख्रिस्ती जशी ख्रिस्ताची आणि मुसलमान महंमदाची जशी जाज्वल अंतःकरणानें भक्ति करितो, त्याचप्रमाणें, शैव, वैष्णव, ख्रिश्चन, मुसलमान, पारशी, शीख, संन्यासी, अंत्यज अथवा हिंद-मातेचीं इतर मुलें या सर्व रूपांनीं मी हिंदमातेला पहातों व भजतों.' या उद्गारांत आज ज्या एकीचा पुरस्कार भरतभूमी करीत आहे ती एकी किती बहारीनें ध्वनित केलेली आहे बरें ? भारतोद्धाराची, कळकळ या थराला पोंचल्यामुळेंच ' **दहा वर्षांच्या आंत हिंदुस्थान व्यावहारिक वेदान्ताचा मार्ग चालण्याचा प्रारंभ करील आणि अखेरीस प्रेम द्वेषाला जिंकून सर्वांची अंतःकरणें** निगडित करील ' असे उद्गार स्वामींनीं काढिले होते. या उद्गारांतील रहस्य नीट ध्यानांत येण्याकरितां लखनौ येथें

१ ' यज्ञांचें रहस्य ' ( स्वा. रा. भा ११ पडकेकत ).

भरलेल्या इ० स० १९१६ च्या राष्ट्रीयसभेच्या बैठकीच्या व लोकमान्यांनीं केलेल्या कामगिरीच्या हकीगतीचा हवाला दिल्यास पुरेसा आहे.* ×

## पुनः हिमालय.

अशा रीतीनें स्वदेशाला जागा करून स्वामी हरिद्वाराला गेल्याचें मागेंच सांगितलें आहे. तेथें ते एक आठवडाभर अत्यवस्थ आजारी होते. थोडें बरें वाटल्यावर हवा पालटण्याकरितां ते मुझाफरनगराला गेले. प्रकृति सुधारल्यावर स्वामींना एकान्त सेवनाची इच्छा झाल्यामुळें त्यांनीं नारायणस्वामींना लखनौहून बोलावून घेतलें आणि लागलीच इ. स. १९०५ च्या नोव्हेंबर महिन्यांत हृषीकेशाच्या मार्गानें ते दोघेजण महाभारतकार व्यासांच्या तपानें पवित्र झालेल्या व तपोवनापासून सुमारें दहा कोसांवर असलेल्या

* वर दिलेले उद्गार स्वामींनीं इ० स० १९०६ अखेरी अखेरीस काढिले होते. पुढें दहाच वर्षांनीं लखनौ येथें जी अपूर्व राष्ट्रीय सभा भरली होती, तिची हकीगत वाचकांनीं वाचावी.

× स्वामींची देशोद्धाराची अशा प्रकारची कळकळ पाहून लोकांनीं आपल्या मताप्रमाणें काम चालविणारी एखादी संस्था आपण स्थापितां काय असें स्वामींना म्हटलें. त्यावर स्वामींनीं दिलेलें उत्तर फारच मननीय आहे. '**नवीन संस्था स्थापून संस्थांची संख्यावृद्धि करण्यापेक्षां प्रचलित असलेल्या संस्थांतूनच-संस्थांच्याद्वारेंच विधायक कामगिरीची वाढ करणें हेंच अधिक श्रेयस्कर आहे.** याकरितां सध्यां असलेल्या संस्थांतूनच मी कार्य करीन. ' नूतन देवालयाची स्थापना करून देवालयांची संख्या वाढविण्यापेक्षां असलेल्या देवालयांचा जीर्णोद्धार करून तीं सुस्थितींत राखणें हेंच अधिक श्रेयस्कर आहे. भारतवर्षाला सध्यां कार्याची जरूरी आहे असाच याचा अर्थ आहे. कारण ते म्हणतातः—

**सर्वाहि संस्था किल भारतस्थाः । जानीत यूयं हृदयं मदीयम् ।**
**आर्याः समस्ताः पथवर्ण भिन्नाः । न बांधवाः किंत्वहमेव तेस्तुः ॥**

व्यासाश्रमाच्या उग्र पण मनमोहक जंगलांत येऊन दाखल झाले. तेथें ते लहानशा सुंदर झोंपड्यांत एकमेकांपासून अर्ध्या मैलांवर रहात असत. या ठिकाणीं सामवेद, पातंजल भाष्य व निरुक्त यांच्या अध्ययनांत स्वामींनीं पांच महिने काढिले.

## वशिष्ठाश्रमांत

अशा रीतीनें सबंध हिंवाळा व्यासाश्रमांत घालविल्यावर पुढील काळ आत्मचिंतनांत घालवावा असे विचार तरंग वारंवार मनांत उठूं लागल्यामुळें ते देवप्रयागला गेले व तेथून विशिष्ट मुनींच्या पवित्र आश्रमांत गेले. यावेळी भारतधर्ममहामंडळ व इतर धार्मिक संस्था त्यांना वेदान्ताचा उपदेश करण्याला येण्याची विनंती करीत होत्या. परंतु स्वामींना आत्मचिंतनाशिवाय इतर सर्व गोष्टी व्यर्थ वाटत असल्यामुळें ही जागा सोडून जाण्याला त्यांचें मन तयार होईना. यामुळें ज्या ज्या ठिकाणचीं त्यांना बोलावणीं आलीं तेथें तेथें त्यांनीं नारायणस्वामींस जाण्यास सांगितलें.

वशिष्ठाश्रम हें ठिकाण टिहरीपासून सुमारें पंचवीस कोसांवर असून समुद्रसपाटीपासून अदमासें आठशें हात उंचीवर आहे. ज्या वनांत हा आश्रम आहे तें इतकें रमणीय आहे कीं, स्वामी त्याचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें करून त्याला ' वनदेवतांचें उपवन ' असें म्हणत.

' वशिष्ठाश्रम जून १९०६ '

' या ठिकाणीं वारे एकसारखे झुळझुळ वहात असतात. या उंच, रमणीय व सपाट मैदानावर रामानें स्वतःकरितां झोंपडी बांधिली आहे. या ठिकाणीं जाई, जुई, कुंद, मोगरा, मदन-बाण, चमेली, सोनजुई इत्यादि पुष्पलता बेसुमार आहेत. तसेंच जांब आणि निरनिराळ्या जातींचीं बोरें यांची या ठिकाणीं समृद्धि आहे. पर्णकुटीच्या एका बाजूला एक तृणाच्छादित विस्तीर्ण मैदान आहे. त्यांतून कित्येक निर्झर आणि निर्झरिणी खळखळ आवाज करीत वहात आहेत. टेंकड्या नूतन पल्लवांनीं जणु फुलून गेल्या असून मधून मधून

लहान टेंकड्या आपलें डोकें वर करीत आहेत. मोठमोठे स्वच्छ गुळगुळीत दगड हे **रामाचे** उपाहाराचे चौरंग असून विस्तीर्ण शिलापट हींच **रामाचीं** बसण्याचीं सिंहासनें आहेत. छायेंत जाऊन बसण्याची इच्छा झालीच तर **रामाचें** स्वागत करण्यास अनेक लताकुंज सर्वत्र सिद्ध आहेत.'

ह्या ठिकाणाला जाण्याचा रस्ता **टिहरीपासूनच** फुटतो. स्वामी आपल्या इष्टस्थलीं जाण्यास **टिहरीहून** निघाले. स्वामींच्या भोजनाची व्यवस्था **टिहरी**च्या महाराजांनीं आपण होऊन पत्करिली होती. पण ती सुखकर न झाल्यामुळें स्वामी आजारी पडले. ह्मणून त्यानीं नारायण स्वामींना बोलावून घेतलें. यावेळीं जरी स्वामी बरे होण्याच्या मार्गावर होते तथापि त्यांची शरीरयष्टि खालावत चालली होती. **वशिष्ठा**श्रमांत आल्यावर नारायण स्वामी देखील आजारी पडले. अर्थात हा सर्व परिणाम महाराजांकडून येणाऱ्या अन्नाचा व येथील वाईट हवेचा असेल असें वाटून **नारायण**-स्वामींनीं दुसऱ्या ठिकाणीं जाण्याची **स्वामी महाराजांस** विनंति केली शिवाय वर सांगितल्याप्रमाणें ऊन, वारा, पाऊस व वन्य श्वापदें यांच्या-पासूनही ह्या ठिकाणीं उपद्रव होण्याचा बराच संभव होता. या सर्व कारणांमुळें ते तेथून निघून सुमारें दोन तीन कोसांच्या अंतरावर रहावयास गेले. येथें **नारायणस्वामी** थोड्या अंतरावर राहण्यास गेले. शेजारच्या खेड्यापाड्यांतून भिक्षा मागून आणूं लागले. भौतिक सुधारणांच्या व फाजील चिकित्सेच्या काळांत देखील असे सद्गुरुकरितां देहाची काडें करणारे सच्छिष्य आहेत ही भारतभूमीच्या भाग्योदयाची गोष्ट आहे ! पण स्वामी टिहरीच्या महाराजांकडून येणाऱ्या शिध्यांतीलच अन्न खात; यामुळें त्यांचे शरीर पूर्वींहून दुर्बल व कृश होऊं लागलें. अर्थातच स्वामी अन्न वर्ज करून केवळ दुधावर राहूं लागले. यामुळें जरी प्रकृति थोडी सुधारली तरी शरिराची कृशता मात्र वाढूं लागली. अशा रीतीनें या दोन वर्षांत बरेच वेळां आजारी पडलेले पाहून स्वामींनां थोडा मानासिक त्रासही झाला असावा व ते आजारीपणाला कंटाळले असावे, असें त्यांच्या पुढील कवितेवरून दिसतें.

( गजल-कवाली )

बिठाकर[1] आप[2] पैहलूमें,[3] हमें[4] आँखें[5] दिखाता है।
सुनो[6] बैठेंगे हम सच्ची, फकीरोंको सताता[7] है ॥ १ ॥
अरे दुन्याको बाशिन्दो[8] ! डरो मत बीमको[9] छोडो।
यह शीरीरू[10] तो मिस्सरी[11] है, भवें नाहक[12] चढाता[13] है ॥ २ ॥
है अन्दरसे महा शीतल, यह उपरसे डराता है ॥ ३ ॥

( वरील कवितेचे रूपांतर )

हे प्यारे, भिवविसि मजला कां रे रोगांच्या द्वारें ॥ १ ॥
आह्मांला, सताविसी फकिरांला, वदेन या बोलां. ॥ २ ॥
श्रीकांत, हें आणी चित्तांत, बघ मग मम अंत. ॥ ३ ॥
संसारी, भिऊं नका कंसारी, हरिल व्यथा सारी. ॥ ४ ॥
खरोखर, तन्मुखकांती मधुर रूप न भेसुर. ॥ ५ ॥
रामाचा, उगाच हा वरवरचा देखावा त्याचा. ॥ ६ ॥
शीतळता, अंतर शोधुनि बघतां दिसते भमचित्ता. ॥ ७ ॥
हें वरून, भीतीचे पांघरुण, बसला घेऊन. ॥ ८ ॥

---

१ बसवून २ आपण ३ स्वतः जवळ ४ मला ५ डोळे ( आंखे दिखाना=भय दाखविणें ) ६ सांगून, सांगत. ७ सतावणें ८ रहिवासी ९ भय. १० मधुर मुख; गोड बोलणारा. निराळा. १२ उगीच. १३ भवें चढाना-भुवया चढवणे, रागावणें.

( अर्थ )

( १ ) राम जेव्हां आजारी झाला होता तेव्हां तो आपल्या प्रेमात्म्यास ह्मणतोः-हे प्यारे, आपल्या जवळ बसून मला भय दाखवितोस काय ? ( रोग व व्याधी हीं भय दाखविण्याकरितां ईश्वर पाठवितो असा आशय ) परंतु ध्यानांत धर कीं, आम्हां फकीरांनां तूं सतावून सोडतोस असें खरोखरं सांगत बसेन. (२) हे संसारी लोकहो, भिऊं नका. भीती सोडा. कारण खरोखर हें मधुरमुख निराळया स्वरूपाचें आहे. पण तें उगाच वरवर रागाचा आविर्भाव आणीत आहे.

(३) हा आंतून महाशीतल व कृपाळू आहे. पण बाह्यतः मात्र ( रोगादिकांच्या द्वारें ) भीति दाखवीत आहे.

## दर्शनाकरितां मंडळीचें आगमन

याच सुमारास स्वामींचे शिष्य **पूरणसिंहजी**, तसेंच पं. **जगत्रामजी व हरिशर्मा** हे स्वामीच्या दर्शनाकरितां आले. या अतिथींचा स्वामींनीं योग्य तो सत्कार केला. उलट या आलेल्या लोकांनीं स्वामींनां अन्न खाण्याचा आग्रह केला; ' स्वामींनी अन्नग्रहण केल्याशिवाय आम्हींही करणार नाहीं ' असा त्यांचा प्रेमयुक्त हट्ट पाहून त्या मोहाला स्वामी आपण होऊन वश झाले. असा प्रकार रोज चाले. याचा परिणाम असा झाला कीं, स्वामी आजारी पडले. तेव्हां स्वामींनीं पूर्वीं अन्नवर्ज कां केलें होतें हें त्यांच्या ध्यानांत आले व मग पुनः त्यांनीं स्वामींनां अन्नग्रहणाचा आग्रह केलाच नाहीं. स्वामींच्या मागोमाग ही मंडळी देखील ताप व हगवण यांनीं आजारी झाली. या आजारांत स्वामींची मनःस्थिती कशी होती हें पाहिल्यास ते खरोखरच विदेही होते असें पटतें. या वेळच्या स्थितीचें वर्णन त्यांनीं बरें झाल्यावर पुढें दिल्याप्रमाणें केलें आहेः—

( राग—भैरवी. ताल—झूल )

**वाहवा, ऐ तप[1] व रेजश[2] ! वाहवा ।**
**हब्बाजा[3], ऐ दर्दो–पेचश[4] ! वाह वा ॥ १ ॥**
**ऐ बलायेनागहानी[5] ! वाहवा ।**
**वैलकम[6], ऐ मर्गे जवानी[7] ! वाहवा ॥ २ ॥**
**यह भँवर * यह कैहर[8] बरपा[9] ? वाहवा ।**
**बैहरे–मिहरे[10] रांम में क्या वाहवा ॥ ३ ॥**

---

१ ताप. २ ठणकणें. ३ बहुत आनंद. ४ दुखणें व हगवण. ५ अकस्मात् आलेलें संकट. ६ स्वागत आहे ( Wel come ). ७ तारुण्यांतील मृत्यु. ८ ईश्वरी कोप. ९ पाऊस पडला. * भोंवरा. १० सूर्यरूपी रामाच्या समुद्रांत ( रामाच्या प्रकाशरूपी समुद्रांत हा सर्व नामरूप प्रपंच जणुं भोंवरा अथवा लहरी—लाटा—आहे ).

पगडी पाजांमा, दुपट्टा, अंग्रखा।
गौरसे देखा तो सब कुछ सूत था ॥ ४ ॥
दामनी तोडी व माला को घर्डा।
पर निगाहे-हँकमें है वही तिलो ॥ ५ ॥
मोत्या बिन्द दिलकी आंखोंसे हँटा।
मर्जेसिहत, ऐनं राहते-रॉम था ॥ ६ ॥

आजारी पडल्यामुळे सर्व मंडळी आश्रमापासून आणखी दूर गेली. अजूनपर्यंत **नारायण**स्वामी दर रविवारी स्वामीकडे येत असत. परंतु **पूरणसिंहजी** आल्यापासून स्वामींच्या आज्ञेवरून त्यांना येथेंच रहावें लागे.

## दैव देतें पण कर्म नेतें

वशिष्ठाश्रमासारख्या अति रमणीय व पवित्र स्थळीं कोणाचेंही चित्त प्रसन्न होतें. तेथील शुद्ध वातावरण व निसर्ग रमणीयताच अशी आहे कीं, संसाराला कंटाळलेल्या मनाला थोडावेळ तरी विरंगुळा वाटावा, संसाराची काळजी दूर व्हावी आणि चित्त परमेश्वरप्रवण व्हावें ! तशांत स्वामींसारख्या आत्मानुभवी साधूचें दर्शन व सहवास यांचा लाभ झाला ! ! परंतु ' स्वभावस्तु प्रवर्तते ' हेंच खरें. पं. **हरिशर्म्या**ला येथें उदासीनता वाटूं लागली व घरचा संसार आठवूं लागला. त्या सर्व मंडळीला आपली घरची स्थिति व गाऱ्हाणीं तो वरच्यावर सांगूं लागला. **नारायण**स्वामींनीं त्याला परोपरीनें सांगून दैवयोगानें अगर पूरणजींच्या आग्रहामुळें प्राप्त झालेल्या सत्संगतीचा व उपदेशाचा लाभ करून घेण्याचा उपदेश करून पाहिला. परंतु पं. **हरिशर्म्याचें** संसाराचें ' येळकोट ' कांहीं केल्या सुटेना ! त्याला बायकोशिवाय दुसरें कांहीं

---

१ इजार, तुमान. २ उपरणें. ३ विचार करून. ४ बनविली. ५ तत्वदृष्टीनें. ६ सोनें. ७ सारा. ८ दूर गेला. ९ रोग व निरोगीपणा. १० खात्रीनें. ११ रामाच्या आनंदावस्थेंत.

सुचेना.* अखेरीस पं. **हरिशर्मा** यांनीं आपलें रडगाणें स्वामींना निवेदन केले. त्याला कोठून तरी स्वामीच्या तोंडचें ' तर मग घरीं जा ' हे शब्द पाहिजे होते. ताबडतोब त्याला पडत्या फळाची आज्ञा मिळाली. ती घेऊन त्यानें तिसऱ्या दिवशीं तेथून कूच केले ! **सत्संग घडण्याला** व तो **इष्ट फलदायी होण्याला जन्म जन्मांतरींच्या शुद्ध संस्कारांचीं गांठोडीं पाहिजेत** हेंच खरें. बाकीची मंडळी सुमारें एक महिनाभर होती.

## भवितव्यतेचीं पूर्वचिन्हें.

वशिष्ठाश्रमांत असतांना **स्वामी, पूरणजी** व **जगत्राम** हे सर्व आजारी पडून स्वामी तर अधिकाधिक थकत चालल्याचें मागें सांगितलेंच आहे. स्वामींची ही स्थिति पाहून ' एकतर हे अन्न बंद करा आणि पहाडाखालच्या गांवांतून भिक्षा आणण्याची आह्मांस परवानगी द्या, किंवा हें ठिकाण सोडून

---

* स्वामी रामतीर्थांनीं ' वेदान्त आलमगीर ' मध्यें वरील स्थितीला लागू पडण्यासारखा एक बहारीचा दाखला दिलेला आहे. त्याची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. ते ह्मणतातः—

**" एकदफा देव-ऋषी नारदने ।**
**रैहम कर खोकसे कहा उसने ॥ १ ॥**
**" चल तुझे ले चलेंगे हम बैकुंठ ।**
**लीला अद्भुत विचित्र है बैकुंठ ॥ २ ॥**
**खोक बोला गजबसे तबनादाँ ।**
**" क्या मुझे मिल सकेगा कीचडा वाँ ? ॥ ३ ॥**

अर्थः—एकदां देवर्षी नारदांनीं एका डुकराला ह्मटलें ' मी तुला वैकुंठांत घेऊन चलतों. कारण तेथें अद्भुत लीला आहेत ( त्या तुला दिसतील. ) त्यावर डुकर ' मोठ्यानें ओरडून ह्मणाले ' ' काय, ! मला तेथें चिखल मिळेल ? '

**टिहरीला** चला म्हणजे तेथें भोजनाची योग्य व्यवस्था होईल व आपली प्रकृति सुधारेल ' अशी सर्वांनीं त्यांची प्रार्थना केली. यामुळें **स्वामींनीं टिहरी** येथें येण्याचे कबूल केलें. लागलीच स्वामींचीं पुस्तकें वगैरे टिहरी येथे नेण्याची व्यवस्था करण्यासाठीं **नारायणस्वामी टिहरी** येथें आले. याच सुमारास **पूरणजी** ज्यास्त दिवस राहण्यास सवड नसल्यामुळें आश्रम सोडून **टिहरी** येथें येण्यास निघाले. त्यांनां पोहोंचविण्याकरितां **स्वामी** सुमारें अर्धा कोसपर्यंत गेले होते. वाटेंत ते मंदस्वराने म्हणाले, ' प्यारे पूरण, **राम** आतां कदाचित् लवकरच शांत होईल ! तुह्मीं पहातांच अहां राम किती अशक्त झाला आहे तो. कदाचित् रामाचे तुमच्याशीं बोलणें, चालणें, भेटणें, संवरणें किंवा पत्रव्यवहार हीं बंद होतील ! करितां आतां तुम्हींच **राम** व्हा. आणि लेखन वाचनादि सर्व व्यवहार राममय होऊन करा ! ' हे शब्द स्वामींच्या तोंडून निघाले मात्र, तों लगेच **पूरणजींच्या** डोळ्यांतून अश्रु-धारा वाहूं लागल्या. हे पाहून स्वामी तत्काळ तेथून निघून गेले. यामुळें तर पूरणजींनां अधिकच रडूं कोसळले आणि दुःखाचा उद्वेग वाढला. पुढें कित्येक तासपर्यंत भ्रमिष्टाप्रमाणें कशीं बशीं पावलें टाकीत ते पुढे चालले होते. रामाची व त्यांची ही शेवटचीच भेट होती असें त्यांनां समजलें असतें तर ते कदाचित् गेलेही नसते !

## अखेरचा एकान्त.

स्वामींचीं पुस्तके **टिहरी** येथें आणविण्याचा सर्व बंदोबस्त करून **नारायणस्वामी** वसिष्ठाश्रमांत परत आले. स्वामींचीं पुस्तकें व सामानसुमान खाली रवाना करून **स्वामी व नारायणस्वामी** हे दोघेही टिहरीला आले. तेथें त्यांचा मुक्काम महाराजांच्या **सिमलासु** बागेंत दोन आठवडे होता. सर्व ऋतूंत उपयोगी पडणारी, पवित्र व रम्य अशी एखादी एकान्तांतील जागा पाहून पुनः हालण्याचें काम पडूं नये असा विचार स्वामींच्या मनांत आला. **नारायणस्वामींनींही** आपल्या जवळपासच रहावें अशीही त्यांची इच्छा होती.

अखेरीस स्वामींच्या मनाजोगी अशी जागा स्वामींनीं पसंत केली. टिहरीहून सुमारें दोन कोसांवर **मालीदेवल** नामक गांवाच्या शेजारीं गंगा किनाऱ्यावर एक मोठें विस्तीर्ण मैदान आहे. हें ठिकाण रम्य असून **केशवाश्रम** नांवाच्या प्रसिद्ध संन्याशाच्या साठ वर्षांच्या एकान्तवासानें पवित्र झालेलें आहे. ह्या ठिकाणीं एक पक्की पर्णकुटी बांधण्याची **स्वामींनीं** आज्ञा दिली. लागलीच स्वामींच्या मनाजोगी अशी कुटी टिहरीच्या महाराजांनीं बांधविली. व स्वामी तेथें राहूं लागले.

येथून सुमारें कोसावर **गोदीसिराई** म्हणून एक गांव आहे व त्याच्या अगदीं जवळ **बमरोगी** नांवाची एक दगडी गुहा आहे. ही गुहा नारायणस्वामींनी स्वतःकरितां पसंत केली.

## स्वामींची अंतःस्थिती.

वसिष्ठाश्रमांत रहावयास आल्यापासून समाधिकालापर्यंत जो एकान्त त्यांना लाभला त्या काळांत त्यांनीं बरीच कविता लिहिली. वानप्रस्थाश्रमांत असतांना, तसेंच अमरनाथ, गंगोत्री, जम्नोत्री, सुमेरू वगैरे यात्रा करितांना त्यांनीं ज्या कविता केल्या त्या व या वेळच्या कविता यांत महदंतर दिसून येतें. त्या वेळच्या काव्यांत **स्वामी** आपल्या नांवाचा उल्लेख तरी करीत अथवा तो होई. परंतु या काळांतील एकान्तवासांत ते निजानंदांत अतिशय गढून जात. सर्व जगभर आत्मतत्व—राम भरलेलें आहे असा अनुभव ते घेत. यामुळें ते पुष्कळ वेळां अगदीं बेहोष होऊन समाधिस्थितींत असत. एकदां तर ते या **बमरोगी** गुहेजवळ गंगाकिनारीं दोन दिवसपर्यंत अगदीं बेहोष होऊन पडले होते. त्यांना **नारायण** स्वामींनीं शुद्धिवर आणलें. यास्तव या सर्व काळांतील त्याचे काव्यमय उद्गार विदेही स्थितींतील, सर्वात्मभावनेंतील असल्यामुळें अर्थातच या त्यांच्या काव्यांत स्वतःचा नामनिर्देश त्यांच्याकडून झाला नाहीं. पुढें दिलेले उतारे एतदकालीन काव्यांतील असून त्यांवरून त्यांची रहाणी व अंतःस्थिती यांचीं चित्रें स्पष्ट दिसतात.

## जंगलांतील जोगी.

हरहर ओम्, हरहर ओम् ॥ धृ० ॥

जंगलमें जोगी बसता[1] है, गह[2] रोता है, गह हंसता है ।
दिल[3] उसका[4] कहीं न फंसता[5] है, तनमनमें चैन बरसता[6] है ॥ १ ॥

खुश[7] फिरता नंग मनंगा[8] है, नैनोंमें[9] बेहती[10] गंगा है ।
जो आजा[11]ये सो चंगा[12] है. मुख रंग भरा मनरंगा है ॥ २ ॥ हरहर०

गाता मौला[13] मतवाला[14] है, जब देखो भोला भाला है ।
मन मनका उसका माला है, तन उसका एक शिवाला[15] है ॥३॥ ह०

नहीं परवाह[16] मरने जीनेकी, है याद[17] न खाने पीनेकी ।
कुछ दिनकी सुद्धि[18] न महीनेकी, है पवनरुमाल पसीनेकी ॥४॥ ह०

पास इसके पंछी[19] आते हैं, और दरयां[20] गीत सुनाते हैं ।
बादल[21] अश्नान[22] कराते हैं, वृच्छ[23] उसके रिश्ते[24] नाते हैं ॥ ५ ॥ हर०

गुलनार[24] शफक[25] वह रंग भरी, जोगीके आगे है जो खडी ।
जोगीकी निगाह[26] हैरान्[27]·गैहरी[28] तकती रहरहकर है परी ॥६॥ हर०

वह चाँद चटकता गुल[29] जो खिला[30] इस मिहरकी[31] जोतसे फूल झडा।
फव्वारह[32] फरहतका[33] उछला[34], पुहारका[35] जगपर नूर[36] झडा ॥७॥ हर०

---

१ रहातो. २ कधीं. ३ मन. ४ त्याचें. ५ फसत नाही. ६ पाऊस पडत आहे. ७ आनंदानें. ८ नागवा. ९ डोळ्यांतून. १० वहात आहे. ११ येईल. १२ खुष होईल. १३ ब्रह्मज्ञानी. १४ मस्त. १५ शिवालय. १६ काळजी. १७ आठवण. १८ शुद्ध. १९ पक्षी. २० पुष्कळ गाणीं ऐकवितात. २१ मेघ. २२ स्नान. २३ वृक्ष. २४ नातेवाईक. २४ अनार रंगाची. २५ लाली. ( सूर्योदय व सूर्यास्त समयींची लाली. ) २६ दृष्टी. २७ दूर, खोल. २८ पडली आहे. २९ फूल. ३० आहे. ३१ सूर्याच्या. ३२ फवारा. ३३ आनंदाचा, खुषीचा. ३४ उठला, उडाला. ३५ वाछड, बुच्छड. ३६ तेज, प्रकाश.

## वरील कवितेचें रूपांतर

कधीं रडतसे, कधीं हंसतसे । चित्त ना कधीं सक्त होतसे ।
जंगलीं वसे असला योगी । देहमनें आनंदा भोगी ॥ १ ॥
कधीं फिरे नागवा जगांत । नयनी आनंदाश्रु वहात ।
येणाराचें स्वागत करितो । मुखावरी स्वानंदा धरितो ॥ २ ॥
गान मस्त जोगी हा करितो । भोळाभाळा वरुनी दिसतो ।
त्याचा देह शिवालय खास । अंतरि मनमाळेचा वास ॥ ३ ॥
भक्षण पान मरण वा जीवन । यांची त्यास नसे आठवण ।
घाम सुटो अथवा वाराही । मुदलिंच दाद तयाला नाहीं ॥ ४ ॥
अंगावरि पक्षी बसतात । गाणें त्याला ऐकवितात ।
पाऊस त्याला घाली स्नान । बंधुत्व करि सारें रान ॥ ५ ॥
त्याच्या दृष्टित पाहुनि खोली आकाशांतिल अवघी लाली ।
तशीच ठायीं पडुनी राहे । आनंदाचा पूरचि वाहे ॥ ६ ॥
चंद्राचा जो दिसतो गोल । योगि भास्करा पामुनि फूल ।
तुटून पडलें साफ समूळ । नवनवलानें बनत रसाळ ॥ ७ ॥
आनंदार्णव उसळी मारी । तुषारभिजविति जगतीं सारी ।
फेन धवलयश त्याचें पसरे । विश्ववदन मग विलसे हंसरे ॥ ८ ॥

स्वामी सर्वत्र आत्मतत्व भरलेलें आहे हें कसें पहात होते, किंबहुना ते कसे विराट स्वरूप बनलं होते, याचा मासला ह्मणून पुढें दिलेली कविता आहे.

( **गजल.** ताल–त्रिताल )

*** हिप् हिप् हुर्रे । हिप् हिप् हुर्रे ॥ टेक ॥**

**खुशखुर्रम्[१] मिल मिल गाते हैं, हिप् हिप्० ।**
**है मंगलसाज[२] बजाते हैं, हिप् हिप्० ॥ १ ॥**

---

*** हा इंग्रजी शब्द असून तो आनंददर्शक आहे. १ आनंद, मस्त होऊन. २ शोभा, समेळ.**

सब ख्वाहिश मतलब हासिल[1] है, सब खूबोंसे[2] मैं वासिल[3] हूं।
क्यों हमसे भेद छुपाते हैं, हिप् हिप्० ॥ २ ॥
हरइकका[4] अंतर[5] आत्महूं, मैं सबका आका[6] साहिब हूं।
मुझ पायें[7] दुःखडे जाते है, हिप् हिप्० ॥ ३ ॥
सब आंखोंमें मैं देखता हूं, सब कांनोंमें मैं सुनता हूं।
दिल बरकत[8] मुझसे पाते[9] हैं, हिप् हिप्० ॥ ४ ॥
गहे[10] इश्वा[11] सीमी[12] बरकां[13] हूं, गह नारा[14] शेर बबर[15] का हूं।
हम क्या क्या स्वांग बनाते हैं, हिप्० ॥ ५ ॥
मैं कृष्ण बना मैं कंस बना, मैं राम बना मैं रावण था।
हां अब वेद कसमें[16] खाते हैं, हिप्० ॥ ६ ॥
मैं अंतर्यामी साकिन[17] हू, हर पुतली नाच नचाता हूं।
हम सूत्रतार[18] हिलाते हैं, हिप्० ॥ ७ ॥
सब ऋषियोंके आयीना[19] दिलमें, मेरा नूर[20] दरखशां[21] था।
मुझहीसे[22] शाइर[23] लाते हैं, हिप्० ॥ ८ ॥
मैं खालिक[24] मालिक दाता हूं, चशमकसे[25] दहर[26] बनाता हूं।
क्या नकशे[27] रंग जमाते हैं, हिप्० ॥ ९ ॥

---

१ जरुरीचा, महत्वाचा. २ सुंदर लोकांशीं. ३ अभेदरूप, मिसळलेला. ४ प्रत्येकाचें. ५ अंतःकरण. ६ मालक. ७ मिळाल्यावर. ८ सुख, आबादी. ९ मिळतो, प्राप्त होते. १० कधीं कधीं. ११ नखरा. १२ मध्यें. १३ चांदीच्या तेजाप्रमाणें, प्यारी. १४ गर्जना. १५ सिंहाची. १६ शपथा. १७ स्थिर. १८ सूत्रधाराप्रमाणें बाहुलीची तार हालवितों. १९ अंतःकरणरूपी आरसा. २० तेज व प्रकाश. २१ चमकत होता. २२ माझ्यापासून. २३ कवी. (माझ्या आत्मस्वरूपापासून ह्या सर्व कविता होतात.) २४ सृष्टि रचणारा. २५ निमिष. २६ युग, समय. २७ चित्रें, सृष्टिरूपी तसबीर.

इकें कुनेंसे दुन्या पैदाकर, इस मंदीरमें खुद रहाता हूं।
हम तेनहा शैहर बसाते हैं हिप्० ॥ १० ॥
वह मिसेरी हूं जिसके दुन्याकी अशरेत शीरीं है।
गुल मुझसे रंग सजाते है, हिप्० ॥ ११ ॥
मसजूद हूं किबलांहूं, काबांहूं, माबूदें अजों नाकूसें काहूं।
सब मुझको कूकें बुलाते हैं, हिप्० ॥ १२ ॥
कुलें आलमें सायां है, हर आन बदलता आया है।
जिलें कामतें गिर्दें घुमाते है, हिप् हिप्० ॥ १३ ॥
यह जगत् हमारी किरणें है फैलीं हरसूं मुझ मर्कजेसे।
शाँ बुकलंमूं दिखलाते हैं, हिप्० ॥ १४ ॥
संसार तजल्ली है मेरी, सब अन्दर बाहर मैं ही मैं हूं।
हम क्या शैले झडकाते हैं, हिप्० ॥ १५ ॥
जादूगार हूं, जादू हूं खुद, और आप तमाशाँ-बीं मैं हूं।
हम जादू खेल रचाते हैं, हिप् ॥ १६ ॥
है मस्तपडा मैहमीमें अपनी, कुछभी गैर अजरामें नहीं।
सब कल्पित धूम मचाते हैं, हिप्० ॥ १७ ॥

---

१ एक. २ आज्ञा, संकेत. ३ विस्तृत. ४ वसावितों. ५ निराळा, अक्षर. ६ कारण, सबब. ७ विषयानंद, भोग्यपदार्थ. ८ गोड. ९ फूल. १० पूजा केलेला. ११ जिकडे तोंड करून मुसलमान ध्यान करितात ती. १२ मक्केच्या मशिदींतील पूज्यस्थान. १३ पूजनीय. १४ मांग. शंख. १५ आवाज. १६ सर्व. १७ जगत्. १८ छाया. १९ प्रतिबिंब. २० बिंब. २१ रूप. २२ प्रत्येक बाजूला. २३ सूर्यापासून, केंद्रापासून. २४ रंग, छाया, स्वरूप. २५ नानाविध. २६ तेज. २७ तेजोलहरी, अग्नीच्या लाटा. २८ तमाशा पहाणारा. २९ झोंपडींत. ३० रामाशिवाय.

( वरील कवितेचें रूपांतर )

## स्वामींचें विराट् स्वरूप.

आनंदाची मादक दारू पिऊन झालों बेभान ।
अहा किती सुंदर छान ॥ १ ॥
सकल मंगलें जुळुनि झडतसे समेळ त्याची सुरतान ।
अहा किती सुंदर छान ॥ २ ॥
अभेदरूपें सुंदर मोठ्या वस्तु राहिलों व्यापून ।
अहा किती सुंदर छान ॥ ३ ॥
व्यक्ति हृदयगत मालक आत्मा दुःख टाकितों कापून ।
अहा किती सुंदर छान ॥ ४ ॥
नेत्रद्वारें मीच पाहतो घेतों कानी ऐकून ।
अहा किती सुंदर छान ॥ ५ ॥
इंद्रियवर्गा काम लावुनी बनतों आनंदस्थान ।
अहा किती सुंदर छान ॥ ६ ॥
रौप्यापरि मत्तेज झळकतें हरिसम करितों महास्वन ।
अहा किती सुंदर छान ॥ ७ ॥
रामकृष्ण कंसचि रावण मी वेदांचें सशपथ कथन ।
अहा किती सुंदर छान ॥ ८ ॥
सूत्रधारसम सर्व जीव मी नाचवितों स्थिर राहून ।
अहा किती सुंदर छान ॥ ९ ॥
ऋषि हृदयीं मत्तेज विलसतें रूप जसें मुकुरांतून ।
अहा किती सुंदर छान ॥ १० ॥
या कवितांची निर्मिति होते माझ्या रूपापासून ।
अहा किती सुंदर छान ॥ ११ ॥
सृष्टिरचयिता युगें घडवितों केवळ निमिषापासून ।
अहा किती सुंदर छान ॥ १२ ॥
नामरूप चित्रांना सकळही रंग कसा देतों भरून ।
अहा किती सुंदर छान ॥ १३ ॥

वास करुनि विस्तार पावतों संकेतें जगती रचुन ।
अहा किती सुंदर छान ॥ १४ ॥
मीच असें अक्षर परमात्मा भोगपदीं रस ओतून ।
अहा किती सुंदर छान ॥ १५ ॥
किबला, काबा, मांगशंख मी उठतो रव जो फुंकून ।
अहा किती सुंदर छान ॥ १६ ॥
मीच तो असें फुलांमधीं जो रंग देतसे ठेवून ।
अहा किती सुंदर छान ॥ १७ ॥
सारी दुनिया माझी छाया रूप देतसें बदलून ।
अहा किती सुंदर छान ॥ १८ ॥
हें जग मत्सूर्याचीं किरणे, रंगरूप येती दिसुन ।
अहा किती सुंदर छान ॥ १९ ॥
माझ्या तेजें संसाराचा शकट चालतो फिरफिरुन ।
अहा किती सुंदर छान ॥ २० ॥
माझ्यापासुनि लाटा उठती या तेजाच्या उचमळुन ।
अहा किती सुंदर छान ॥ २१ ॥
कर्ता, द्रष्टा, तैशी जादू सर्व मीच आकारून ।
अहा किती सुंदर छान ॥ २२ ॥
झोंपडींत मी, राम एकला राही विश्व निरासून ।
अहा किती सुंदर छान ॥ २३ ॥
असें खरें असतां जन नाना देती बाता झोंकून ।
अहा किती सुंदर छान ॥ २४ ॥

## नारायण स्वामींस उपदेश.

वर उल्लेखिलेल्या **यमरोगी गुहेकडे** जाण्याकरितां **नारायणस्वामी** निघाले असतां एक दिवस स्वामी ' मीहि थोडा वेळ फिरावयास येतों ' असें म्हणून त्यांचेबरोबर निघाले. थोडें अंतर चालून गेल्यानंतर स्वामीजी म्हणाले. " बेटा, कदाचित् राम लवकरच शांत होईल. रामाचें शरीर प्रत्यहीं–किती

कृश व कमजोर होत आहे हें तूं पहात आहेस. **रामाला** जगाचा वीट आलेला आहे! यास्तव कांहीं करावेसें वाटत नाहीं. असें वाटतें लवकरच **रामाची** लेखणी बंद होईल; शरीर जड व मूक बनेल; आणि बोलणेंचालणें थांबेल. असें वाटतें कीं भागीरथीचा किनारा सुटणार नाहीं! जेथें जेथें **रामाला** आमंत्रणे येतील, तेथें तेथें तुलाच जावें लागेल. यास्तव हे, प्यारे, जा, गुहेंत जा, तेथें दडी मार. खूब एकान्त सेवन कर. दररोज अस्सल रामांत–निजस्वरूप राहून **राम** बन आणि स्वयंसिद्ध **राम** हो—मूर्तिमंत वेदान्त बनून बाहेर पड. शोक प्रीति इत्यादिकांचा अंतःकरणाला स्पर्श होऊं देऊं नको. **राम** सर्वत्र विराजमान आहे असें अनुभव. रामाचें तन, मन, धन आपणच आहों असें मनांत धर." हा हृदयवेधक उपदेश ऐकून **नारायणस्वामींच्या** नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. स्वामींच्या चरणांवर त्यांनी मस्तक ठेविलें. तेव्हां स्वामीनांही गहिंवर येऊन त्यांनी नारायणाला पोटाशीं धरिले आणि नारायणाच्या मस्तकावर वरदहस्त ठेऊन म्हटलें:— 'बेटा, घाबरूं नको. एकान्तांत **वेदान्ताचा** अभ्यास कर. अहर्निश आत्मचिंतन कर. आणि स्वरूपीं स्थिर हो. चालू असलेला 'स्वानदसाम्राज्य*' नांवाचा लेख पूर्ण होतांच तुला तत्काल बोलाविण्यांत येईल. **रामाची** पर्णकुटी तयार होऊन **राम** तेथे राहूं लागला म्हणजे आठ आठ दिवसांनी **रामाकडे** येत जा. रामापासून दूर रहावें लागणार या वियोगाबद्दल वाईट वाटूं देऊं नको. **रामाच्या** सेवेत अंतर पडणार या बद्दलही खेद मानूं नको. **रामाचें** शरीर लवकरच थंड पडणार! आतां केवळ आत्मोन्नतीचा विचार कर. दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा करूं नको. स्वावलंबी बन तात्पर्य **वेदान्ताची** मूर्ति बन.'

## जलसमाधि

वर सांगितलेला अमृततुल्य उपदेश करून **स्वामी** परत फिरले. पण **नारायणाचे** पाय पुढें जाण्याकरितां किती जड पडले पडले असतील आणि

---

* हा लेख उर्दूमध्यें असून त्यांतील शेवटचे शब्द पुढें दिलेच आहेत. हा लेख 'राम उपदेश' या नांवानें उर्दूमध्यें प्रसिद्ध आहे.

नारायणाच्या मनःसमुद्रांत काय काय लहरी उठल्या असतील याची कल्पना वाचकांनींच करावी! बमरोगी गुहेंत जाऊन चार पांच दिवस झाले असतील नसतील तोंच स्वामींकडून पुढील संदेश आला. 'स्वानंदसाम्राज्य' बहुतेक पूर्ण झाला. करितां तूं येत्या रविवारीं जरूर ये. सदरहू लेखाची नक्कल कर म्हणजे ती 'जमाना' मासिकांत किंवा दुसऱ्या एकाद्या ठिकाणीं प्रसिद्धीकरितां पाठवूं. असा निरोप आल्यामुळें तर ते अधिक उत्सुकतेनें त्या रविवारीं जाणार होते. पण शनिवारीं संध्याकाळीच टिहरीच्या महाराजांचा नौकर नारायणस्वामींकडे आला व स्वामींचे शरीर गंगेत वाहून गेल्याची बातमी त्याने त्यांस सांगितली! ही अशुभ वार्ता समजतांच नारायणस्वामींची स्थिती काय झाली असेल याची कल्पना करितां येणेच कठीण. तथापि मनातील विचारांच्या सर्व काहूराला एकदम बाजूला सारून नारायणस्वामींनी टिहरीकडे धांव टोकली. रात्रौ आठ वाजतां तेथें पोंचल्यावर नगरांतील सर्व लोक शोकाकुल झालेले आढळले. प्रथमतः नारायणस्वामींनीं स्वामींचा आचारी जो भोलादत्त त्याला हांक मारून खरी हकीगत विचारिली तेव्हां तो म्हणालाः—

"स्वामी व मी दोघे बरोबर गंगेवर गेलों. मी स्नान करून तीरावर आलों. स्वामी मात्र व्यायाम करून गंगेंत उतरले. ज्या ठिकाणीं गंगाजी जोरानें वहात होती तेथें जाऊन स्वामींनीं स्नानास सुरवात केली. ते प्रथम गळ्याइतक्या पाण्यांत होते. बुडी मारणें व आंग चोळणें ह्या दोन क्रिया ते करीत होते. असें करितांना पुनः एकदां बुडी मारली तों त्यांच्या पायाखालचा दगड निसटला व खोल पाण्यांत वहात गेले. उभें राहण्याचा त्यांनीं प्रयत्न केला पण त्यांना उभें राहतां येईना. शेवटीं ते वहात वहात जाऊन एका भोंवऱ्यांत सांपडले. तेव्हां मात्र मी मोठ्यानें ओरडलों. टिहरीचे महाराज गंगोत्रीहून परत येत होते; त्यामुळें सर्व नौकरचाकर गांवाच्या वेशीवर गेले होते. ह्मणून माझें ओरडणें ऐकून कोणीहि मनुष्य आला नाहीं. पण घाबरलेला पहातांच स्वामींनीं मोठ्यानें ओरडून सांगितलें. 'घाबरूं नको, मी बाहेर

१ कानपूर येथें प्रसिद्ध होणारें मासिक.

येण्याचा प्रयत्न करीत आहे. हा पहा आलोंच तुझ्याजवळ!' पण स्वामींच्या प्रयत्नांना यश आलें नाहीं. शेवटीं कंटाळून व थकून त्यांनीं भोंवऱ्यांत बुडी मारली व एका सुरकांडीसरसे वीस हातांवर बाहेर पडले. पण तेथें त्यांना दम छाटेना. तोंडांत पाणी शिरलें व ते धड इकडे नाहीं, धड तिकडे नाहीं अशी त्यांची स्थिति झाली. अखेरीस ते खालींच जाऊं लागले. मात्र ॐ चा उच्चार दोनदां माझ्या कानावर पडला. आणि ते हात जोडून आसनमांडी घालित असावे, असं दिसलें.

**भोला**ने सांगितलेली हकीगत ऐकून सर्वांना परमावधीचें दुःख झालें. नारायण स्वामी हे **रामतीर्थां**चे पट्टशिष्य असून त्यांची सेवा करण्याचें व्रत त्यांनीं अंगिकारिलेलें होतें. परंतु स्मामींच्या अखेरच्या वेळीं मात्र आपण त्यांच्याजवळ नव्हतों याबद्दल त्यांच्या अंतःकरणांत एकसारखी कालवाकालव सुरू झाली व रुखरुख वाटूं लागली. शोकोद्वेगामुळें त्यांच्या मनांत नानातरंग उठूं लागले. ' **स्वामीतर** इच्छामरणी ! **रामाच्या** इच्छेशिवाय त्याचा देह वाहून नेण्याचें सामर्थ्य भागीरथींतही नाहीं. कारण **रामाची** आज्ञा अनुल्लंघनीय आहे. **रामाचा** हुकूम पाळील तर मृत्युलाही मृत्यु येणार नाहीं ! अशीं स्वामींचीं वचनें असूनही आज हा असा कसा प्रकार झाला ? " वगैरे विचारतरंग त्यांच्या मनःसागरांत मोठमोठ्यानें उठत होते. तितक्यांतच जेव्हां त्यांचें लक्ष **स्वामींचा** कमंडलु, स्वामींच्या पुस्तकांच्या पेट्या यांच्याकडे जाई, तेव्हां त्यांच डोळे पाण्यानें भरून येत. आणि वेड्यासारखे मोठ्यानें ओरडून ते ह्मणत ' हे लेख व ग्रंथ यांचें संशोधन आतां कोण करील ! रामा सारखें वेदान्तावर भाष्य आतां कोण लिहील ! '*

---

* स्वामी रामतीर्थांसारखें साधें, समर्पक, सुबोध, अगदीं साध्या व व्यावहारिक दृष्टांतांनीं भरलेलीं व्याख्यानें व भाष्यें पुनः वाचावयास व ऐकावयास मिळणे दुर्मिळ तर खरेंच. पण वर सांगितल्याप्रकारची तळमळ **नारायण स्वामींच्या** अंतःकरणांत असल्यामुळेंच कीं काय, अथवा स्वामींनीं सांगितल्याप्रमाणें **नारायाण राम** झाल्यामुळें कीं काय, अथवा स्वामी **रामतीर्थांसारखी** हातोटी **नारायणस्वामींच्या** ' **भगवदाशयार्थदीपिकेंत** ' दिसून येतें. अगर त्यांचीं भाषणें ज्यांनीं ऐकिलीं असतील त्यांना स्वामी रामतीर्थांचीच आठवण होते.

उद्वेग व निराशा यांचें केवढें तुंबळ युद्ध **नारायणस्वामी**च्या मनोभूमीवर चाललें असेल याची खरी खरी कल्पना 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे.' कारण स्वामींची योग्यताच तशी होती, ते अति विद्वान् होते, ते महान् साधु होते, ते महात्मे होते, ते स्वानुभवी पुरुष होते, अथवा ते अवतारी पुरुष होते, ह्मणून **नारायणस्वामींना** त्यांच्या अकस्मात् समाधीमुळें अतिशय दुःख झालें असें नसून ते त्यांचे मोक्षगुरु होते, ते सद्गुरु होते, ते होते ह्मणून नारायणस्वामींना सद्गुरुसेवेचा लाभ घडत होता, तो आतां घडेनासा झाला ह्मणून त्यांच्या मनाला उद्विग्नता प्राप्त झाली असे ह्मटलें तरीसुद्धां सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास त्यांच्यावर 'कच्चेपणाचा व मोहवशत्वाचा' आरोप येतो. ह्या असल्या आरोपाला ते पात्र आहेत किंवा नाहीं हें जाणण्याची आमची योग्यता नाहीं. तथापि त्यांना वाटत असलेल्या उद्विग्नतेचें कारण वर उल्लेखिलेल्या गोष्टींत नसेल असें ह्मणतां येत नाही. पण त्यांना वाटलेल्या उद्विग्नतेचें दुसरें एक महत्वाचें कारण होते. रामाची वाणी कधींहि अन्यथा होणार नाहीं. परंतु आज तर झालेली दिसते. असा विचार मनांत येऊन त्यांना अति खेद होई. कारण संन्यासग्रहणानंतर '**रामबादशहा**' नेहमीं ह्मणत कीं, **रामाची** तशी इच्छा असल्याशिवाय **रामाच्या** देहाला स्पर्श करण्याची ताकद मृत्युमध्येंही नाहीं.' असें **स्वामी रामतीर्थ** ह्मणत असत. हा विचार एकसारखा **नारायण**स्वामीपुढे दत्त ह्मणून उभा असे. हे त्यांच्या उद्विग्नतेचें खरें कारण होतें."

अशा स्थितींत **स्वामींच्या** निवासस्थली जाण्याला त्यांचे पाऊल उचलेना. बरें '**सिमलासु**' बाग सोडून शहरांत जावें तर तेथील लोकांच्या चित्ताची उदासीनता द्विगुणित होईल ! तात्पर्य त्यांच्या अंतःकरणाला शांति म्हणून मिळेना. अशा भ्रमिष्ट स्थितींत ते '**सिमलासु**' बागेच्या आसपास फिरत असतां पूरणजींची व त्यांची गांठ पडली. भेट होतांच दोघांचीं हृदयें अगदीं उचंबळून आलीं ! पूरणजींना सुद्धां **रामाचा** अशा रीतीनें अन्त होणें ह्मणजे त्यांच्या आतांपर्यंतच्या सर्व लेखांवर व वचनांवर हरताळ लावण्यासारखेंच आहे ! असा संशय वाटूं लागला. '**स्निग्धजनसंविभक्तं हि दुःखं**

**सह्यवेदनं भवति** ' असें ह्मणतात तें खरें. परस्परांनी दुःखाची देवघेव केल्यानंतर त्यांची अंतःकरणें किंचित् हलकीं झाली व मनांतील खळबळ जरा शांत झाली. दुःखोद्वेगामुळें **नारायण** स्वामींचें लक्ष आतांपर्यंत स्वामीच्या पुस्तकांकडे व कागदपत्रांकडे गेले नव्हतें. परंतु आतां मात्र कागदपत्र पाहण्याचा त्यानी निश्चय केला. आणि ते दोघे शिष्य ' **सिमलासु** ' बागेतील स्वामीच्या निवासस्थानी आले. त्या ठिकाणीं येतांच पुस्तकांच्या पेट्यांजवळ कांहीं सुटे कागद पडलेले त्यांना दिसले. या अस्ताव्यस्त कागदांकडे त्यांचे लक्ष जाऊन त्यांनीं ते चाळण्यास प्रारंभ केला. तो त्यांमध्ये स्वामीच्या लेखणीतून उतरलेला शेवटचा लेख ' स्वानंद साम्राज्य ' त्यांच्या दृष्टीस पडला. ह्याच लेखाकरितां **स्वामींनीं नारायणास** रविवारीं येण्यास सांगितले होते. या लेखावर पानांचे अनुक्रमांक नव्हते. यामुळे हाती असलेले पान वाचण्यास त्यांनीं सुरवात केली. वाचतां वाचतां पुढील मजकूराचा कागद त्यांना मिळाला.

## संमोह निरास.

"ब्रह्मा, विष्णु, शिव, इंद्र, गंगा, भारत ! हे मृत्यो, हें शरीर पाहिजे तर बेलाशक घेऊन जा. मला त्याची बिलकुल पर्वा नाही. दुसरी असंख्य शरीरें मला कांहीं कमी नाहींत ! चंद्राचे स्वच्छ शीतल किरण, सुर्याचे सोनेरी किरण परिधान करून मोठ्या आनंदानें मी राहूं शकेन. पर्वतांतून वाहणारे ओढे व नद्या यांच्या खळबळ वाहणाऱ्या प्रवाहरूपानें मला स्वच्छंद फिरतां येईल. समुद्रांतील लहरींच्यारूपानें मी आनंदानें नृत्य करीत राहीन. शीतल, मंद आणि सुगंधी वायु मीच आहें. माझी सर्व रूपें नित्यशः बदलणारी आहेत. पर्वतांच्या शिखरांवरून मी खालीं आलों, दरवाजे ठोठाविले, मृतांना सजीव केलें, निजलेल्यांना जागें केलें, पुष्पकलिकांना हंसविलें, बुलबुलांना सुखविलें, कांहींचे अश्रु पुसलें, कित्येकांवर पांघरूण घातलें. कित्येकांचे मायावरण दूर केलें, याला छेड, त्याला छेड, इकडे फिर तिकडे फिर, असें करींत हातावर हात मारून गेला ! हा गेला ! त्यानें आपल्या बरोबर कांहीं नेलें नाहीं. तो कोणाच्याहि हातीं सांपडला नाहीं—सांपडणार नाहीं ! * ॐ ॐ ॐ. "

---

* सदरहू लेख स्वामींनीं अस्सल उर्दूमध्यें लिहिलेला असून तो समाधीच्या फारच थोडा वेळ पूर्वी लिहिलेला होता.

झालें ! सदरहू लेख पाहून **नारायणस्वामी** व **पूरणजी** यांच्या चित्ताचें समाधान झालें ! त्यांच्या सर्व शंका दूर झाल्या. ' राम लवकरच शांत होणार ! या स्वामींच्या शब्दांची याच वेळीं उभयतांस स्मृति झाली.

लेखाचें वाचन झाल्यावर नारायण स्वामींनीं इतर कागदपत्रें व पुस्तकें चाळलीं. लेख लक्षपूर्वक तपासून त्याचें विषयानुरोधानें सात भागांत वर्गीकरण केलें. स्वामींचें सर्व गद्यपद्य वाङ्मय प्रसिद्ध झालेलें आहे.

## शेवटच्या लेखासंबंधानें.

वर दिलेल्या स्वामींच्या शेवटच्या लेखासंबंधानें **नारायण** स्वामींनी **भोलादत्तास** विचारितांच त्याने पुढें दिलेली हकीगत सांगितलीः—

' स्नानास जाण्यापूर्वी बराच वेळपर्यंत **स्वामीमहाज** या कागदावर कांहीं लिहीत होते. त्यावेळीं त्यांचा चेहरा लाल व आनंदमय दिसत होता. डोळ्यांतून मोत्यांसारखे अश्रु ठपकत होते. त्यांचें चित्त इतकें एकाग्र झालें होतें कीं, शरीराचा एक केंसही हालत नसावा असें वाटे. लेख लिहिण्यांत ते इतके चूर होते कीं, मी किती वेळ तरी त्यांच्याजवळ जाऊन उभा होतों, पण माझ्याकडे त्यांनीं पाहिलें सुद्धां नाहीं. अकरा वाजण्याचा सुमार असल्यामुळें भिक्षा तयार असल्याचें कळविण्यासाठीं मी तेथें गेलों होतों. पण पाहतों तों **स्वामी** समाधिमग्न ! कागद लेखणीही हातांतून पडलेलीं होतीं. भीत भीत जवळ जाऊन भिक्षा तयार असल्याबद्दल महाराजांना हात जोडून सांगितलें. पण कांहीं जबाब नाहीं ! थोड्या वेळानें पुनः बोललों ' भगवन् ! भिक्षा आपली वाट पाहत आहे. ' माझा आवाज ऐकून स्वामींनीं नेत्र उघडले, आणि माझ्याकडे वळून हंसून म्हटलें, बेटा, काय म्हणतोस ? ' मी पुनः हात जोडून म्हणालों ' महाराज भोजन तयार आहे. स्नानाकरितां गंगाजल वर आणूं कीं आपणच गंगेवर जाणार आहांत ? ' यावर ते म्हणाले " तूं अजून खाल्लं बिल्लंस कीं नाहीं ? " मी उत्तर दिलें, ' महाराज, नाहीं, कांहीं खाल्लं नाहीं. मीही आज गंगास्नान करून नंतरच जेवणार आहें ! ' माझें उत्तर ऐकून, कां कळे, **स्वामींना** हसूं कोसळलें व आश्चर्यानें ते म्हणाले, " प्यारे भोलादत्त ! काय, आज तूं गंगेवर स्नानाला येणार ? असें आज विशेष काय आहे ! "

मी ह्मणालों ' महाराज, आज मोठें पर्व आहे, एक तर आज दिपवाळी, तशांत संक्रान्त, शिवाय आमावास्या ! ह्मणून ह्मणतों, गंगास्नान करून मगच भोजन करावें. व्यायाम करितांना स्वामींना थोडें लागलें असल्यामुळें समाधीपूर्वी दोन चार दिवस गंगा वर आणवून ते स्नान करीत. भोलादत्ताचें उत्तर ऐकून तेथेंच स्नान करणें बरें न वाटल्यामुळें स्वामी ह्मणाले, ' ठीक आहे. आज राम गंगेवरच जाऊन स्नान करील. चल आपण दोघेजण बरोबरच जाऊं. ' हे भाषण झाल्यावर आह्मी दोघे गंगेवर गेलों. "

भोलादत्ताची ही माहिती ऐकून तर **नारायणस्वामी व पूरणजी** यांची समाधी घेण्याचा **स्वामींचा** विचार होता याबद्दल अगदीं खात्री पटली. स्वामींचें कोणतेंही वचन खोटें ठरलें नाहीं याबद्दल तर त्यांना यत्किंचित् संशय उरला नाहीं.

## समाधीनंतर

स्वामींचें शरीर वाहत गेलें तें नदीच्या प्रवाहाला लागून एक गुहा होती, तींत जाऊन अडकलें. यावेळीं असा एक सुयोग जुळून आला कीं, स्वामींचे जलसमाधीचे वेळीं तोफांचे आवाज ऐकूं आले ! सदरहू तोफा वास्तविक ठिहरीचे महाराज साहेब यांच्या स्वागतार्थ उडविल्या जात होत्या. परंतु जलसमाधीही बरोबर त्याच वेळीं झाली ह्मणून जणूं काय स्वामी ब्रम्हीभूत झाल्याची बातमी सर्व जगालाच सांगत होत्या.

स्वामी रामतीर्थ हे ता. १७ आक्टोबर इ. स. १९०६ रोजीं, बयाच्या तेहतिसाव्या वर्षी ऐन दिपवाळीचे दिवशीं ब्रम्हीभूत झाले ! स्वामींचा जन्मही दिपवाळीचे दिवशीं ! स्वामींचें कृष्णार्पणसुद्धां दिपवाळींत ! आणि समाधीही दिपवाळींत ! काय हा विलक्षण योगायोग ! !

समाधीनंतर सात दिवसांनीं त्यांचा देह फुगून वर आला. तो गंगेच्या तीरावर लागला त्यावेळीं तो समाधीस्थितींतच होता. दोन्ही हात एकावर एक असे छातीवर ठेवून आसनमांडी घालून बसलेले, अशी त्यांच्या शरीराची स्थिति होती ! तोंड ॐ ह्मणतांना असें उघडें राहिलें असावें तसें होतें !

पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, देह इतके दिवस पाण्यांत असूनही त्याला कोणत्याही जलचरानें स्पर्शसुद्धां केलेला नव्हता. या वेळीं **नामदेवाच्या** शिंपल्यांतील जन्मासंबंधाच्या गोष्टीची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. **नामदेव** शिंपल्यांत जन्मून तो चंद्रभागेंतून वहात चालला होता व **नामदेव विठ्ठल**नामाचा* उच्चार करीत होते. असें आपल्या प्रेमळ व भाविक भक्तांनीं लिहून ठेविलें आहे तें निव्वळ अंधश्रद्धेमुळें आहे. कारण अशा स्थितींत शिंपला रहाणेंच शक्य नाहीं, वगैरे विचार ज्यांच्या डोक्यांत येतात त्यांनीं **स्वामीं**च्या देहाबद्दलच्या सुमारें पंधरा वर्षांपूर्वीं घडलेल्या गोष्टीचा विचार करावा म्हणजे अधिकारी पुरुषांच्या स्थितीबद्दल त्यांच्या मनांत प्रकाश पडल्याशिवाय रहाणार नाहीं. असो. देह बाहेर काढिल्यानंतर एका पेटींत घालून ती विधिपूर्वक भागीरथींत सोडण्यांत आली!

अशा रीतीनें स्वामींसारख्या अधिकारी विभूतीचें देहावसान झालें! त्यांना करावयाचें विशिष्ट कार्य त्यांनीं केलें, ते भवसमुद्रांतून प्रवास करणाऱ्या नरनौकेला योग्य मार्ग दाखविण्याचें, खडक व भोंवरे यांना टाळून जाण्याचें दीपस्तंभाप्रमाणें काम करीत आहेत. असे संघटीत शक्तीचे केंद्रीभूत महात्मे लवकरच आपलें अवतार कृत्य समाप्त करितात. तथापि त्यांच्या जीवनक्रमाचा एक स्फुलिंग सर्व जगभर ज्ञानाग्नी पसरविण्यास कारणीभूत होतो. आद्यशंकराचार्य, ज्ञानेश्वर, स्वामी रामतीर्थ यांच्यासारख्या राक्षसी मानसिक श्रम करणाऱ्या व्यक्तींचें देहावसान अल्प वयांतच होतें असें मानसशास्त्रवेत्ते सांगतात. परंतु याला सुद्धां अपवादभूत व्यक्ती आहेतच. याकरितां असे महात्मे आपल्यामधील अद्भुत शक्तीच्या आकर्षणानें जनतेचीं अंतःकरणें आपल्याकडे ओढून घेऊन जनता आपल्यावर अवलंबून रहात आहे असें पाहतांच तिला जणूं काय स्वावलंबनानें शिक्षण देण्याच्या इरादानेंच धारण केलेली कुडी साडून जातात असें म्हणणेंच अधिक सयुक्तिक दिसतें.

स्वामी समाधिस्थ झाल्यामुळें आमच्यासारख्या बद्धांना वाईट वाटणें अगदीं साहजिकच आहे. तथापि मनाच्या समाधानाकरितां **रामाच्या**

---

* भक्तिविजय ग्रंथ पहा.

ओजस्वी उपदेशाची कांस धरल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. या प्रकरणाच्या प्रारंभाला दिलेल्या भगदुक्तीचाच जणूं काय अनुवाद स्वामींनीं केलेला दिसतो. तथापि त्यावर रामत्वाचा शिक्का असलेला स्पष्ट दिसत आहे. याकरितां त्याकडे वळतों.

( गजल )

जाने मन[1] ! जिस्म[2] एक खिलता[3] है ॥
इसके उतरे न कुछ बिगडता है ॥ १ ॥
याद रख, तूं नहीं यह जिस्मे-कसीफ[4] ॥
और हरगिज[5] नहीं तूं जिस्मे-लतीफ[6] ॥ २ ॥
जिस्म तेरा कसीफ ओवरकोट[7] ॥
जिस्म तेरा लतीफ[8] अंदर-कोट[9] ॥ ३ ॥
जिस्मे-बेरूनी[10] झट बदलता है ॥
जिस्म अंदरका देरपा[11] सा है ॥ ४ ॥
देह स्थूल मरगया जिस[12] वक्त[13] ॥
देह सूक्ष्म चल गया उस वक्त ॥ ५ ॥
देह सूक्ष्म फिरे है आवागमन[14] ॥
तू तो हरजाँ[15] है, आना जाना कौन ? ॥ ६ ॥

भावार्थः—" अरे प्यारे मना, देह हा एक अंगरखा आहे असें समज. हा अंगरखा काढून ठेवल्यास मूलरूपांत कांहीं बिघाड होत नाहीं. म्हणून तूं

---

१ ए प्यारे मना. २ देह. ३ कोट, अंगरखा. ४ स्थूल शरीर. ५ नेहेमीं. ६ सूक्ष्म शरीर. ७ वरून घालण्याचा मोठा आंगरखा, झुबा (Over-Coat) ८ सूक्ष्म. ९ आंतील आंगरखा. १० बाह्य शरीर अर्थात् ' ओव्हर कोट ' ११ पुष्कळ काळपर्यंत टिकणारा. १२ ज्या. १३ वेळीं. १४ येणें जाणें, जन्म मरण. १५ प्रत्येक ठिकाणीं.

ध्यानांत धर कीं, तूं हा स्थूल देह नाहीं अथवा हा सूक्ष्म देहहीं नव्हेस. स्थूल देह हा तुझा 'ओव्हर कोट' असून सूक्ष्म देह हा तुझा आंतील अंगरखा आहे. बाह्यशरीर हें झटकन् बदलतें. परंतु आंतील देह (सूक्ष्मदेह) पुष्कळ काळपर्यंत राहतो. तथापि स्थूल देह गमनाबरोबरच सूक्ष्मदेह नाहींसा झाला. आणि हाच सूक्ष्म देह जन्म मरणाच्या फेऱ्या घालीत आहे. परंतु तूं (स्वयंप्रकाश आत्मा) हरएक ठिकाणीं आहेस. यास्तव येणें जाणें (जन्ममरण) कसलें व कोणाला !"*

## कवितेचें रूपांतर.

### उपजाति.

मना तुझा ओव्हरकोट देह । तसा दुजा अंडरकोट देह ।
स्थूलत्व शोभे जर एकाठायीं । सूक्ष्मत्व साजे तर अन्य देहीं ॥ १ ॥
वरील देहा जरि टाकिलेंस । मूलस्वरूपीं न घडे विशेष ।
विकार पावे बहु बाह्य देह । चिरंतनत्वा वरि लिंगदेह ॥ २ ॥
हें स्थूल जाई वपु जैं लयाला । शरीर लिंगात्मक घे गतीला ।
परंतु फेरे करि संसृतीचे । सर्वत्रगा हें तुज सत्य कैचें ॥ ३ ॥

सगुणमूर्ति, सगुणउपासना व सगुणभक्ति यांची लज्जत कांहीं निराळीच आहे. तशांत बद्धपणाचें कवच अद्यापि पूर्णपणें फुटलेलें नाहीं अशा लोकांना तर त्यांचें महत्व अधिकच वाटलें व तसें होणें साहजिकच आहे. स्वामी रामतीर्थ हे सगुणरूपानें नाहींसे झाले, ते त्या स्वरूपांत आम्हांला दिसत नाहींत म्हणून वाईट वाटतें. म्हणून "माझा राम पाहिला, सांगा कोणी" अशी रामभक्तांची स्थिति होते. पण त्यावर राम तावडतोब उत्तर देतात:-

---

* वरील कवितेंत सांगितलेली स्थिति जरा अधिक स्पष्ट करण्याकरितां "वैदिक धर्मातील" स्पष्टीकरण उपयुक्त वाटल्यावरून तें येथें सादर करीत आहे.

" राम अत्यंत सुखी आहे. जीवनसागराच्या भरतींत व कर्मांच्या तुफानांत जहाजाप्रमाणें ती वर खालीं हेलखावे खात आहे. ' पुनरपि जननं पुनरपि मरणं या रूपानें आज येथें तर उद्यां तेथें, अशा रीतीनें कोळ्याप्रमाणें मी एक अनंत जाळें पसरीत असतों. क्षणोक्षणीं क्षुब्ध होणारा उत्साही जीवनाचा जणूं काय समुद्रच ! अशा रीतीनें कालाच्या फिरत्या मागांत चैतन्याचा दिव्यशेला मी विणीत असतों. ॐ !"

( वैदिक धर्म व. २ अं. ८ )



अशा स्वरूपांत राम सर्वत्र विलसत आहे. यावरून तो आपल्यामध्येंही खास आहेच. असें असतां त्यालाच, त्या जिव-लग **रामाला** शोधून त्याचें दर्शन घेणें एवढेंच कायतें काम आपल्याकडे आलें. आणि हेंच काम सर्वांनीं करावें अशी स्वामींची जिवंत असतांना इच्छा होती. ते अमेरिकेंतून परत आल्यावर त्यांना भेटण्याची इच्छा वडिलांनीं दर्शवितांच स्वामींनी त्याला पुढील आशयाचा विद्युत्संदेश पाठविला. " त्यांनीं स्वतःमध्यें मला पहावें " पित्याप्रमाणें प्रत्येक मनुष्यानें स्वतःच्या अंतर्यामीं आपलें दर्शन घ्यावें अशीच स्वामींची इच्छा होती. सर्वत्र तेच भरलेले असल्यानें ही इच्छा पूर्ण करण्याचें कामही त्यांचेंच आहे. आह्मांला त्याची फिकीर कशाला ? त्यांच्यावर भार टाकून, उपरिनिर्दिष्ट इच्छापूर्तीचें काम तेच करतील अशा दृढ विश्वासानें बेफिकीर होऊन बसावें हाच उत्तम मार्ग, कारण तेच ह्मणतातः—

' **नितान्त विश्वास, दृढश्रद्धा** हीच उत्कृष्ट **जीवनकला आहे.** '

ही जीवनकला सर्वांना साध्य होऊन जगाच्या कल्याणाकरितां भरतवर्ष चिरायु होवो अशी त्या सर्वव्यापी **रामाची** प्रार्थना करून त्याच्या दर्शनाकडे वळतों.

" ॐ राम, " " ॐ राम, " " ॐ राम ॐ "



## प्रकरण ८ वें.

### स्वामींचीं विविध दर्शनें.

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जित मेव वा ।
तत्तदेवावगच्छस्त्वं मम तेजोंशसंभवम् ॥ ४१ ॥ भ. गी. अ. १०

सर्व देशी हूं, ब्रह्म हमारा, एक जगह अस्थान[1] नहीं ।
रमा हूं सबमें, मुझसे कोई भिन्न वस्तु इन्सान्[2] नहीं ॥
' स्वामीराम '

हिमालयावरील नदंनवनांना शोभा व चैतन्य देणारा चैतन्य घन, सर्व प्रकारचें वैभव व शोभा यांचें आदिकारण, सर्वांना भेदाभेद न करितां एकाच चैतन्यसागरांत नेऊन सोडणारी दिव्यशक्ति, उषेच्या गालावरील रुचिरहस्य, विकसित पुष्पकालिकांचा प्रफुल्लितपणा, मध्यरात्रीं चमकणाऱ्या ताऱ्यांचें अतुलरूप, जगांतील प्रत्येक सौंदर्यवान् वस्तु, ग्रहगणपरिवारासमवेत शोभायमान होणारा निशाकालीन शशांक, प्रातःकालचे हिमतुषार, भूतमात्रांचे नानाविधचरितविलास, जगांतील प्रत्येक वीरपुरूष, साधु, कवी, चित्रकार यांच्या नेत्रांतील चमक इत्यादि अनंतरूपांनीं नटणाऱ्या व विहारकरणाऱ्या ' विश्वविहारी ' रामाला पाहण्याचें काम अतिदुर्घट आहे. आणि यदाकदाचित् त्याचें दर्शन झालें तरी त्याला यथार्थपणानें जाणणें हें काम तर दुर्घटतम आहे. तथापि अनंत आकाशांत फिरणाऱ्या गोलांना पाहण्याकरितां दुरबिणीसारख्या उपनेत्रांचें साहाय्य घ्यावें लागतें आणि तें साहाय्य घेतल्या. वरही त्याचें यथातथ्य दर्शन होणें अथवा दिग्दर्शन होणें ही गोष्ट दुरबिणीच्या शक्तीवर अवलंबून असतें. तद्वत्च अनुभव या विश्वविहारी रामाला पाहण्याचा प्रयत्न करीत असतां येणार हें खास वाङ्मनसातीताला, अमर्याद

---

१ स्थान २ सत्य.

**रामाला** मर्यादित अशा वाङ्मनसादिक साधनांनीं पाहण्याचा प्रयत्न अयशस्वी किंबहुना हास्यास्पद होईल, असें जरी असलें, तथापि प्रयत्न सोडून देणें हें नामर्दपणाचें लक्षण आहे. म्हणून राम जेवढा व जसा दिसेल तेवढा व तसा पहावा, आणि समाधान मानावें हें उत्तम. ज्याप्रकारचे उपनेत्र असतील त्याप्रकारचें **रामाचें** दर्शन होईल. ही गोष्ट येथें नमूद करणे आवश्यक आहे.

यावरून स्वामींचीं दर्शनें आम्ही कशीं घेणार ह्याचें स्वरूप वाचकवर्गाचे लक्षांत आलेंच असेल. यानंतर **रामाचीं** कोणत्या स्थितींतील दर्शने घेणार त्याचा खुलासा करणें जरूर आहे.

आकाशस्थ गोलांपैकीं लहान लहान गोलांचें वेध किंवा दर्शनें घेण्याऐवजीं आपण ज्याप्रमाणें मोठ्या गोलांचीं दर्शनेच प्रथम घेतों, त्याचप्रमाणे ' विश्वविहारी रामाच्या अनंत रूपांपैकीं, कांहीं मोठ्या स्वरूपांकडे यथाशक्ति पाहण्याचा विचार आहे. होणाऱ्या दर्शनांत कोठें दोष किंवा विकृतस्वरूप दृष्टीस पडल्यास त्याचें कारण उपाधिदोष आहे असें समजावें; एवढा खुलासा करून दर्शनाकडे वळतों.

## ( अ ) ब्रह्मचारी अथवा विद्यार्थीराम.

**स्वामी रामतीर्थ** यांचा विद्यार्थी दशेंतील काळ अथवा ब्रह्मचर्याश्रम हा कसा गेला याची सविस्तर हकीगत वाचकवर्गापुढें आहे. तीवरून निघणारे सिद्धांत, स्वामींच्या ' ब्रह्मचर्य ' या व्याख्यानाच्या द्वारें* प्रकट केलेल्या विचाराशीं व त्यांच्या प्रत्यक्ष वागणुकीशीं ताडून पाहणें हें काम आतां करावयाचें आहे. कारण असें करण्यामुळें विचार, उच्चार व आचार ह्यांची एकवाक्यता स्वामींच्या ठिकाणीं किती झालेली होती हें दिसून येईल.

ब्रह्मचर्य या विषयावर व्याख्यान देण्यांत व्यक्तीची, राष्ट्राची व समाजांची ऐहिक व परमार्थिक उन्नति होण्याच्या कामांत ' ब्रह्मचर्याचा ' केवढा दांडगा उपयोग होतो हें भारतवर्षाच्या निदर्शनास स्पष्टपणें आणणें हा स्वामींचा हेतु

* ' ब्रह्मचर्य ' ( स्वा. रा. भाग १० वा. फडकेकृत ).

होता; असें दिसतें. **उन्नतीकरितां अमोघ वीर्य पाहिजे** व **ब्रह्मचर्यपालनाशिवाय दुसऱ्या कोणत्याही** साधनानें **अमोघ वीर्य संपादितां येत नाहीं**. कारण ' **ब्रह्मचर्य प्रतिष्ठायां वीर्यलाभः** ' ' ब्रह्मचर्यपालनापासून अमोघ वीर्याची प्राप्ति होते ' असें **पातंजल मुनीचें** आद्यसूत्र आहे. ही अमोघ वीर्यप्राप्ती मानवी शरीराच्या वाढीच्या भरज्वानींतच करून घेतली पाहिजे व नंतर त्या संपादित ब्रह्मचर्याचें संरक्षण आमरणांत केलें पाहिजे. याच ध्येयावर नजर ठेवून चार आश्रमसंस्था आपल्या शास्त्राने निर्माण केल्या आहेत. **मनुष्यामधील सर्व सामर्थ्याचा झरा त्याच्या वीर्यशक्तींत आहे.** आणि या वीर्याचें **क्रमाक्रमानें मानसिक शक्तींत** व अखेर आध्यात्मिक शक्तीत रूपांतर करणें **हेंच मनुष्याचें इतिकर्तव्य आहे.** जी गोष्ट व्यक्तीला लागू आहे तीच राष्ट्राला व समाजाला आहे. आजकाल अविवाहित राहण्याविषयीं राष्ट्रांतील कांहीं व्यक्तींची प्रवृत्ति होत आहे. ही स्थिति एका दृष्टीनें चांगलीच आहे. **परंतु केवळ अविवाहित राहणें हा ब्रह्मचर्याचा** अर्थ नसून **त्या अविवाहितपणाचा अथवा ब्रह्मचर्याचा स्वोन्नति व राष्ट्रोन्नतिकारक व्यावहारिक शास्त्रांच्या किंवा वेदान्ताचें ज्ञान अंगीं बाणून** घेण्याच्या **कामांत उपयोग केला जात असल्यास तोच ब्रह्मचर्याचा** सार्थ **उपयोग समजावयाचा.** अशा दृष्टीनें राष्ट्रांत उत्पन्न झालेल्या अविवाहित राहण्याच्या प्रवृत्तीचा उपयोग होत गेल्यास निःसंशय राष्ट्राचें कल्याणच होईल. ही उत्पन्न झालेली प्रवृत्ति वाईट असें न ह्मणतां अगर तिच्यावर निरुत्साहकारी अधिक्षेप न करितां तिचा योग्य तो उपयोग करून घेण्याच्या इराद्यानेंच स्वामींनीं ' **आपल्या सर्व सामर्थ्याचा—वीर्याचा ओघ ब्रह्मानंदाकडे वळवून त्याचें ओजांत—आध्यात्मिक बलांत रूपांतर करून घ्या,** ' हा उपदेश केला. अर्थात् उपदेश विधायक स्वरूपाचा असून प्रत्येकानें मनन व आचरण करण्यासारखा आहे. तसेंच पुढें ते ह्मणतात ' **लग्न झालेलें नसूनही अकलेच्या किंवा आध्यात्मिक कार्यांत ज्यांचा काळ** जात नाहीं त्यांना **ब्रह्मचारी ह्मणतां येणार नाहीं.**' यावरून अविवाहित राहावयाचें असल्यास त्याचा

वाक्यांत सांगितलेल्या कार्याकडे त्या आयुष्याचा व्यय केला पाहिजे असा आज्ञावजा सिद्धांत निघतो. अशा रीतीनें वैयक्तिक व राष्ट्रीय चंचल मनाला बांधून टाकण्याकरितां किती अमोलिक व दूरदर्शित्वाचा उपदेश **स्वामींनीं** केला आहे, हें सहज वर वर पहाणारासही दिसणार आहे. ब्रह्मचर्यानें आयुर्मर्यादा कमी होते ह्या एका आक्षेपाचें स्वामींनीं केलेलें खंडन किती समर्पक आहे तें वाचल्याशिवाय पटणार नाहीं; वाचकांनीं तें अवश्य वाचावें अशी विनंती आहे. ' ब्रह्मचर्य व राष्ट्रांतील लोकसंख्येची वाढ ' यांच्या अन्योन्यसंबंधाचें स्वामींचें विवेचन किती शास्त्रीय व सूक्ष्म आहे हें वाचकांनीं वाचून ठरवावें. महात्मा गांधीजींचे विचार स्वामींच्या या बाबतींतील विचारांशीं किती तंतोतंत जुळतात हें आम्हीं मागेंच दाखविलें आहे.

' **ज्याला जगांतील नखरे** व प्रेमकटाक्ष हालवूं शकत नाहीं तो **जगाला जरूर हालवूं शकतो** ' ह्या **स्वामींच्या** उद्गारांमध्यें ब्रह्मचाऱ्याची वागणूक, ब्रह्मचाऱ्यानें, मग तो कोणत्याही आश्रमांतील असो, त्यानें करावयाचें आत्मसंयमन आणि त्याच्या अंगांत उत्पन्न होणारी शक्ति यांचा उपदेश किती बहारीनें व सूक्ष्म दृष्टीनें **स्वामींनीं** केला आहे हें या उद्गारांचें निरीक्षण केल्याशिवाय ध्यानांत येणें शक्य नाहीं. आपल्या वीर्याचें आध्यात्मिक तेजांमध्यें रूपांतर करून जो मनुष्य आत्मनिष्ठ बनतो, अर्थात् जगांतील कोणत्याही बाह्य सौंदर्यामुळें भुलून जात नाहीं असा मनुष्य सर्व जगाला हालवून सोडतो असाच अर्थ वरील उद्गारांतून निघतो. **आर्किमिडीझ्** ज्या आलंबाचा शोध करीत होता, तो आलंब सदरहू वीर्यानें युक्त असलेल्या वेदान्ती मनुष्याला सहज सांपडतो असें स्वामींचें प्रतिपादन आहे. अशा प्रकारचा वेदान्त पाश्चात्य राष्ट्रांतील कांहीं लोक शिकले आणि याच ज्ञानामुळें, याच सामर्थ्यामुळें, आज त्यांनीं सर्व जगाला थक्क करून सोडिलें आहे–हलविलें आहे. हें पाहून वेदांताच्या उगम स्थानाजवळील लोकांना–भारतीय तरुणांना अवनत स्थितींत पाहून स्वामींना मोठा कळवळा येऊन ' **भरतखंडांतील विद्या** शिकून **परदेशांतील लोक आपली उन्नति करून**

घेत आहेत; आणि आम्हीं भारतवासी कोरेच्या कोरे राहत आहों. केवढी दुःखाची गोष्ट! असे उद्गार त्यांच्या तोंडून निघावे हें वस्तुस्थितीला अगदीं धरून आहे.

अशा रीतीनें ब्रह्मचर्याचा सर्व दृष्टीनें विचार करून आध्यात्मिक वीर्यांत रूपांतरित झालेल्या ब्रह्मचर्याच्या सुखपरिणामाचा विचार डोक्यांत येतांच याच प्रकारच्या ब्रह्मचर्याच्या जोरावर जी योग्यता प्राप्त करून घेतली होती तिचें दिग्दर्शन ते पुढील काव्यांत करितात.

( राग–आनंद भैरवी, ताल–धुमाळी. )

बादशाहा दुन्याके हैं मोहरे मेरे शतरंजके।
दिल लगी की चाल है सब रंग सुलह–ओजंगके॥
रक्से–शांदसि मेरे जबं कांप ऊठती है जमीन्।
देखकर मैं खिलाखिलाता कहकहाता तूं वहीं॥
खुश खड़ा दुन्याकी छत पर हूं तमाशा देखता।
गहबगह* देता लगाहूं, वैह शियाँकीसी सदा॥

भावार्थः—पृथ्वीवरील राजे माझ्या ‘बुद्धिबळां’तील राजे आहेत. तह किंवा लढाई या मौजेच्या चालीं आहेत. माझ्या आनंदतांडवानें जेव्हां जमीन हादरूं लागते, त्यावेळीं तो देखावा पाहून मला खदखदां हंसूं येतें! ( अशा प्रकारें ) जगद्रूपी प्रासादाच्या गच्चीवर “प्रसन्न चित्तानें उभा राहून केव्हां केव्हां खालीं चाललेला मौजेचा खेळ मी पहात बसतों; कधीं कधीं तर जंगली पशूंप्रमाणें नानाविध आवाज काढीत असतों.”

अशा प्रकारची आत्मस्थिति सांगून ते प्रत्येकाला पुढें दिलेला उपदेश करितातः—

१ गालीच्यावरील. २ मन मानेल ती. ३ वर्तणूक. ४ तह किंवा लढाईचे ५ प्रसन्नतेच्या नाचामुळें. ६ जेव्हां. ७ वन्य पशूंच्या. ८ सारखा.

* आवाज.

'मैं खुदा हूं, मैं खुदा हूं, राज[1] जाँमे[2] फूंक दे।
हर-रगो-रेशेमें[3] घुस कर मस्ती-ओ-मुलँ[4] झोंक दे ॥
गैरबीनी,[5] गैर-दानी[6] और गुलामी बंदगी (को)
मार गोले दे धडाधड, एक ही कूँक[7] दे ॥
रौशनीपर[8] कर स्वारी, आँखसे कर नूर-बारी[9]।
हर-दिलो-दीदंमें[10] जा झंडा अलेरु[11] का ठोंक दे ॥

॥ बादशहा दुन्याके ॥

**भावार्थः**—'अहंब्रह्मास्मि' 'अहंब्रह्मास्मि,' हे गुह्य सर्व पृथ्वीवर सोडून दे. आणि प्रत्येक नसेनसेमध्यें निजानंद व ज्ञानामृत ही भरून दे. द्वैतदृष्टी व द्वैतभाव व गुलामी यांना धडाधड गोळे मारून एक मोठा आवाज होऊं दे. बहिर्मुखतेवर स्वारी कर, आणि नेत्रांतून आनंदरूपी प्रकाशाचा वर्षाव करून प्रत्येक अंतःकरणांत परमेश्वराचे निशाण फडकूं दे. हें एवढें दांडगें सामर्थ्य ब्रह्मचर्याचें आध्यात्मिक वीर्यात रूपांतर केल्याविना येईल कां?

अशा प्रकाच्या उपदेशाचें प्रतिबिंब त्यांच्या आचारांत कोणत्या प्रमाणांत सांपडतें तें पाहून हें दर्शन पूर्ण करूं.

सर्व जगाचा आलंब आत्मा हा असून त्यांतच स्वामी स्थिर झाले होते. जगांतील बाह्य दृष्टीचे कोणतेही नखरे त्यांना हालवूं शकले नाहींत, ते मायेच्या जाळयांत बिलकूल सांपडलें नाहींत. म्हणूनच त्यांनीं जगाला हालवून सोडिलें; 'अहं ब्रह्मास्मि' चा त्यांनीं अनुभव घेतला; आणि वेदान्ताची—त्रिकालाबाधित सत्याची, परमेश्वराची ध्वजा त्यांनी हरएक अंतःकरणांत फडकाविली. अशा रीतीनें त्यांनीं उपदेशिलेल्या सर्व गोष्टी आपल्या आचरणांत आणिलेल्या होत्या हें विदितच आहे.

---

१ गुह्य. २ पृथ्वीवर. ३ प्रत्येक नस व स्नायू यांमध्यें. ४ मस्ती (निजानंद) व शराब (ज्ञानामृत.) ५ द्वैतदृष्टी. ६ द्वैतभावना. ७ आवाज ८ झकपक, बहिर्मुखता, तेज. ९ नेत्रांतून आनंदाचा वर्षाव. १० प्रत्येक अंतःकरण व नेत्र. ११ परमेश्वराचा; ब्रह्माचा.

स्वामी विद्यार्थीदशेंत असतांना त्यांनी आपल्या ब्रह्मचर्याचें, वीर्याचें रूपांतर आध्यात्मिक बलांत हलके हलके कसें केलें हें पाहण्याचें शिल्लक राहिलें, याकरितां त्यांच्या स्वदस्तुराच्या पत्रांकडेच वळणें बरें. ब्रह्मचर्याचें आध्यात्मिक बलांत रूपांतर करणे म्हणजे चित्तशुद्धीच्या पायऱ्या क्रमाक्रमाने गांठणें होय. चित्तशुद्धींमध्यें (१) गुरूवर व परमेश्वरावर अचल श्रद्धा (२) दृढनिश्चय (३) शम व दम (४) परमेश्वराची भक्ति (५) सत्संग आणि सद्ग्रंथवाचन इत्यादि गोष्टींचा अंतर्भाव होतो. त्यांचा विकास त्यांनी स्वतःमध्यें कसा कसा करून घेतला याचा स्पष्ट उल्लेख त्यांच्या पत्रांमध्यें पहावयास सांपडतो, तो पाहूं.

## (१) गुरूवर व परमेश्वरावर अढळ श्रद्धा.

'१४ नोव्हेंबर १८८८...............वय सुमारें १५ वर्षे.

श्री सर्वज्ञ विभूजी !

**मी आपल्या चरणीं सर्वस्व अर्पण करितों.**

.....................सेवक तीर्थराम.'

'२८ नोव्हेंबर १८८८. मी आपल्या चरणांवर हें शरीर अर्पण करितों,

...........**आपल्या परवानगी वांचून कांहींही करण्याची माझी इच्छा नाहीं.**

सेवक तीर्थराम.'

'२३ जुलई १८८९

...................**माझें चित्त शुद्ध करा.** कारण **कर्ताहर्ता आपणच** आहां. **माझे वडील आपण,** भाऊही आपण **आणि सर्व संबंधीही आपणच**......मी आपला दास आहें.

**सेवक तीर्थराम.**

अशाच स्वरूपाचीं पुष्कळ पत्रांत वाक्यें आहेत. दिलेल्या उताऱ्यांवरून विद्यार्थीदशेंत असतांपासून ते गुरूच्याठायीं किती अनन्य शरण होते हें

दिसेल. ही गुरुभक्ति स्वरूपसाक्षात्कार झाल्यावरही त्यांच्या ठायीं होती. मात्र या वेळीं ते सर्वत्र आत्मत्वानें पहात असत.

## परमेश्वर श्रद्धा.

' २६ जून १८९०..............................( वय सुमारें १७ )

महाराज.....................मनुष्याच्या प्रयत्नांना ईश्वरीकृपेची आवश्यकता असते....... '

' १२ जुलई १८९०

सुट्टीच्या दिवसांत माझा अभ्यास चांगला व्हावा हीच हे देवा, तुजजवळ प्रार्थना आहे. त्यांत तूं मला यश देशील असा माझा विश्वास आहे.'

सेवक तीर्थराम.

' हे परमात्मन्, माझें मन अभ्यासांत निमग्न राहो. '

' १७ जुलई १८९३

परमेश्वराच्या इच्छेप्रमाणें मी आपले विचार ठरवीन......माझा प्रत्येक श्वासोच्छ्वास परमात्म्याच्या सेवेप्रीत्यर्थ लागेल असें काम मी करीन '

' १० मे १८९४

आपणांस सुख पाहिजे असेल तर सर्व कामें करीत असतांना हें शरीर केवळ परमात्म्याचें आहे असें समजून सर्व व्यवहार केले पाहिजेत.

सेवक तीर्थराम '

रामानें सगुण साक्षात्कार कसा प्राप्त केला याची हकीगत मागें आलेलीच आहे.

## [२] दृढनिश्चय.

' १४ मे १८९०

दृढनिश्चयाच्या तोडीचा या जगांत पदार्थ नाहीं.

‘ २६ जून १८९०

.........कार्यांच्या सिद्धीकरितां मी सतत परिश्रम करीत आहें. पण आपलीही कृपा पाहिजेच. ’

‘ १९ जुलई १८९०...............

......आज परिश्रम करणार नाहीं तर मागाहून परिश्रम करण्यास अवसर केव्हां मिळणार ! ’

सेवक तीर्थराम.

[ ३ ] शमदम.

‘ २९ मे १८८९...................................( वय सुमारे १६ )

हे प्रभो, माझें चित्त शुद्ध कर. ‘तें पापी आहे. तें आवरल्या आवरत नाहीं.’

‘ १६ एप्रिल १८९०

.........ताप आला आहे. तो अतिशय चढला आहे. महेशानें, महेशदासानें पुनः तोंड दाखविलें नाहीं तथापि वाईट वाटूं देत नाहीं.

‘ २६ जून १८९०

उत्तम पुरुष बाह्य सन्मानाला इतकें महत्व देत नाहींत. म्हणून आपलें हें मोठें कार्य करीत असतांना माझें मन सदा शुद्ध आहे.

‘ १९ जुलई १८९०

.........एकाद्या गोष्टीचा चांगुलपणा युक्तिप्रयुक्तींने सिद्ध करणें ही एक स्वतंत्र बाब आहे. पण ‘ सद्सद्विवेक बुद्धी ’ ही कांहीं निराळीच आहे.... ......जी गोष्ट माझ्या सद्सद्विवेक बुद्धीला चांगली वाटेल ती माझ्या कल्याणाच्या दृष्टीनें चांगलीच आहे. म्हणून ती मी करीन...... ........... सामान्य लोकांच्या संसर्गानें चित्त फार दूषित होतें.........अभ्यास हेंच माझें एक ध्येय आहे. ’

‘ २३ मे १८९१

लोक समुदायांत अभ्यास करण्याची मी संवय करणार नाहीं, तर मला प्रत्येक ठिकाणीं मन एकाग्र करितां येणार नाहीं. मागाहून अशा तऱ्हेचा अभ्यास शक्य नाहीं.

सेवक तीर्थराम. ’

याशिवाय शमदम प्राप्तीकरितां गृहस्थाश्रमांत **राम** कसा वागला ह्याचें **चित्र** वाचकापुढें आहेच. त्यांचा उल्लेख **रामानें** ' ११ दिजंबर १८९८ च्या पत्रांत स्पष्ट केला आहे ( पान १८४ गृहस्थाश्रमी राम पहा. )

## ( ४ ) परमेश्वर भक्ति.

यासंबंधानें ( १ ) या मुद्यांत विचार झालाच आहे. शिवाय मागील प्रकरणांतून ( ब्रह्मचर्याश्रम ) सर्व हकीगत दिलेलीच आहे. याकरितां येथें न दिल्यास चालेल.

## ( ५ ) सद्ग्रंथ वाचन व सत्संग इत्यादि.

**स्वामींचें** एम्. ए. पर्यंतचें शिक्षण उर्दूमधून झालें होतें, हें माहितच आहे. ते लहाणपणापासून दीर्घ व्यासंगी होते. यामुळें त्यांनीं प्राथमिक शिक्षण संपतांना **गुलिस्तान व बोस्तन** हे दोन सुरस ग्रंथ पाठ केल्याचे वाचकांना स्मरतच असेल-वयाच्या पंधराव्या वर्षापासून पुढें त्यांनीं जीं पत्रें धन्नाजींना पाठविलीं त्यापैकीं पुष्कळांमध्यें सादी, हाफीज, शम्सतब्रेज, मौलाना रूम, मग्राबी, उमरखायम वगैरे फारशी, सुफी कवींच्या व तत्त्ववेत्यांच्या ग्रंथांतील उतारे दिलेले आढळतात; शिवाय मधून मधून कधीं संस्कृत तर कधीं सुरदास, नानक, कबीर, गुरुगोविंदसिंग, तुलसीदास वगैरे कवींचेही उतारे आढळतात. एकेका विषयावरचीं चार चार पांच पांच पुस्तकें ते वाचीत. कांहीं चांगलीं इंग्रजीं पुस्तकें त्यांना त्यांचे मित्र व अध्यापकही पुरवीत अशाविषयीं त्यांच्या पत्रांत ठिकठिकाणीं उल्लेख आहे. इंग्रजी साहित्यावरील ग्रंथ वाचीत असल्याचा उल्लेख त्यांनीं दोन चार वेळां केला आहे. **पूरणजींनीं** असेंही लिहिलें आहे कीं, ' स्वामी महाविद्यालयांत शिकत असतां उपनिषदांच्या कित्येक आवृत्या त्यांनीं काढिल्या होत्या. ' परंतु याचा स्पष्ट उल्लेख त्यांच्या पत्रांत पहावयास मिळत नाहीं. तथापि ' १८ आगस्ट १८९३ च्या पत्रांत मुख्यतः मी **योगवासिष्ठ** वाचीत असतों ' असें म्हटलें आहे.

७ फेब्रुवारी १८९४ च्या पत्रांत ते लिहितातः—' **सत्संग, उत्तमोत्तम ग्रंथ आणि एकान्तसेवन यांच्या योगानें आत्मस्वरूपाच्या**

**ठिकाणीं निष्ठा उत्पन्न होते; आणि स्वरूपाच्या ठिकाणीं निष्ठा झाल्यानें समस्त संसार आपला दास बनतो.'**

२७ फेब्रुवारी १८९४ च्या पत्रांत 'साधूंची सेवा आणि ग्रंथांचा संग्रह यांकडे होणारा जो खर्च तोच लाभ आहे असें ह्मटलें आहे.

१८ मार्च १८९४ च्या पत्रांत ते लिहितातः—

**'सत्संग, उत्तमोत्तम ग्रंथ आणि भजनकीर्तन ( उपासना ) या तीन गोष्टी मनुष्याला त्रैलोक्याचा राजा बनवितात!'**

६ जून १८९४ च्या पत्रांत ते लिहितातः—

कांहीं दिवसांपूर्वी मींपण **गीता** वाचली होती. अत्यंत उत्तम ग्रंथ आहे. हा ग्रंथ समजून घेऊन वाचला असतां प्रापंचिकांचा आपल्या देहाच्या ठिकाणीं जितका विश्वास बसतो, तितकाच दृढविश्वास परमेश्वराच्या ठिकाणीं उत्पन्न होतो.

वर दिलेल्या सर्व उताऱ्यांवरून **स्वामींची** आचार, विचार व उच्चार या-मध्यें एकवाक्यता होती हें सिद्ध झालें. **स्वामींनीं** याच ब्रह्मचर्याश्रमाचें, विद्यार्थीदशेच्या कालांत एकान्तवासांत राहण्याची संवय करून घेतली होती व त्याचा केवढा फायदा त्यांना झाला याबद्दल ते लिहितातः—

'३१ ऑगस्ट १८९४

येथें एकान्तात असतो; आणि मला जो आनंद वाटतो तो अवर्णनीय आहे. आपण नेहमीं गच्चीवर बसण्याचा क्रम ठेवाल तर आपणांस अत्यंत आनंद प्राप्त होईल........याचा अभ्यास कराल तर आपल्या चित्ताला विशेष प्रसन्नता वाटेल. गच्चीवर बसून 'योगवासिष्ठादि' तात्त्विकग्रंथ वाचल्यास त्यापासून फार फायदा होईल,

**सेवक तीर्थराम.'**

**सारांश, अलमदुनियेला हालवून सोडण्याची जी दिव्य शक्ति स्वामींना प्राप्त झाली होती, तिचा पाया त्यांनीं ब्रह्मचर्याश्रमामध्यें, विद्यार्थीदशेंत, बौद्धिक, मानसिक व नैतिक शिक्षण घेऊन घातला होता हें स्पष्ट दिसतें.**

त्यांच्या त्या कालांत मानसिक व नैतिक शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविलें जात नसे. तथापि स्वामींनीं तसें शिक्षण घेतलें होतें. यावरून भविष्यत्कालांतील करावयाच्या कार्याची त्यांना पूर्ण जाणीव होती असें स्पष्ट दिसतें. या कालांत स्वामींकडून जर कसली हयगय झाली असेल तर ती शारीरिक शिक्षणाची होय. त्याचा भयंकर परिणाम त्यांना सोसावा लागला हें आपण मागें पाहिलें आहे. याकरितां त्यांचें दुसरें दर्शन घेऊं.

## ( आ ) गृहस्थाश्रमी राम.

### ( १ ) अनासक्ति.

स्वामी वानप्रस्थाश्रम स्वीकारीपर्यंत ( इ. स. १९०० ) गृहस्थाश्रमी होते. तथापि हा गृहस्थाश्रम निव्वळ शाब्दिक होता. कारण गृहस्थांच्या ठिकाणीं प्रायः दिसून येणाऱ्या हव्यासाचा व संग्रहाचा त्यांच्या ठिकाणीं पूर्ण अभाव होता. ते ५ जून १८९९ च्या पत्रांत म्हणतातः—

'द्रव्यसंग्रह हें सुखाचे साधन आहे, अशी समजूत नाहीं. तसेंच दागिने करण्याचा अगर अन्य कोणत्याही सांसारिक वस्तूंचा संग्रह करण्याचा विचार माझ्या डोक्यांत उद्भवत नाहीं. .........भिकाऱ्याप्रमाणें राहण्याची आपण आज्ञा कराल तर या सर्वांचा त्याग करून साधूंप्रमाणें राहण्याला माझी तयारी आहे. महाविद्यालयांत काम करण्याबद्दल मिळणारा मोबदला आपल्या मर्जीप्रमाणें खर्च करा. या दीन सेवकाला कर्म करीत रहाण्यांत व परमेश्वराचें अखंड अनुसंधान ठेवण्यांत इतकें सुख वाटतें कीं, त्याला ब्रह्मविषयापासून प्राप्त होणारें सुख, अवडंबर व थाटमाट यांची कांहींच आवश्यकता वाटत नाहीं. ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करण्यांत मला सुख वाटतें.............सांसारिक पदार्थांच्या संग्रहानें माझा आत्मा मोठा होत नाहीं; किंवा त्यांच्या कमतरतेमुळें तो लहानही होत नाहीं; तो सर्वदा आनंदरूप आहे.'

स्वामींच्या ठिकाणची ही त्यागबुद्धी लहानपणींही दिसून येते. किंबहुना ते जन्मतःच त्यागी, विरागी होते. महाविद्यालयाच्या मुख्य अध्यापकांनीं तीस रुपये

दिले तेव्हां त्यांना पैशांची अडचण असूनही अर्धे पैसे विद्यालयाकडे खर्च करण्यास त्यांनीं सांगितलें ! पुनः एकदां **गिल्बर्टसन** साहेबांनीं तीस रुपयांचें गुप्त दान दिलें, तेव्हांही इतके रुपये नकोत असें सांगितलें. पण साहेब मजकुरांनीं **रामाचें** ह्मणणें ऐकिलें नाहीं. तेव्हां रामानें धन्नाजीनां रुपये नेण्याविषयीं विनविलें. पैसा जवळ नसल्यामुळें त्यांना वाईट न वाटतां उलट बोजा हलका झाल्यासारखें वाटे. २१ मार्च १८९३ च्या पत्रांत ते लिहितातः— ' महाराजजी ! मला साठ रुपयांची छात्रवृत्ती मिळाली, तर पहिल्या तीन महिन्यांची आपणांकरितां घ्या. '

या सर्व वर्णनावरून स्वामींच्या ठिकाणीं लहानपणापासूनच औदार्य, त्यागबुद्धि, प्रेमळपणा व सरळपणा ह्यांची वाढ कशी झाली होती हे दिसून येतें.

ही त्यागबुद्धि व संसारविमुखता वाढत जाऊन अखेरीस कोणत्या थराला पोंचली हें वाचकवर्गाला माहितच आहे ( पहा गृहस्थाश्रम ).

सारांश या त्यागबुद्धीचें, संन्यासवृत्तीचे त्यांच्या ठिकाणी जन्मतःच असणारें बीज ब्रह्मचर्याश्रमांत वाढीला लागलें होते. परीक्षेचा अभ्यास करूनही व परीक्षेच्या सत्रांतून मोकळें झाल्यावर ते सर्व काळ अध्यात्मिकग्रंथांच्या वाचनांत गढून गेलेले असत. अर्थात्च या त्यांच्या इतक्या वर्षांच्या अध्ययनाचें फळ ' परमेश्वरप्राप्तीकरितां तपोवनांत जावें ' या मनांत उठलेल्या तरंगाच्या रूपानें दृग्गोचर झालें; व त्याचें पर्यवसान विद्वत्संन्यासांत झालें हें आपणांस माहितच आहे. आणि हें ध्येयही त्यांनीं लौकिकदृष्ट्या वयाच्या १९ व्या वर्षीं ठरवून जाहीर केलें होतें. एम्. ए. पास झाल्यावर काय करणार ! असा अध्यापकांनीं प्रश्न विचारतांच या बालसंन्यासानें ताबडतोब उत्तर दिलें.

' १७ जुलै १८९३.

**.........माझी कांहीं इच्छा असलीच, तर ती अशा प्रकारें काम करण्याची आहे कीं जेणेंकरून माझा प्रत्येक श्वासोच्छ्वास परमात्म्याच्या सेवेप्रीत्यर्थ मला लावितां येईल. लोकांची सेवा केल्यानेंच परमात्म्याची सेवा घडते.** ' हें विद्यार्थ्याचें ध्येय सर्वांनी मनन करण्याजोगें आहे.

## समाधानवृत्ति.

एवंच त्यागबुद्धि वा अनासक्तता हा असाधारण गुण गृहस्थाश्रमी रामांत दिसतो. अशा अनासक्तेची जोपासना लहानपणापासून झाल्यामुळें मनुष्याला सदा सर्वदा आवश्यक असणारी विशेषतः गृहस्थाश्रमांत अत्यंत जरूर असलेली समाधानीवृत्ति स्वामींच्या ठिकाणीं प्रामुख्यानें दिसत होती हें त्यांच्या ११ दिजंबर १८९८ च्या पत्रावरून दिसतें. या काळांत ते गृहस्थाश्रमांतच असून उदरनिर्वाहाकरितां दोन तासांची महाविद्यालयांतील नौकरीवर होते. यावेळीं स्वामी हे एक नावाजलेले 'प्रोफेसर' समजले जात असत, ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे. त्या पत्रांत ते लिहितातः—

'पत्र लिहिण्यास विलंब झाला याचें कारण, पत्र लिहिण्यास कागद किंवा लिफाफा माझ्यापाशीं नव्हता हें होय. तसेंच विकत घेण्यास पैसेही शिल्लक नव्हते.......कणीक, तूप वगैरे खाण्यापिण्याच्या पदार्थासंबंधानें जवळजवळ हीच स्थिति आहे. आज दिव्यांत तेल नाहीं त्यामुळें रात्रौ घरीं राहतां येणार नाहीं.........दोन्ही स्थितींत सारखाच आनंद आहे.

ह्या बाह्य स्थितीवरून असें समजूं नका कीं, हाय! हाय! **राम** अत्यंत निर्धन व दुःखी आहे. पैशाची टंचाई असली, बाह्यतः अगदीं दारिद्रय असलें, तथापि तो संपूर्ण अमीरी व बादशाही भोगीत आहे......'

केवढी ही समाधानी वृत्ति! अंगांत धमक असून सुद्धां लक्ष्मीच्यामागें न भ्रमतां आत्मोन्नति हें ध्येय साधण्याकरितां येतील तसे दिवस काढणें ही गोष्ट असामान्य नव्हे काय! ही अशी रहाणी अंगवळणी पडावी याची तयारीसुद्धां स्वामींनीं पूर्वाश्रमांतच केलेली होती. कारण साधे कपडेलत्ते वापरणें, ते घरींच धुणें, व शिवविणें, कधीं चैन न करणें वगैरे प्रकारची साधी रहाणी विद्यार्थीदशेंतच लागली ती शेवटपर्यंत कायमच राहिली. सारांश **'राहणी भिकाऱ्याची व विचारणा जगाची' या तत्वाचा उत्तम आदर्श स्वामींमध्यें पहावयास मिळतो.**

याप्रमाणें अनासक्त व समाधानी वृत्ति आणि साधी रहाणी या त्रिपुटीच्या भक्कम पायावर आपल्या आयुष्याची उभारणी केली असल्यामुळें त्यांना आयु-

च्यांतील एक महत्वाचा भाग—गृहस्थाश्रम अखिलभारतवासीयांना, आधुनिक काळांतील परावलंबी व बहिर्मुख भारतवासी यांना, आदर्शवत् बनवून दाखवितां आला. पतिपत्नीसंबंध कसा असावा, वैवाहिक स्थितीचें ध्येय काय असावें, आणि तें ध्येय कसें साध्य करावें या संबंधाचें स्वामींचें अगदीं व्यावहारिक विचार खोल व भारदस्त वाटतात. याचे कारण तें निव्वळ आनुमानिक अगर तात्त्विकही नसून व्यावहारिक अनुभवानें युक्त आहेत.

वैवाहिक स्थितीचें ध्येय ठरवितांना ते म्हणाले ' परमात्म्याची मूर्ति—ईश्वराची प्रतिमा या दृष्टीनें पत्नीनें पतीकडे व पतीनें पत्नीकडे पाहावें '' ज्या स्त्रिशी आपण विवाह केला तीमध्यें आपला आत्मा पाहण्यास शिकलें पाहिजे. ' हें ध्येय साध्य करण्याकरितां स्वामींनीं पुढे दिलेला व स्वतः अनुभविलेला मार्ग सुचविला. **'बायकामुलांच्या ठिकाणीं आपल्या प्रेमाची परिसमाप्ति न करितां, सर्व जगाला व्यापून रहाणाऱ्या आपल्या प्रेमाचा बायकामुलांना मध्यबिंदु करा'** आपल्याला चष्म्यांतून सर्व वस्तु दिसतात. परंतु जसा चष्मा हा दृष्टीला प्रतिबंधक होत नसून दृश्य वस्तूंना प्रकाशित करण्याला सहाय्यकारक होतो, तसा पति व पत्नी यांच्यामधील संबंध असावा. आपल्या जिवलग स्नेह्याकडून आपल्याला एकादे पत्र आलें म्हणजे तें पत्र पाहून आपल्याला आनंद वाटतो. मित्रावरील आपल्या प्रेमामुळे त्याच्या पत्राबद्दल आपल्याला हा हर्ष होतो. या न्यायानें पति व पत्नी यांनीं एकमेकांना ईश्वराकडील पत्राप्रमाणे मानिलें पाहिजे. पतीचा देह हे ईश्वराकडील एक पत्र किंवा चित्र आहे असें पत्नीला वाटलें पाहिजे. रात्रीच्या वेळीं दोघांचीं शरिरें संयोग पावत असतील तर पावोत; पण दिवसा स्त्रीनें परमात्म्याशीं तादात्म्य पावण्यांत--ईश्वरचिंतन–नामस्मरण करण्यांत आपला काळ घालविला पाहिजे. रतिसुखाचे वेळीं भगवंताचें स्मरण होत नसल्यास ईश्वराचें नामस्मरण करण्याचा दिवसां अभ्यास ठेववा. पतिपत्नींनीं एकमेकांना आलिंगन देण्याच्या प्रत्येक वेळीं आपण परमात्म्याला भेटत आहों अशी कल्पना प्रत्येकाच्या मनापुढें उभी राहिली पाहिजे. जड शरीराच्या संयोगाच्या विचाराला

**आपण अजीबात फांटा दिला पाहिजे. आणि परमात्म्यापाशीं सतत एकतानवृत्तीनें रहाण्याचा आपण अभ्यास केला पाहिजे.**

स्वामी त्यानीं केलेल्या उपदेशाबरहुकूम वागत असल्याबद्दल त्यांनीं स्वतःच एका व्याख्यानांत सांगितलें आहे. पत्नीच्या वागणूकीसबंधानें ते म्हणाले ' **राम** ' ध्यानस्थ असतांना त्याची अर्धांगी त्याच्या समोर बसून त्याच्या मुखकमलाकडे पहात ध्यानस्थ होई. स्वामींच्या पत्नीनें त्यांना एकदां असा प्रश्न केला कीं, ' आपल्याला माझें कधीं स्मरण होतें का !' त्यावर स्वामींनीं उत्तर दिलें 'छे! राम कधींही स्मरण करीत नाहीं. आपणांपेक्षां निराळा कोणी मनुष्य असूं शकेल तरच त्याचें स्मरण होऊं शकतें.'

अशा प्रकारच्या आचरणानें पत्नीची उन्नति करणारा पति असल्यावर पत्नी तरी कशी मागें राहील !

सारांश, पाश्चात्यांच्या संसर्गानें व त्यांच्या चालीरीतींच्या अंधानुकरणानें आमच्या आश्रम संस्थांना नांवें ठेवणाऱ्यांना, जीवनशास्त्र ' ' प्रजाजननशास्त्र ' इत्यादि शास्त्रांचा स्वतःच्या दृष्टीनें पूर्ण विचार न करितां आमच्या गृहस्थाश्रमांतील विधिविधानांना खुळेपणाचे आचार समजून भारतीय विवाह पद्धतीचें पाश्चात्यस्वरूपाच्या विवाहपद्धतींत रूपांतर करूं पाहणाऱ्या समाजसुधारकांना, आणि ' यत्रनार्यस्तु पूज्यंते ' चें अवडंबर माजविणाऱ्या बहिरंगी सुधारकांना, बहिर्मुखता वाढविणाऱ्या सुधारणा थांबवून अंतर्मुखता वृद्धिंगत होईल अशा सुधारणा करण्याला किती उत्तम व अनुकरणीय असें वैवाहिक स्थितीचें उदाहरण स्वामींनीं घालून दिलें आहे बरें ! किंबहुना स्वामींचें हें दर्शन जगांतील वाढत्या कामुकतेला, पाशवी वृत्तीला, आळा घालून गृहस्थाश्रमाचें, विवाहसंस्थेचें खरें आर्यस्वरूप जगाच्या निदर्शनास आणून तें प्राप्त करून देण्यास कारणीभूत होईल अशी आशा आहे.

## ( ३ ) संन्यासी राम.

आद्य शंकराचार्य किंवा समर्थ स्वामीरामदास यांनीं त्यांच्या कालाला अनुरूप असें संन्यासाचें उत्तम उदाहरण स्वाचरणानें घालून जें महत्वाचें कार्य केलें तितकेंच महत्वाचें कार्य ' संन्यासी रामानें ' केलें. निष्फळ कर्मकांडाचें

वाढतें प्रस्थ समाजधारणेला कुचकामाचें असून त्यामुळें वैदिक धर्माला जबरदस्त धक्का बसला म्हणून झालेलें नुकसान भरून काढणें व धर्मांची विस्कळीत घडी पुनः व्यवस्थेनें ठेवणें हें कार्य करण्यासाठीं आद्य शंकराचार्य अवतरले होते. त्याचप्रमाणें 'स्वामींची संन्यास भूमिका' फारच महत्वाची आहे. हें कसें तें आपण पाहूं.

प्रत्येक राष्ट्राच्या जीवनाचा एक विशिष्ट हेतु असतो. भरतभूमीचा अध्यात्मिकता हा विशेष आहे. अध्यात्मिकता हेंच आपलें ध्येय आहे. आणि तोच आपल्या राष्ट्रीय जीवनाचा हेतु आहे. एवंच अध्यात्म हेंच आपलें मन्तव्य व प्राप्तव्य आहे. या ध्येयाला अनुसरूनच स्वामींनीं पुढील जोरदार उपदेश केला. 'उन्नत म्हणून समजलीं गेलेलीं युरोपांतील आणि अमेरिकेंतील राष्ट्रें वास्तविक पुढे गेलेलीं नसून फक्त र्‍हासाच्या मार्गांत पुढें पुढे पावलें टाकित आहेत. उन्नति ही आध्यात्मिक किंवा बौद्धिक असली पाहिजे. **उन्नतीचा ओघ मनुष्याला अध्यात्माकडे नेणारा असला पाहिजे**, आपल्या मिथ्या **शरिराची सुखवृद्धि करण्याकडे तो असतां कामा** नये. **भौतिक संपत्ति जमविणें किंवा अनवश्यक गरजा वाढविणें ही निःसंशय प्रगति नव्हे.** विद्याचार संपन्न जगाच्या थाटमाटानें, लखलखाटानें, कृत्रिमपणानें बाह्योपचारानें आणि द्रव्यार्जनाच्या हव्यासानें दिपून जाऊं नका. हीं सर्व फोल आहेत, असें अनुभवानें ठरलें आहे. मुशींत घालून त्यांचे सत्व पाहिलें गेलें आहे. पण तीं कसोटीला उतरलीं नाहीत.—सत्याचें अन्वेषण करणारांनो ! प्रागतिक म्हणून समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांच्या थाटमाटानें आणि दिखाऊ अवडंबरानें मोहून जाऊं नका. या विसाव्या शतकांत असा काळ लौकरच येणार आहे कीं, त्यावेळीं आजच्या प्रागतिक राष्ट्रांना आपली राज्यव्यवस्था आणि लोकांची रहाणी बदलून तिला वेदान्ताच्या तत्वांप्रमाणें नवीन आकार आणि नवीन स्वरूप द्यावें लागेल.'

जगाच्या सूक्ष्म निरीक्षणानें भौतिकशास्त्रांचा उपयोग ज्या पद्धतीनें व ज्या कार्याकडे होत होता त्याच्या निरीक्षणानें, सुधारलेल्या म्हणून टेंभा मिरविणाऱ्या राष्ट्रांच्या रहाणीच्या सूक्ष्म विचारानें, आणि जगांतील भिन्न

भिन्न समाजांच्या बौद्धिक व मानसिक विकासाच्या विचारानें, जगांत भोगेच्छा, संग्राहक वृत्ति, आसक्ति, अनवश्यक गरजांची वाढ करण्याची प्रवृत्ति इत्यादि गुणांची ( ! ) वृद्धि झपाट्यानें होत असून ' त्यक्तेन भुंजीथाः ' ही वृत्ति पार मावळून जात चालली आहे ही गोष्ट **स्वामींच्या** पक्की लक्षांत आली होती. यामुळे ह्या प्रवृत्तीची वाढ खुंटवून संन्यासवृत्तींचा प्रारंभ जगानें करावा अशी त्यांची इच्छा असावी असे त्यांच्या पुढील पत्रावरून दिसतें. ते ह्मणतातः—

' १३ दिजंबर १८९७

**सर्वांनाच संन्यास उचित नाहीं** हें खरें, पण जगांत संन्यासाचा **अगदीं लोप व्हावा हेंही योग्य नाहीं.** "

शिवाय स्वामी जो ' चैतध्यमठ ' स्थापणार होते, त्याची जी रूपरेषा स्वामींनीं आंखिली होती, त्यांत ते ह्मणतातः—

' **या मठांत केवळ धार्मिक दृष्टीनें भौतिक शास्त्रांचा अभ्यास करण्यांत येईल** भौतिक शास्त्रें, कला व इतर उघड उघड व्यवहारोपयोगी हुन्नर, यांचा वेदान्ताकडे उपयोग करण्याच्या दृष्टीनें, वेदान्त प्रत्यक्ष व्यवहारांत कसा आणावा याच दृष्टीनें अभ्यास करण्यांत येईल.'

यावरून संन्यास हें स्वामींचें ध्येय होतें, संन्यासवृत्तीचा जगांत फैलाव करणें हें त्यांचें उद्दिष्ट कार्य होते, असें सिद्ध झाले. यानंतर स्वामींची ' संन्यास भूमिका ' आर्यांच्या विसाव्या शतकांतील संन्यासाचें किती उत्कृष्ट उदाहरण आहे ह्या विषयीं विचार करूं.

भारतवर्षात सुमारें बावन लक्ष साधु आहेत. त्या सर्वांना स्वामींची संन्यासाश्रमांतील रहाणी ही संन्यासाचा उत्तम नमुना व कित्ता होता. त्यांच्या आचाराचा विचार करून पहातां निव्वळ निष्क्रियता, समाजापासून दूर रहाणें, शरीराला कष्ट देणें ह्मणजे ' **संन्यास** ' ही भावना घर करून बसली आहे असें वाटतें. परंतु **स्वामी**, वरील विचारांच्या पलीकडे गेले होते. त्यांच्या ' संन्यासा ' बद्दलच्या कल्पना कितीतरी पुढें गेलेल्या होत्या. ते समाजांत

वावरले, त्यांनीं परदेशगमन केलें, लेखन, भाषण व उपदेश हीं कार्यें त्यांनीं आमरण केलीं. मांसाहार, वैवाहिक स्थिति यांसारख्या विषयांवर विचार करून आपलीं मतें बनविलीं, विसाव्या शतकांतील मानवी जीविताच्या सामान्य व्यवहाराशीं वेदान्ताची सांगड घालून **व्यावहारिक वेदान्त** ह्मणजे काय हें स्वाचरणानें शिकविले. व अर्वाचीन भारतवर्षाला उपयुक्त व आवश्यक अशा साध्या व मिताहारी वागणुकीचा नमुना पुढें ठेवून तद्वारें राष्ट्राच्या आर्थिक यशःप्राप्तीची गुरुकिल्ली दाखविली. भौतिक आसक्तीचे, मायेचे, संसाराचे पाश ताडकन् तोडून वास्तविक स्वातंत्र्य प्राप्तीची स्वामी हे प्रत्यक्ष मूर्ति होते. स्वामींनी उद्योग आणि खरें अकृत्रिम कार्य यांचें महत्व वाढविले. तसेंच जन्मभूमिबद्दलच्या कर्तव्याचा जो बोजा प्रत्येक व्यक्तीला उठवावयाचा असतो त्याहीपेक्षां अधिक महत्वाचा बोजा आपल्यास माता, भगिनी व स्त्रिया यांच्या उन्नतिसंबंधाचा आहे ही गोष्ट त्यांनीं जोरानें प्रतिपादिली. सारांश, स्वामींच्या **संन्यास भूमिकेचें** रहस्य थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास **लोकमान्यांच्या** ' कर्मयोग ' या शब्दानें उत्कृष्टपणानें सांगतां येतें. अशा या कट्टया कर्मयोगी संन्याशाच्या आचरणाचा कित्ता बावन लक्ष संन्याशांपैकीं जरी थोड्यांनींच गिरविला तर भारतवर्षाच्या स्थितींत आणि जीवितांत केवढी क्रांति घडून येईल बरें ? भरतभूमीच्या उद्धार कार्यांत ते केवढी प्रमुख व महत्वाची कामगिरी करतील बरें ! याच दृष्टीनें कांहीं तरुण व उत्साही संन्याशी साधूंनीं स्वधर्मसंरक्षक पथकें उभारून त्यांना आपल्या मनाप्रमाणें शिक्षण देऊन त्यांच्या हातून **भारतोद्धार** करविण्याचाही स्वामींचा विचार होता. परंतु आपल्या दुर्दैवानें त्यांचें अल्पायुषित्व आड आलें ! तथापि अशा प्रकारची चळवळ **स्वामींचे** पट्टशिष्य श्री. नारायणस्वामी हे करीत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. भारतवर्षाच्या सुदैवानें स्वामींनीं प्रतिपादिलेलें संन्यासाचें ध्येय पसंत असणाऱ्या कांहीं कर्तृत्ववान् व्यक्ती येथें आहेत पण त्यांच्या बरोबर त्या ध्येयाला ' हिंदुस्थान ह्याच ध्येयाच्या पायीं गमावलें ' असें ह्मणून विरोध करणाऱ्या; निदान त्या ध्येयाकडे नाकें मुरडणाऱ्या व्यक्ती आहेत. अशा लोकांकरितां स्वामींचा खास उपदेश आहे. त्याचा या राष्ट्रीय आंदोलनाच्या वेळीं त्यांनीं विचार करावा अशी विनंती आहे.

' अवडंबराच्या प्रिय भक्तानों! तुम्हांला आर्यांचें, संन्यासाचें, त्यागाचें ध्येय केवळ मनोराज्यासारखें निरर्थक आणि अव्यवहार्य वाटत आहे; पण बाबानों! सावध रहा. तुम्ही स्वप्नांत, भ्रमांत आहां; तुम्हांला झोंपेंतून हालवून जागे करून खरी स्थिति तुमच्या प्रत्ययास आणून देण्याचा काल अगदीं जवळ आला आहे. असें करण्याला आतांच योग्य काल आहे. आत्मज्ञानाच्या योगानें, आत्म्यासंबंधानें प्रेम वाटणें व त्यामुळें भ्रामक शरीरासंबंधानें वैराग्य असणें हे प्रेमयुक्त वैराग्य आहे; व असलें वैराग्य सध्यांच्या विद्याचारसंपन्न मनुष्यांत बिलकुल नसल्यामुळें हीं विद्याचारसंपन्न माणसें म्हणजे अधिक अनुभवी व अधिक शहाणीं अशीं जंगलीं माणसेच होत असें म्हणण्यास हरकत नाहीं!'' *

## ( ई ) देशभक्त राम.

ज्या देशांत जन्मलों त्यावरील जें प्रेम त्याचेंच नांव देशभक्ति. देशभक्ति ही जन्मसिद्ध भावना आहे. स्वामींचीं व्याख्यानें व विशेषतः 'राष्ट्रीयधर्म' 'सुशिक्षित जगाला आर्यभूचें आध्यात्मिक ऋण' आणि 'भारताच्या वतीनें अमेरिकेस विज्ञप्ति' व कांहीं कविता हीं लक्षपूर्वक वाचलीं म्हणजे मातृभूमीसंबंधाचें प्रेम त्यांच्या अंतःकरणांत किती ओतःप्रोत भरलेले होतें, तसेंच देशभक्तीची कल्पना किती व्यापक स्वरूपाची होती याची चांगली साक्ष पटते. आपला देश संपन्न असावा; त्याची निकृष्टदशा नाहींशी होऊन तो उन्नत व्हावा; आपले देशबांधव नेहमीं सुस्थितींत रहावे; ऐहिक वैभवाच्या आणि उत्कर्षाच्या बाबतींत आपल्या मातृभूमिला इतर राष्ट्रांपुढें मान वांकविण्याचा केव्हांही प्रसंग न यावा, इत्यादि कल्पना सामान्य देशभक्तीच्या द्योतक आहेत. परंतु स्वामींच्या देशभक्तीच्या कल्पना असामान्य आहेत. आर्वाचीन काळांत Nationalism

---

* आर्यांच्या संन्यास-त्यागध्येयाचा थोडक्या प्रमाणानें अप्रत्यक्ष रीतीनें अगर प्रत्यक्षपणें पुरस्कार करणारे किडन्स्, एच्. जी. वेल्स, वूड्रॉफ्, सी. एफ अँड्रूज वगैरे युरोपिअन गृहस्थही आहेत. त्यांच्या म्हणण्याकडे त्या लोकांनीं लक्ष द्यावें.

या गॉडस नांवाच्या आधारावर पश्चिमेकडील सर्व राष्ट्रं उदयास आलीं. आणि याच संकुचित भावनेची छाप जगावर पडत आहे ती अनिष्ट आहे. कारण त्यांत आत्मोद्धार व राष्ट्रोद्धार करणाऱ्या सद्गुणांचा अभाव आहे हें त्यांना पक्कें कळले होतें. म्हणून याच भावनेच्या मुशींतून आपल्या मातृभूमिची उन्नति व्हावी हें स्वामींना इष्ट वाटेना. कारण " **प्रेम व स्वतंत्रता हेंच राष्ट्रोन्नतीचें बीज आहे. व्यावहारिक वेदान्त हेंच प्रत्येक राष्ट्राचें जीवनतत्व आहे आणि प्रेम, न्याय आणि स्वतंत्रता या भावनांचा परिपोष म्हणजेच व्यावहारिक वेदान्त होय.**" ही त्यांची राष्ट्रोन्नतीची कल्पना. तसेंच भरतखंड हें प्राचीन ऋषींचें निवासस्थान आहे, विविध शास्त्रांच्या व अध्यात्माच्या सिद्धांतांचा उगम ज्या पूज्यतम आर्यांच्या हृदयांतून झाला त्यांच्या पादस्पर्शानें ही भूमि पवित्र झालेली आहे; ज्या प्राचीन आर्यांच्या वंशजांनीं वेदान्त तत्वज्ञानाची परंपरा, आज हजारों वर्षें कायम टिकविली, ज्यांनीं त्या उच्चतम ज्ञानाचें संगोपन व संवर्धन करून त्याचें पान वेळोवेळीं उदार मनानें जगांतील सर्व लोकांना करविलें अशा आर्यांची भरतखंड ही मातृभूमि आहे; भरतखंडाच्या कोनाकोपऱ्यांतही पूर्वेतिहासाचें व आर्यांच्या पूर्व परंपरेचें दिव्यतेज पसरलें आहे.

भरतखंडांतील प्रत्येक पर्वत व प्रत्येक नदी यांच्या भोंवतीं आर्यांच्या प्राचीन उज्वल इतिहासाचे व ऋषींच्या दिव्य ज्ञानाचे प्रतिध्वनी उमटलेले आहेत, सारांश '**भरतखंड हे वेदान्त तत्वज्ञानाचें माहेरघर आहे, ही पवित्रभूमी वेदांना जन्म देणारी आहे.**' या दृष्टीनें स्वामींच्या ठिकाणची स्वदेशप्रीति उत्पन्न झालेली आहे. शिवाय '**हें अखिल विश्व रामाचें आहे.**' 'या जगरूपी विराटदेहाचें अमेरिका हें मस्तक असून हिंदुस्तान हे पाय आहेत. या पायांची हेळसांड करूं नका. या पायांत पेटके येत असतील, ते लुळे पडतील तर तुम्ही कोलमडून पडाल.' या करितां

भरतखंडाची उन्नती होणें अत्यवश्यक आहे असें स्वामींना वाटे. यामुळें साहजिकच ते त्यावर प्रेम व भक्ति करीत. ही स्वदेशभक्ति असामान्य, व अद्वितीय स्वरूपाची नव्हे असे कोण ह्मणेल ? आणि इतक्या व्यापक स्वरूपाची ती होती हेच त्यांच्या विभूतिमताला शोभेसें होतें.

आजन्म अध्यात्मज्ञानाचे परिशीलन करण्यांत, दृढ अभ्यासानें तें ज्ञान अंगीं मुरवून घेण्यास आणि तें ज्ञान सर्वांना कळकळीनें सांगण्यांत स्वामींनीं आपलें आयुष्य खर्ची घातलें. यामुळे ऐहिक सुखाकरितां सुखसाधनांच्या उपयोगाखालीं व विषयोपभोगाकरितां वैभव व ऐश्वर्य ही त्यांच्या स्वदेशभक्तीची कल्पना नव्हती. ' **त्याग हेंच भरतखंडाचें ध्येय आहे.**' याच तत्वामुळें हिंदुस्थान अनेक राष्ट्रीय संकटांतून व आपत्तींमधून वांचलें आहे. ह्याच तत्वाचा धडा भरतखंडाने जगाला घालून दिला आहे. याकरितां जगाच्या सुधारणेच्या व संस्कृतीच्या दृष्टीने भरतखंड 'राष्ट्र' या नात्यानें जगणें अवश्य आहे. किंबहुना त्याला जगविण्याला इतर राष्ट्रानीं हातभार लावणें हें त्यांचें कर्तव्य आहे. इतक्या व्यापक दृष्टीनें स्वामींनीं भारतोद्धाराचे विचार अहोरात्र केले. आणि त्यांना जे विचार सुचले ते संकुचित दृष्टीला परके असें वाटणाऱ्या 'अमेरिकन' लोकांपुढेंही मांडिले. वास्तविक अध्यात्मज्ञान अंगांत बाणल्यामुळें 'अमका देश माझा व तमका माझा नाहीं' ही संकुचित भावना स्वामींच्या ठिकाणीं शिल्लकच राहिली नव्हती. त्यांना हें विश्वच आपलें घर आहे असें वाटे. यास्तव त्यांनीं भरतखंडांतील सद्गुणांचें व मागाहून बांडगुळाप्रमाणें जडलेल्या दुर्गुणांचें उघडे चित्र जसें भारतीय आर्यांपुढे रेखाटलें तसें पश्चिमेकडील आर्यांच्या वंशजापुढें रेखाटिलें.

## देशस्थितीचें सूक्ष्मावलोकन.

हिंदुस्तानांतील अवनतीच्या कारणांची मीमांसा करीत असतांना राष्ट्रांतील परिस्थितीचें निरीक्षण किती सूक्ष्म प्रमाणानें केलें हें पुढील कवितेवरून दिसेल.

समय कैसा यह आया है (टेक)

न यारोंसें रही यारी, न भाइयोंसे वफादारी।
मुहब्बत ऊठगई सारी, समय कैसा० ॥ १ ॥
जिधर देखो भरी कुलफत, भुलादी सबने है उल्फत।
बुरी सोहबत, बुरी संगत, समय कैसा० ॥ २ ॥
सभायेंकी बहुत ज़ारी बने खुद उनके अधिकारी।
न छोडे कर्म व्यभिचारी समय कैसा० ॥ ३ ॥
बहुत उमदा कहे लेक्चर, मगर उलटा चले उनपर।
अकलपर पड गये पत्थर, समय कैसा० ॥ ४ ॥
सचांईको छुपाते है, दिल औरोंका दुखाते है।
वृथा सांच कहाते हैं, समय कैसा० ॥ ५ ॥
नहीं व्यवहारकी शुद्धि, विपर्यय हो रही बुद्धि।
विचारें सत् नहीं कुछभी, समय कैसा० ॥ ६ ॥
घटा है पापकी छांई, उपद्रव होवें हर जांई।
है एकको एक दुखदायी, समय कैसा० ॥ ७ ॥
न जाने देशके वासी, बने कब सत्य विश्वासी।
मिटे अब कैसे उदासी, समय कैसा० ॥ ८ ॥

**भावार्थः**—कशी वेळ आली आहे पहा. मित्रांमध्यें मित्रता राहिली नाहीं, भावाभावांत बंधुता राहिली नाहीं, प्रेम पार गेलें, जिकडे पहावें तिकडे द्वेषाचा सुकाळ व प्रेमाचा दुष्काळ, सर्वत्र दुर्जनांचा संग, सभांचें बंड माजलें आहे. जो तो त्यांवर अधिकार गाजवूं पहात आहे, अद्यापि व्यभिचार सुटला नाहीं,

---

१ मित्र. २ मित्रता. ३ भ्रातृभाव. ४ प्रेम. ५ जिकडे. ६ द्वेष. ७ प्रेम. ८ वाईट. ९ प्रसार. १० व्याख्यान. ११ परंतु १२ खरेपणाला. १३ दुसऱ्याची. १४ सत्पुरुष. १५ छाया. १६ होत आहेत. १७ ठिकाणीं.

उत्तम उत्तम व्याख्यानावर झोड चाललेली आहे; पण वर्तणूक मात्र अगदीं उलट चालली आहे. ( हें पाहून ) असें वाटतें कीं, सर्वांच्या अकला मंद झाल्या, व सर्व विवेकहीन झाले आहेत. खरेपणाला दडपून टाकण्यांत येत आहे, परपीडन चाललें आहे, असें असून सच्चेपणाचा टेंभा मिरविण्यांत येत आहे. ( जिकडे पहावें तिकडे ) व्यवहारांत शुद्धता राहिली नसून, बुद्धि विपरीत होत आहे. यामुळें सद्विचाराचें नांवही नाहीं. सर्वत्र पापाची छाया पसरत आहे, प्रत्येक ठिकाणीं उपद्रव जारी आहे, एकमेक एकमेकांला दुःख देण्याला कारणीभूत झाले आहेत ! ( अशी स्थिती पाहून देशबंधु सन्मार्गगामी व विश्वासु कधीं बनतील आणि ही सर्वत्र पसरलेली उदासीनता कधीं नाहींशी होईल याचा अंदाजच बांधितां येत नाहीं !

## देशस्थिति.

( शा. वि. )

मैत्री मित्रजनीं नसेचि उरली बंधूंमध्यें बंधुता ।
द्वेषातें भरतें असेंचि चढलें ओहोट प्रेमा अतां ॥
दुष्टांच्या मतिच्या कळ्या उगवुनी येई तयांतें भर ।
घाणेरी फुलल्या असें क्षणभरी वाटे मना भूवर ॥ १ ॥
लोकांच्या भरती सभा उठतसे सर्वत्र कोलाहल ।
व्याख्यानांवरि सर्व भार दिधला हो चित्त चिंताकुल ॥
उक्तीशीं बहुधा कृती परिजनीं व्यस्त प्रमाणावरी ।
निर्माल्यासम निष्फळा सतत ती होते जगीं वैखरी ॥ २ ॥
सत्याला गळफांस लावुनि पुरा पायांतळीं हाणिती ।
अंगीं जो व्यभिचार फार मुरला कोणा न त्याची क्षिती ॥
दीनांतें छळिती परंतु वरती सच्चेपणा दाविती ।
हा हा दुःखद ! फार वाढत असे चौफेर देशस्थिती ॥ ३ ॥
खोटी बुद्धि विचार दुष्ट पसरे छाया तमाची जनीं ।
भूतांच्या परिपीडनें मनुज हा आनंद मानी मनीं ॥
हे प्यारे, मम देशबांधव ! अतां न्याहो स्थिती ही लया ।
सौंदर्यें विभवें यशें स्वकृतिनें संभूषवा आलया ॥ ४ ॥

स्वामींनीं केलेल्या देशस्थितीच्या किंबहुना जगताच्या ह्या निरीक्षणांत रामदासांची खोलदृष्टि दिसून येते. याप्रमाणें निव्वळ तात्विक विचार करून स्वामी थांबले नसून त्यांनी भारतवर्षाच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय, औद्योगिक, शैक्षणिक इत्यादि स्थितींचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांतील दोष व गुण आणि अवनतीचीं खरीं कारणें यांची फारच सूक्ष्म चिकित्सा केलेली आहे. या सर्वांचा विचार करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें स्वामींच्या विचारसरणीचें फक्त दिग्दर्शन करून 'भारताच्या वतीनें अमेरिकेस विज्ञप्ति' ह्या स्वामींच्या व्याख्यानाचें मनन करण्याची विनंति वाचकवर्गाला करितों.*

( १ ) राजकीय औद्योगिक स्थितीचें निरीक्षणः—

" या देशांतील तीस कोटी लोकांचा विलायतेतील न्यायसभेंत एकही प्रतिनिधि नाहीं.........मोठमोठ्या पगाराच्या नोकऱ्या जाति व धर्म यांच्या अनुरोधानें देण्यांत येत असल्यानें जातिद्वेषाला एकप्रकारें उत्तेजन मिळतें. ............सध्यांची राजकीय परिस्थितीच अशी आहे कीं, तींत स्वातंत्र्याची प्रवृत्ति लोकांच्या अन्तःकरणांत मुळें धरूं शकत नाहीं."

" देशांतील सर्व प्रकारच्या कला, हुन्नर आणि उद्योगधंदे पार बसले !... ...इंग्लंडांतील भांडवलवाल्यांना अधिक समृद्ध करण्याकडेच मुख्यतः आमच्या औद्योगिक शिक्षणाचा व प्रवृत्तीचा उपयोग होत आहे. हिंदुस्थानांतील सर्व मोठमोठाले कारखाने व व्यापारी संस्था इंग्रजी व्यापाऱ्यांच्या हातांत आहेत. हिंदी व्यापारी हे नांवाचे व्यापारी असून यूरोपांतील व अमेरिकेंतील धनाढ्य व्यापाऱ्यांचे ते हस्तक किंवा दलाल आहेत."

( २ ) धार्मिक व सामाजिक स्थितीचें निरीक्षणः—

" भूगोलाच्या दृष्टीनें नव्हे, तर बौद्धिक, नैतिक आणि आध्यात्मिक दृष्टींनीं आमचा हिंदुस्थान देश एकेकाळीं साऱ्या जगाचें शिरोभूषण होता. तथापि आतां त्याला त्रिदोष झाला आहे. ( राजकीय, सामाजिक व धार्मिक दुःख )

* स्वा. रा. भाग ११ फडकेकृत पहा.

वर्णव्यवस्था व जातिभेद ह्यामुळें देशाचें अकल्याण झालें नसून त्यांच्या देव्हाऱ्याचें जें स्तोम माजविण्यांत आलें त्यामुळें झालें. धार्मिकविधि आणि आचार यांच्या ठिकाणीं वेडगळपणामुळें होणारें राष्ट्रांतील प्रेमाचे केंद्रिभवन, समारंभ व उत्सव यांच्यासारख्या धर्माच्या बाह्य अंगाच्या ठिकाणीं अज्ञानजन्य अंधविश्वास आणि वर्णव्यवस्थेच्या विपर्यासामुळें परिस्थितीच्या ठिकाणीं आलेला घट्टपणा, या कारणांमुळें जातिद्वेष, जातिमत्सर आणि पक्षाभिमान इत्यादि दुर्गुण राष्ट्रांत उत्पन्न झाले असून त्यांची तीव्रता इतकी बेसुमार वाढली आहे कीं, सर्वांची अन्तःकरणें एकवटून एकोप्याने व एकदिलानें कोणतेंही काम होणें अशक्य झाले आहे.......................हिंदुस्थानांत येणारे ख्रिस्तीधर्म प्रचारक हिंदूंच्या गृहसौख्यांत फुटीचें विष कालवितात; व लोकांना आपल्या कळपांत ओढून हिंदुस्थानांत आधींच बेसुमार झालेल्या जातीत एका नव्या जातीची भर टाकितात. हे बाटलेले हिंदू प्रायः आपल्या हिंदुबांधवांचे कट्टे शत्रू बनतात. ह्या धर्मप्रसारक मंडळांच्या उद्योगामुळें तरूण मुलींची आईबापांपासून ताटातूट होते. पत्नीचा पतीपासून वियोग होतो. अशा रीतीनें हिंदुलोकांच्या अन्तःकरणांना घरे पाडण्यांत, धर्मावर निष्कारण हल्ले करण्यांत आणि अप्रबुद्धि तरुणांच्या कोंवळ्या मानेवर ख्रिस्तीधर्मातील वेडगळ समजुतीचें जोंखड अडकविण्यांत तुमच्या भूतदयेनें प्रेरित होणाऱ्या प्रयत्नांचें पर्यवसान होतें..................

( ३ ) शैक्षणिक स्थितीचें निरीक्षणः—

लोकांची नीति सुधारण्यास त्यांना खरें ज्ञान—जिवंतज्ञान शिकविणें जरूर आहे. सत्याचें यथार्थज्ञान करून देण्याचीच हिंदुस्थानांत अत्यंत जरूरी आहे. हिंदुस्थानांतील दैन्य उद्योगधंद्यांच्या शाळांनीं नाहींसें होणार नाहीं. उच्चवर्णाच्या लोकांबरोबर मागासलेल्या जातींतील लोकांनांही शिक्षण देऊन त्यांना सुसंस्कृत करणें, स्वाधीनतेची तेजस्वीवृत्ति त्यांच्या ठिकाणीं निर्माण करणें, तसेंच सत्याच्या ज्ञानानें येणारें औदार्ययुक्त सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करणें, ह्या गोष्टींची आजच्या परिस्थितींत विशेष जरूरी आहे. खऱ्या ज्ञानाचा प्रसार हीच आमची तात्कालीक व महत्वाची गरज आहे. हिंदुस्था-

-नांत दिलें जाणारें शिक्षण अगदीं कुचकामाचें आहे. कला शिकविणाऱ्या विद्यालयांतून ( " आर्ट्स कॉलेजेस " ) तत्वज्ञानासारखीं रुक्ष शास्त्रें शिकविण्यांत येतात. पण व्यवहारोपयोगी एकही शास्त्र शिकविण्यांत येत नाहीं.... ............... '

अशा रीतीनें देशस्थितीचें निरीक्षण केल्यावर ही स्थितीसुधारण्याला काय उपाय योजावे तेही त्यांनीं जनतेपुढें ठेविलें. त्यामध्यें मुख्य तीन तत्वांचीं रोपें जनतेच्या मनांमध्यें वाढीस लावावयाचा स्वामींचा विचार होता, व तो पुष्कळांशीं साध्यही झाला. ( १ ) ऐक्य व राष्ट्रीयत्वाची भावना. ( २ ) शिक्षण आणि ( ३ ) युगधर्माप्रमाणें वागण्याची प्रवृत्ति. हीं तीन तत्वें जनतेमध्यें बीजरूपानें होतीं. तीं पूर्णपणे ओळखून त्यांची जोपासना करून त्यांना वाढीस लावून त्यांचीं सुंदर रोपे तयार करण्याचे काम स्वामींनीं केलें. राष्ट्रीयमनाचें पृथक्करण करून त्याच्या ठिकाणीं बीजरूपानें राहणाऱ्या भावनांना वाढीस लावणें यांतच स्वामींच्या देशभक्तीचें, पुढारीपणाचें आणि सूक्ष्मदृष्टीचे वैशिष्ट्य आहे. प्रजाजन मनोभूमीच्या रुक्षत्वाबद्दल अगर दोषपूर्णत्वाबद्दल यत्किंचितही कुरकुर न करितां खडकाळ व नापीक जमिनीची लोण्यासारखी मऊ व सुपीक जमीन बनविण्यांत स्वामींच्या कार्याचें रहस्य भरलें आहे.

हिंदुस्थान हें एक खंड असून त्यामध्ये जाति, धर्म, पंथ आणि भाषा यांची विलक्षण विविधता भरलेली आहे. या विविधतेमुळेंच राष्ट्रेतिहासाला गोंधळाचें स्वरूप प्राप्त झालें आहे, असें स्वामींना कधींही वाटलें नाहीं. तर उलटपक्षीं या विविधतेमुळें राष्ट्रेतिहासाला अद्भुत व रम्य स्वरूप प्राप्त झालें आहे असेंच स्वामींचें मत दिसतें. या तऱ्हेचें प्रतिपादन स्वामींनीं केल्यामुळेंच पाश्चात्यांच्या हिंदुस्थानविषयक दोषैकदृष्टीमध्यें चरचरीत अंजन पडलें. स्वार्थपरिणामी भेदनीतीला जोराचा तडाका बसला, आणि हिंदुस्थानाकडे पहातांना लावण्याचे जुने उपनेत्र टाकून देऊन नवीन लावणें पाश्चात्यांना अवश्य वाटूं लागलें. 'सुशिक्षित जगाला आर्यभूचें आध्यात्मिक ऋण ' व भारताच्या वतीनें अमेरिकेस विज्ञप्ति '

या दोन व्याख्यानांचे द्वारें केलेल्या स्वामींच्या कार्याकडे तरुणभारताच्या परराष्ट्रीय वकिलाच्या कामगिरीच्या दृष्टीनें पाहिल्यास [अशा दृष्टीनें स्वामीकडे व त्यांच्या कार्याकडे पाहणें ह्मणजे त्यांची व त्यांच्या कार्याची किंमत कमी लेखण्यासारखें आहे ] त्यांची कामगिरी, स्वामी विवेकानंदांची कामगिरी जमेस न धरिल्यास, अद्वितीय होती, असें पश्चिमेकडील व पूर्वेकडील परराष्ट्रीय वकिलांच्या कार्याचा इतिहास पाहिल्यास पटल्याशिवाय राहणार नाहीं. असो. यानंतर स्वामींनीं भारतोद्धाराकरितां केलेल्या विधायक सूचनांचा विचार करूं.

## ( १ ) ऐक्य व राष्ट्रीयत्वाची भावना.

आपण सर्व एकाच राष्ट्राचे घटक आहों, व आपणां सर्वांची उन्नति एकाच परिस्थितीवर अवलंबून आहे. ही भावना राष्ट्रांतील प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत बाणून गेली पाहिजे, सुदैवानें आज ही भावना थोड्याफार प्रमाणानें लोकांच्या गळीं उतरत चालली आहे. तथापि ही राष्ट्रीय ऐक्याची व परस्परांमधील भ्रातृभावाची कल्पना अद्याप बाणावी तशी बाणली नाहीं. जातींजातींमधील द्वेषभाव, धर्मांधर्मांमधील व पंथांपंथांमधील विरोध व द्वेषभाव हा राष्ट्रीयधर्मबुद्धीच्या अभावाचाच परिणाम असून या विरोधांत राष्ट्रांतील अफाट शक्तीचा विनाकारण व्यय होत असून परकीयांच्या आपमतलबी भेदबुद्धीला धिगाणा घालण्यास पुष्कळ वाव सांपडतो ही गोष्ट स्वामींच्या दृष्टीस येतांच त्यांनीं ' **ज्या मुद्यावर आपणां सर्वांचें ऐक्य होऊं शकतें; तेवढेंच मुद्दे घेऊन त्यांच्यावरच आपलें सर्व सामर्थ्य खर्च करूं या.** ' असा मननीय व अनुकरणीय उपदेश केला. हा उपदेश जितक्या लौकर आमच्या आचरणांत प्रतिबिंबित होईल तितकी आमची राष्ट्रीय प्रगति लौकर होईल हें खास. या प्रकारचें आचरण सर्वांकडून व्हावें म्हणून स्वामींनीं **प्रथम सर्वांचीं अंतःकरणें आपल्याकडे ओढून घ्या** ' हा उपदेश केला.

भारतवर्षांतील चातुर्वर्ण्यरचना हीच भारतोद्धाराच्या मार्गांतील मोठी धोंड आहे हें निखालस खोटें व लुच्चेगिरीचें तत्व सर्व पाश्चात्यांनीं तरुण भारत-

पुत्रांच्या मनांवर ठसविण्याचे यशस्वी प्रयत्न केले होते. यास्तव पुष्कळ परप्रत्ययनेयबुद्धीच्या मूढ भारतवासीयांनीं या रचनेविरुद्ध पुष्कळ काहूर माजविलें. अद्यापीहि ह्या खोट्या कल्पनेचा व्हावा तसा निरास झालेला दिसत नाहीं. यामुळें स्वामींना **चातुर्वर्ण्य हें राष्ट्रोद्धाराला, राष्ट्रीय-हिताला मुळींच विघातक नसून उलट पुष्टिकारक आहे ही गोष्ट सिद्ध करणें भाग पडलें.** व्यवसाय विभागणीशिवाय समाज चालणें अशक्य, यामुळें प्रत्येक राष्ट्रांत वर्णव्यवस्था कोणत्या ना कोणत्या रूपानें असनेच. त्याप्रमाणें आर्याचीहि वर्णव्यवस्था आहे. परंतु आर्यांनी वर्ण-व्यवस्थेला जें शास्त्रीय स्वरूप दिलें तें मात्र जगांतील इतर राष्ट्रांमध्यें दिसून येत नाहीं. समाजव्यवस्थेच्या या वर्णाश्रमधर्माच्या विशेष रचनेमुळें आमचा समाज सुयंत्रित चालला आहे. प्रथम चातुर्वर्ण्याची विभागणी गुणकर्मानुसार उत्पन्न झाली. व पुढें कालमानानें चार वर्णांतून अनेक जाति व पोटजाति उत्पन्न झाल्या. व्यवसाय विभागणीचें तत्व जातीमध्यें कायम असल्यामुळें निरनिराळ्या जातीं-मधील गुणांची हळुहळू उत्क्रान्ति होऊन एकंदर राष्ट्राचें हित होतें. जोपर्यंत भिन्नवर्णांमध्यें अगर जातीमध्यें प्रेमभाव नांदत असतो, तोंपर्यंत या वर्ण-विशिष्ट अगर व्यवस्थेमुळें राष्ट्रीय प्रगतीचें पोषण होतें. यामुळें जातीजाती-मधील वैमनस्ये नाहींशी होणें अवश्य आहे. परंतु सर्व जातिभेदच कृत्रिम उपायांनीं नाहींसा करण्याचा प्रयत्न केल्याने राष्ट्राची प्रगति न होतां, उलट तें अधोगतीलाच जाईल, ही गोष्ट स्वामींनीं ठिकठिकाणीं प्रतिपादन केली आहे. याच चातुर्वर्ण्य व्यवस्थेमुळें समाजांतील विघातक ईर्ष्या व चढाओढ नाहींशी होते, संपत्ति व श्रम यांचा झगडा संभवतच नाहीं, आणि प्रत्ये-काला आत्मोद्धार व राष्ट्रोद्धार करण्यास भरपूर सवड मिळते. *

---

* याचप्रकारचे विचार 'राधा कुमुद मुकर्जी' यांनीं 'Western Communism and Eastern Classicism, ' पाश्चात्य समाज व पौर्वात्य वर्णव्यवस्था ' या नांवाचा ' मॉडर्न रिव्ह्यु ' आक्टोबर सन १९२१ मध्यें लेख लिहून प्रदर्शित केले आहेत. ते पहावे.

## ( २ ) सार्वत्रिक शिक्षण.

हिंदुस्थानांत साक्षरता अत्यल्प प्रमाणांत आहे. बहुजनसमाज निरक्षर आहे. ही गोष्ट हिंदुस्थानच्या अवनतीच्या अनेक कारणांपैकीं अत्यंत महत्वाचें कारण आहे. व ही शोचनीय स्थिति नाहींशी करण्याकरितां सार्वत्रिक शिक्षण प्रसार होणें जरूर आहे. परंतु ज्या शिक्षणाचा प्रसार सर्वत्र व्हावा अशी स्वामींची इच्छा होती तें शिक्षण कोणत्या प्रकारचें असावें, ह्याबद्दल स्वामींचें शिक्षणाचें ध्येय व शिक्षणाची व्याख्या पाहिल्यास ते खरे खरे तज्ज्ञ होते असेंच कबूल करावें लागतें.

**शिक्षणाचें ध्येय व व्याख्याः—'स्वातंत्र्य हेंच शिक्षणाचें ध्येय शिक्षणानें स्वाधीनता येत नसेल तर त्या शिक्षणाला धिक्कार असो'!**

**'लोकांची नीति सुधारण्याकरितां त्यांना खरें ज्ञान-जिवंत ज्ञान शिकवणें जरूर आहे'**

**'देशांतील साधन सामग्रीचा योग्य उपयोग करून घेण्याचें सामर्थ्य आंगीं बाणणें हाच शिक्षणाचा खरा हेतु आहे.'**

**'लोकांना आध्यात्मिकज्ञान द्या व त्यांचें अज्ञान नाहींसें करा.'**

**'निरनिराळे देश पहाणें हें स्वतःच एक शिक्षण आहे.'**

**'सर्वात्मभावाच्या दिव्य चक्षूंनीं सर्व वस्तूंकडे पहाणें हाच खऱ्या शिक्षणाचा अर्थः—**

यावरून स्वामींचें शिक्षण एकांगीं नसून 'श्रेयस् व प्रेयस्' हीं दोन्हींही प्राप्त करून देणारें आहे असें ठरतें.

**शिक्षण देण्याची रीतः—**'बहुजनसमाजाला सुशिक्षित करण्याचा अगदीं जवळचा व साधा उपाय हाटला ह्मणजे हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांची स्थिति सुधारणें हा होय. उपयुक्त ज्ञानाचा प्रसार करणारीं नवीं नवीं पत्रें

काढा आणि जुन्यांत योग्य त्या सुधारणा करा. पण हीं पत्रें देशी भाषेंत असूं द्यात; म्हणजे स्त्रियांना व बहुजनसमाजाला त्यांचा उपयोग होईल.'*

शाळांची आवश्यकता नाही, धंदेशिक्षणाची बिलकूल जरूरी नाहीं असें स्वामींचें मत असल्याचें वाटण्याचा संभव आहे. पण तशी गोष्ट मुळींच नाहीं. हें त्यांच्याच उद्गारावरून स्पष्ट होत आहे.

' हिंदुस्थानांतील दैन्य उद्योगधंद्यांच्या शाळांनीं नाहींसें होणार नाही. परंतु उच्च वर्णाच्या लोकांबरोबर मागासलेल्या जातीतील लोकांनाही शिक्षण देऊन, त्यांना सुसंस्कृत करणें, स्वाधीनतेची तेजस्वीवृत्ती त्यांच्या ठिकाणीं निर्माण करणें, तसेंच ज्ञानानें येणारें औदार्ययुक्त सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करणें, ह्या गोष्टीची आजच्या परिस्थितींत विशेष जरूरी आहे. खऱ्या ज्ञानाचा प्रसार हीच आमची तात्कालिक व महत्वाची गरज आहे. ज्या सर्वांग संपूर्ण शिक्षण पद्धतीचा राम पुरस्कार करीत आहे, तींत धंदेशिक्षणाचाही समावेश होतो. परंतु केवळ उद्योगधंद्याच्या शिक्षणानें आमचा कार्यभाग होणार नाहीं तर धंदेशिक्षणाहून अधिक श्रेष्ठ अशा तेजस्वितेची व बाणेदारपणाची आमच्या हिंदुराष्ट्राला सध्यां विशेष जरूरी आहे.

अशा रीतिनें ज्ञानप्रसाराच्या कार्याप्रीत्यर्थ आपणांस वाहून द्या व सर्व लोकांमध्यें राष्ट्रीय भावना जागृत करा असा स्वामींचा तरुणांस कळकळीचा उपदेश आहे.

---

* रशियांत जी राज्यक्रान्ती झाली तिच्या विधायक कामगिरीपैकीं त्वरित फलदायी शिक्षण पद्धति ही महत्वाची आहे. या पद्धतीचे आधारस्तंभ स्वामींनीं सुचविले तसेच आहेत. निवळ शाळा काढून शिक्षणाचा व्हावा तितका लवकर प्रसार होत नाहीं. हें जाणूनच देशी भाषेंतील वर्तमान पत्रांची वाढ व प्राथमिक शाळांतूनही त्यांचा प्रवेश करणें ह्याचा अवलंब तेथील शिक्षणपटूंनीं केल्यामुळें फारच थोड्या अवधींत बहुजन-समाज सुशिक्षित झाला आहे.

## ( ३ ) युगधर्माप्रमाणें वागण्याची प्रवृति.

भारतोद्धाराचा जो मार्ग स्वामींनी आपल्या सर्व व्याख्यानांतून प्रतिपादन केला आहे, तो ह्मटला ह्मणजे अध्यात्मज्ञान व पाश्चात्य भौतिक शास्त्राचें अध्ययन यांचा मिलाफ करणें हा आहे. स्वामी म्हणतात श्रुतीचें दिव्य सिद्धांत आपलेसे करून घ्याच, परंतु त्या बरोबरच पाश्चात्यांच्या भौतिक शास्त्रांचेही ज्ञान संपादन करा. कारण राष्ट्रांच्या चढाओढींत नुसत्या एकतर्फी ज्ञानानें तुमचा टिकाव लागणार नाही स्वामी म्हणतातः—

> फेलं[1] अतवार[2] ऋषियों मुनियों के ।
> ऋषी तुमको नहीं बना सकते ॥ १ ॥
>
> ...................................
>
> वकतथा और औरही दिन थे ॥ २ ॥
> जिस्म[3] उनके थे जो उन्हींके थे ।
> वह तुम्हारे नहीं कभी होगे ॥ ३ ॥
>
> ...................................
>
> नकल मत कीजिये फेले बेरू[4] नी ।
> आत्मा एकही है अंदरूनी ॥ ४ ॥

भावार्थः—प्राचीन ऋषी व मुनी यांनीं आचरिलेले विधी व केलेलीं कर्मे हीं तुम्हांला ऋषीपद प्राप्त करून देणार नाहींत. ( कारण ) तो कालच निराळा होता, जीं त्यांचीं शरीरें होतीं तीं तुमचीं कधींही होणार नाहींत. ( म्हणून ) निव्वळ बाह्यकर्मांची नकल करूं नका, कारण अन्तस्थ आत्मा एकच आहे. याकरितां:—

---

१ कर्म. २ विधि. ३ शरीर. ४ बाह्यकर्मांचीं.

डूबा तारा तुम्हारा पूरब[1] को।
ब्रह्म विद्याचली है यूरप को ॥ ५ ॥
हिंद मजंनू[2] बना है दिवाना।
तलमलाता है मिसले-परवाना[3] ॥ ६ ॥

**भावर्थः**— तुमचा तारा ( उज्ज्वल ज्ञान ) अस्तमान झाला. व ब्रह्मविद्या यूरोपांत चालली. हिंदवासी मजनून प्रमाणे दिवाणे होऊन पतंगाप्रमाणें तळमळत आहेत.

ही स्थिति नाहीशी होण्याकरितां स्वामी उपाय सांगतातः—

ब्राह्मणो ! आप सीख लो विद्या।
फिर यह घर घर फिरो पढाते जा ॥ ७ ॥
जबरसे[4] केहरसे[5], मुहब्बतसे[6]।
ज्ञान दीजे उन्हें मुरब्बतसे[7] ॥ ८ ॥

**भावार्थः**— अरे ब्रह्मविदांनों, तुम्ही ती विद्या शिका, व नंतर घरोघर फिरून त्या विद्येचे दान करा, सर्वांना शिकवा. हे दान जबरीनें, रागानें, प्रेमाने व नम्रतेनें कसेही द्या. पण हे ज्ञानदान तुम्ही कराच.

असें करण्याचीं कारणें सांगतातः—

गंगा हर वखत बैहती रहती है।
साफ निर्मल जभी[8] तो रहती है ॥ ९ ॥

शिवाय

वकत देखो समयको सिंभालो[9]।
जात कायम हो, काया पलटा लो ॥ १० ॥

---

१ पूर्वेकडे. २ मजनून व लैली हीं दोघें अरबस्थानांतील नेज्द शहरीं शेजारीं रहात असत. त्यामुळें लहानपणींच त्यांचें एकमेकांवर प्रेम बसलें. हें लैलीच्या बापाला न आवडून त्यानें तिचें लग्न दुसऱ्या एका तरुणांशीं लाविलें. हें समजतांच मजनून वेडा झाला. लैलीलाही तो विवाह पसंत न पडून ती लवकरच 'मयत' झाली, ही वार्ता ऐकून मजनून मूर्च्छित होऊन पडला, तो पुन्हां उठला नाहीं. यावरून मजनू म्हणजे 'प्रेमवेडा' असा अर्थ झाला. ( जनून–वेडेपणा ). ३ पतंगाप्रमाणें. ४ जबरदस्तीनें. ५ रागानें. ६ प्रेमानें. ७ नम्रतेनें. ८ तेव्हां. ९ राखा, संभाळा.

**भावार्थः**— गंगा नेहेमीं वहात असल्यामुळेंच तिचें पाणी स्वच्छ रहातें. ( शिवाय ) प्रस्तुत परिस्थितीकडे लक्ष द्या व वेळ मारून न्या. ( असें करितांना ) बहिरंग ( देह ) मात्र बदलावें लागेल ( पण ) अंतरंग ( आत्मा ) कायमचा राहील. ' बदला किंवा मरा ' ही निसर्गाची इषारत सदैव मनांत वागवून उपनिषद् ज्ञानाबरोबरच पाश्चात्यांच्या आंगांत मुरलेलें भौतिक शास्त्रांचें व कालांचे ज्ञान आपलेसें करण्यांत कसूर करूं नका. ... ... ... भूतकाल व वर्तमानकाल यांमधील योग्य, हितावह व आवश्यक अशा सर्व तत्वांचें ग्रहण करून तुम्हीं आपली उन्नति करून घेतली पाहिजे. अशी **रामाची** तुम्हाला आज्ञा आहे. '

देशोद्धाराकरितां कोणकोणत्या गोष्टी केल्या पाहिजेत याचें दिग्दर्शन स्वामींच्या शब्दांनी झालें. पण या बाबतीत खुद्द स्वामींनीं विधायक अशी कोणती कामागिरी करण्याचा प्रारंभ केला होता व तसे करण्याला त्यांच्या अंगीं योग्यता तरी होती काय ? आणि असल्यास ती त्यांनी कशी कमाविली ? या गोष्टींचा ओझरता निर्देश करून स्वामींच्या पुढच्या दर्शनाला जाऊं.

भारताच्या उणीवा भरून काढण्यासाठीं स्वामींनी ' **चैतन्यमठ** ' या नांवाची एक संस्था स्थापण्याचा विचार केला होता आमच्या सुदैवानें ते जिवंत राहिले असते तर खुद्द त्यांच्या पुरस्काराने उपरिनिर्दिष्ट संस्था केवढी कामगिरी करते तेंही दिसलें असतें. पण आमचे दुर्दैव पुढे उभे राहिले ! या संस्थेमार्फत कोणता कार्यक्रम उरकावयाचा होता याची माहिती स्वामींनीं दिली आहे ( ती ' स्वामी रामतीर्थ भाग ११ फडकेकृत ' यांत पहावी पान १६७. ) स्थलसंकोचास्तव तिला येथें अवकाश देता येत नाहीं.

स्वामींनीं जो भारतोद्धाराचा उपदेश लोकांना केला, त्याकरितां त्यांनीं केवढी तपश्चर्या केली होती व त्यांचा निश्चय केवढा दांडगा होता हें त्यांच्याच शब्दांनीं पाहूं.

इ. स. १९०५ नंतर, स्वामी पुष्कर ( अजमीर ) तीर्थाला गेले होते.. तेथून त्यांनीं जीं पत्रें पाठविलीं त्यांपैकीं एकांत ते म्हणतातः—

" स्वदेशांतील लोकांच्या ठिकाणीं अद्भुत शक्ति व सामर्थ्य उत्पन्न करण्याकरितां प्रथमतः ही अद्भुत शक्ति मला स्वतःलाच संपादन करणें जरूर

आहे............क्षुल्लक कामांबद्दल नसती धांदल व गाजावाजा न करितां मातृभूमीची खरी व टिकाउ सेवा करणें असेल, देशाच्या खरोखर उपयोगी पडावें असें मनांत असेल, तर हें महत्कार्य करण्यासाठीं संपूर्णशक्ति स्वतः प्राप्त करून घेणे जरूर आहे.........,..सध्यां या ठिकाणी आमचीं व पाश्चात्यांचीं शास्त्रें यांचा मी अभ्यास करीत आहे. त्यांवर स्वतंत्र रीतीने विचार करून सत्यान्वेषण करीत असतों.—अशा रीतीने अविरत परिश्रमानें मी जें साध्य करणार आहे, तें लोकांना समजावून देऊन त्याचा अनुभव घेण्याचा व तें आचरणांत आणण्याचा त्यांना उपदेश करण्याकरितां मी लवकरच प्रगट होणार आहें.... "

हें पत्र फारच मोठें असल्यामुळे सर्वच उद्धृत करितां येत नाहीं. तथापि त्याचबरोबर त्यांतील कोणता भाग वगळावा हेंही समजत नाही. इतके ते महत्वाचें आहे.* या उताऱ्यावरून स्वामींच्या आंगची योग्यता, त्यांची तपश्चर्या, लोकनायकाचा अधिकार, व त्यांच्या आंगची लोकोत्तर शक्ति, या सर्वांची मुद्देसूद कल्पना येईल.

आतां देशोद्धाराकरितां स्वामींनीं केवढी हिंमत बांधिली होती हे पाहूं.

( राग–जंगला, ताल–चलन्त. )

**हम रूखे टुकडे खाएंगे । भारतपर वारे जाएंगे ॥ १ ॥**
**हम सूखे चने चबाएंगे । भारतकी बात बनाएंगे ॥ २ ॥**
**हम नंगे उमर बितांएंगे । भारतपर जान मिटाएंगे ॥ ३ ॥**
**सूंलापर दौडे जाएंगे । काटोंको राख बनाएंगे ॥ ४ ॥**
**हम दर दर धक्के खाएंगे । आनंद की झलक दिखाएंगे ॥ ५ ॥**
**सब रिश्ते नाते तोडेंगे । दिल इक आत्मसंग जोडेंगे ॥ ६ ॥**
**सब विषयोंसे मुहं मोडेंगे । सिरसब पापोंका फोडेंगे ॥ ७ ॥**

---

***स्वा. रा, भाग १२ पृष्ट १२९ पद्य. १ ओंवाळीत. २ खाईन. ३ घालवीन. ४ प्राण. ५ देईन. ६ सुळांवर, निखाऱ्यावर. ७ नातेवाईक.**

**भावार्थः**—मी कोरडे तुकडे खाऊन राहीन, पण भारतमातेचें महात्म्य वाढवीन, व त्याकरितां स्वतःचे प्राण अर्पण करीन. स्वतः सुखे चणे खाऊन राहीन, पण भारतवर्षाचें नांव करीन.

फाटक्या चिंधीनें सारें आयुष्य कंठीन, पण स्वदेशावरून जीव ओंवाळून टाकीन, जळजळीत निखाऱ्यांवरून धांवत जाईन; व फाट्यांना राखेप्रमाणें मऊ करीन. **अनादर होत असला, थपडा मिळत असल्या तरी (विषाद न मानितां) मी आनंदच व्यक्त करीन.** सारीं नातींगोतीं तोडून टाकून एका अगम्याच्या ठिकाणीं चित्त जडवीन. सर्व विषयांपासून मन परावृत्त करून सर्व पापांचे डोकेंच फोडून टाकीन.' केवढा प्रणय, व सत्याग्रह हा!

**देशभक्ति** ( वरील कवितेचें रूपांतर ).

( उपजाति ).

मी कोरडी भाकर खाउनीयां । किंवा चणे नीरस सेवुनीयां ।
प्राणांसही अर्पुनि वा प्रसंगीं । ही हिंदभू नेइन कीर्तिरंगीं ॥ १ ॥
चिंधीविना कंठिन जीविताला । ओंवाळुनी टाकिन आपणांला ।
अग्नीमध्यें ही करीन प्रवेश । नेईन मी उन्नतिला स्वदेश ॥ २ ॥
गृहीं गृहीं आदर नाहिं झाला । शिवेल ना दुःख तरी मनाला ।
आत्मस्वरूपीं जडवीन चित्त । जेणें मनाचें खवळेन पित्त ॥ ३ ॥
आनंद मानीन सदा मनांत । रमेन केव्हां नच संसृतींत ।
तोडीन मी बंधनभाव सर्व । हरीन सारा मग पापगर्व ॥ ४ ॥

देशभक्तीचा कडेलोट यापेक्षां अधीक कोठें उरला? खरा सत्याग्रह यापेक्षां कोठें आहे? असे देशभक्त थोडे, हातांच्या बोटांवर मोजण्याइतके कां होईना, हिंदुस्थानांत आज निपजत आहेत हीं भावी स्वातंत्र्याचीं सुचिन्हेंच होत. स्वामींनीं ज्या वायुमंडलाच्या लाटा तेव्हां उत्पन्न केल्या होत्या त्या आज इष्ट फलदायी होत आहेत. ही आनंदाची गोष्ट आहे.

( राग-परज:ताल-गज्जल. )

गर्चि[1] कुतबे[2] जगहसे[3] टले तो टल जाये ।
गर्चि वैहर[3] भी जगतूकी[4] दुमेसे[5] जल जाये ॥
हिमालय बादकी[6] ठोकरसे गो फिसल[7] जाये ।
और आफताबभी[8] कब्जे-उरूज[9] टलें[10] जाये ॥
मगर[11] न साहबे-हिंमतका[12] हौसले[13] टूटे ।
कभी न भूलेसे अपनी जॅबीपर[14] बल आये ॥

**भावार्थः**–अथवा ध्रुवतारा स्थानभ्रष्ट होईल, समुद्र काजव्याच्या प्रकाशानें जळून जाईल, हिमालयपर्वत वाऱ्याच्या सपाट्यानें ढांसळेल, अथवा सूर्यसुद्धां उदय पावतांच अस्त पावेल; परंतु धैर्यवान् पुरुषाची हिंमत कधीही कमी होणार नाहीं; व चुकूनही अशा धीरोदात्त पुरुषाची मान दुःखानें, भीतीनें अगर निराशेनें वांकत नाहीं. अशी अतुल हिंमत धारण करणाऱ्या रामाच्या स्वदेशभक्तीचें वर्णन या लेखकाच्या हातून होतच नाहीं !

## ( कवितेचें रूपांतर )

### देशभक्ताचा निश्चय.

( शा. वि. )

स्थानभ्रष्ट कदापि निश्चल जरी होईल ताराध्रुव
कीं खद्योत निजानळे सकळही जाळील अब्धि ध्रुव ।
वाऱ्यानें हिमवान् ढळेल उदयीं जाईल अस्तारवी ।
धीरोदात्त परी नृसिंह न भयें ग्रीवा जगीं वांकवी ॥ १ ॥

स्वदेशभक्ताची पात्रता ठरवितांना स्वामी ह्मणत " **सत्यप्रेमानें अन्तःकरण भरून गेलें आहे असा मनुष्य कोणत्याही कलेंत प्रवीण**

---

१ अथवा. २ ध्रुवतारा. ३ समुद्र. ४ काजवा. ५ प्रयाश. तेज. ६ वायू. ७ ढांसळेल. ८ सूर्य. ९ सूर्योमयापूर्वी. १० अस्तास. ११ परंतु. १२ धैर्यवान् पुरुष. १३ हिंमत. १४ मस्तकावर.

नसला तथापि थोडीबहुत देशसेवा करूं शकेल.' हे शब्द देशसेवा करणाऱ्यांनीं मनन करण्यासारखेच आहेत.

## रामदृष्टि.

स्वदेशभक्तीसंबंधानें **रामाची** दृष्टि काय होती ती त्यांच्याच शब्दांनीं पाहूं:—

" राष्ट्रीयत्वाची जिवंत भावना सर्व लोकांच्या अन्तःकरणांत उदित करण्याचे कामीं हिंदुस्थानांतील प्रत्येक सुपुत्रानें प्रत्यक्ष सहाय्य करावें, अशी **रामाची** इच्छा आहे. बाल्यावस्थेंतून गेल्याशिवाय मुलाला तारुण्यदशा येत नाहीं. त्याप्रमाणें सर्व राष्ट्रांशीं स्वतःचें तादात्म्य अनुभविल्याशिवाय, आपल्या नसांनसांतून राष्ट्रीयभावनांचे स्फुरण होऊं लागल्याशिवाय, परमात्म तत्वाशीं ऐक्यता होणे शक्य नाहीं. राष्ट्रीय भावना ही सर्वव्यापी परमात्म भावनेची पूर्ण तयारी आहे. हिंदुस्थानांतील प्रत्येक सुपुत्राचें ठिकाणीं अखिल भरतवर्षाला पहाण्याचा—राष्ट्रीय भावनेचा—अभ्यास करून हिंदमातेचा प्रत्येक सत्पुत्र राष्ट्रसेवेस सिद्ध होऊं द्या. हिंदुस्थानांतील प्रत्येक शहर, वृक्ष, पाषाण आणि पशु धार्मिक भावनांनीं पूज्य म्हणून ठरविला गेला आहे. **परंतु सकल मातृभूमीलाच उपास्यदेवतेचें स्वरूप देण्याची आतां योग्य वेळ आली नाहीं काय?** राष्ट्रांतील प्रत्येक अंशावतार अखिल राष्ट्ररूपी पूर्णावताराविषयींच्या दृढभक्तीने आमची अन्तःकरणें भरून येवो! दुर्गेच्या पाषाणमूर्तींच्या ठिकाणीं प्राणप्रतिष्ठेच्या विधीनें हिंदुलोक प्रत्यक्ष दिव्यत्व उत्पन्न करूं शकतात. हिंदमातारूपी खऱ्या दुर्गेच्या ठिकाणीं राष्ट्रीय जागृतीनें चैतन्य उत्पन्न करून तिचें नैसर्गिक ऐश्वर्य व्यक्त करण्याची ही वेळ नाहीं कांय?"

यावरून स्वामींची राष्ट्रीय भावना व पाश्चात्यांची राष्ट्रीय भावना यांत किती महदन्तर आहे. बरें!

## (३) वेदान्ती राम.

परमहंस स्वामी रामतीर्थ हे निव्वळ शाब्दिक वेदान्ती, तर्कवादी अथवा रुक्ष तत्ववेत्ते नव्हते. ते 'शास्त्रे परेच निष्णातः' या वर्गीतील वेदान्ती होते.

ते व्यवहारिक वेदान्ती होते. वेदान्त त्यांच्या आचरणांत होता. वेदान्त हा आचरावयाचा असतो. निव्वळ बोलावयाचा नसतो. आणि जो वेदान्त आचरणांत आणील तोच खरा वेदान्ती असें त्यांचे म्हणणें आहे. व तें आपल्या वैदिक धर्माचें रहस्य आहे.

**वेदान्त** हा स्वामींचा फार आवडता शब्द असून त्याचा त्यांनीं वारंवार उपयोग केलेला आहे, व त्याचा अर्थही फार व्यापक आहे. 'वेदान्त' या शब्दाचा मूलार्थ 'ज्ञानाचा अंत' 'परिपूर्ण ज्ञान' असा आहे, जसें ज्ञान व्यापक तसा त्याचा उपयोगही अति व्यापक आहे. 'वेदान्त' हा शब्द एखादा धर्म, धर्म पंथ, तत्वज्ञानाची शाखा किंवा सांप्रदाय अशा संकुचित अर्थानें स्वामी उपयोगांत आणीत नाहींत. त्यांचा वेदांत सर्वव्यापी व सर्वगामी आहे. त्याचें रहस्य समजावून घेण्याकरितां आपल्याला तात्विक व गूढ अशा तर्क वितर्कांच्या भानगडींत शिरण्याचें कारण नाहीं, मतामतांच्या गलबल्यांत, किंवा शब्दजालाच्या गहनारण्यांत घोंटाळयाची बिलकूल जरूरी नाहीं.

स्वामी ज्या व्यापक अर्थानें 'वेदान्त' हा शब्द वापरतात त्याचें उगमस्थान तरी कोठें आहे हे पाहूं गेल्यास तें वेद व उपनिषदें यांत सांपडतें.

'द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति पराचैवापराच ॥ ४ ॥ तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदो सामवेदोऽथर्ववेदः शिक्षाकल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति ॥ अथ परा यथा तदक्षरमधिगम्यते ॥५॥ (मुण्डक्यो॰)

प्राचीन ऋषींच्या दृष्टीनें सर्व तऱ्हेच्या भौतिक शास्त्रांचा अन्तर्भाव वेद व वेदांगें यामध्यें होतो. परंतु हल्लीं अपराविद्येचें ज्ञान संपादन करून घेण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें, व तसेंच पाश्चात्य शास्त्रज्ञांनी महत्प्रयास करून त्या अपराविद्येची अपूर्व वाढ केली. यास्तव भौतिक शास्त्रांपुरतें त्यांचें शिष्यत्व आपण पत्करिलें पाहिजे. पण त्याचबरोबर ज्या पराविद्येच्या जोरावर अपराविद्यान्तर्गत सर्व शास्त्रांचीं मूलतत्वें प्राचीन ऋषींनीं वेदवेदांगांमध्यें प्रतिपादन केलीं तिचेंही ज्ञान आम्हांस अवश्य आहे असें स्वामी म्हणतात, सारांश, परा व अपरा या दोन्ही विद्यांचें ज्ञान संपादन करणें हा स्वामींचा

वेदान्त होय. याच व्यापक वेदान्ताला स्वामीनी '**रोखधर्म**' '**प्रवृत्तिपर वेदान्त**' '**व्यावहारिक वेदान्त**' हीं नांवें दिलीं आहेत.

स्वामीच्या वेदान्तावर सर्व जग जें इतकें मोहित होऊन गेलें आहे, त्याचे कारण स्वामींनीं, शंकराचार्यादि अद्वितीय वेदान्त्यांनीं प्रतिपादिलेलाच वेदान्त जुन्या पद्धतीने न सांगतां नवीन भाषेने, नवीन उदाहरणांनी, व्यावहारिक दाखल्यांनी आणि विशेषतः आधुनिक भौतिक शास्त्रांच्या प्रकाशांत सांगितला हे होय. स्वामींनी आपला वेदान्त समजावून देतांना 'घटपटादि' पुराण पद्धतीचा आधार घेतला नाही; पण त्यांच्या काव्यांत मात्र ह्या पद्धतीचा ठसा उमटलेला दिसतो. असो यानंतर स्वामींनी आपला **वेदान्त** म्हणजे काय हे कसे स्पष्ट केलें आहे, म्हणजे वेदान्ताची व्याप्ति कशी ठरविली हें पाहूं.

स्वामींनी आपल्या वेदान्ताच्या व्याख्या जागोजाग निरनिराळ्या शब्दांनी ठरविल्या आहेत त्या पाहिल्या म्हणजे त्यांच्या वेदान्ताचें स्वरूप लक्षांत येतें.

( १ ) रोखधर्म हा ज्ञानयुक्त श्रद्धेचा आहे. आणि 'रोखधर्म' हा शब्द प्रवृत्तिपर वेदान्ताचा पर्याय शब्द आहे.

( २ ) 'अहंभावाला सुळावर चढवून सर्वात्मभावाच्या रूपाने त्याचें पुनरुज्जीवन होणें यालाच प्रवृत्तिपर वेदान्त असें ह्मणतात.' याचींच भक्ति व ज्ञान अशीं दोन निरनिराळीं रूपें आहेत.

( ३ ) 'सर्वांचा आत्मा तोच माझा आत्मा...... मी भरतखंड आहे; शंकर-शिव आहें' यालाच प्रवृत्तिपर वेदान्त असें ह्मणतात.

( ४ ) खऱ्या अध्यात्मिकतेला आम्ही आर्य लोक वेदान्त ह्मणतों.

( ५ ) प्रेम, न्याय आणि स्वतंत्रता या भाषणाचा परिपोष ह्मणजे व्यावहारिक वेदान्त.

( ६ ) हिंदूंच्या व्यावहारिक वेदान्तांत सामाजिक, बौद्धिक आणि नैतिक बाबतींत सर्वांना पूर्ण मोकळीक आहे. व तिला प्रेमाचा आधार आहे. हिंदूंचा व्यावहारिक वेदान्त शान्तता आणि स्वतंत्रता, उत्साह, आणि मनोनिग्रह,

दया आणि शौर्य इत्यादि बाह्यतः परस्पर विरोधी मनोवृत्तींची विलक्षण रीतीनें सांगड घालून देतो.

( ७ ) स्वाभिमान, स्वावलंबन, आत्मनिष्ठा इत्यादि गुण व्यावहारिक वेदान्तापासून उगम पावतात.

( ८ ) लोकांची आन्दोलनात्मक स्थिति नाहींशी करून आपलें स्वाभाविक ऐश्वर्य त्यांना पटवून देणें; स्वाभाविक आणि सापेक्ष विशिष्टकारणानें अत्यंत स्वाभाविक आणि शाश्वत ऐक्य घडवून आणणें हाच रामाच्यामतें कार्यक्षम वेदान्ताचा अर्थ आहे

( ९ ) वेदान्तामध्ये निव्वळ धर्म व तत्वज्ञान यांचा अन्तर्भाव होत नसून, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूगर्भशास्त्र, विद्युच्छास्त्र, रसायनशास्त्र, ज्योतिषशास्त्र इत्यादि शास्त्रांचाही होतो.

( १० ) तळ्यांतील पाण्याप्रमाणे जागच्या जागीं आळसांत कुजून न जातां परिश्रमपूर्वक उन्नतीच्या मार्गावर नेटाने पुढें पाऊल टाकणे, वेंठीस धरलेल्या बिगाऱ्याप्रमाणे कपाळाला आंठ्या घालीत काबाडकष्ट न करतां राजपुत्राप्रमाणें गमतीखातर अहोरात्र परिश्रम करणें, कसे होईल, काय होईल हा हृद्रोग अन्तः करणांतून काढून टाकून मन स्थिर व शान्त करणे भेदाभेदाचा निरास करून अन्तःकरणांत प्रेमाचें व ऐक्याचें बीजारोपण करणें, प्राचीन चालीरीतींनां डोळे मिटून चिकटून न बसतां परिस्थितीप्रमाणें आचारविचारांना योग्य तें चालन देणें, सहानुभूतीच्या लांबलांब बाता न मारितां, अन्तःकरणांत प्रेमाच्या जिवंत भावना प्रज्वलित करणें; कल्पना सृष्टींत रममाण न होतां प्रत्यक्ष संसाराचें दिव्य काव्य बनाविणें, होऊन गेलेल्या ग्रंथकारांच्या प्रमाणरचनांवर भिस्त न ठेवितां स्वानुभवाचें नवें तर्कशास्त्र तयार करणें, निर्जीव प्रमाण वचनां ऐवजीं अन्तःकरणांत स्वानुभवाची जागती ज्योत पेटविणें, हाच व्यावहारिक वेदान्त होय.

याशिवाय व्याख्यानांतून आणखी कित्येक ठिकाणीं स्वामींनीं वेदान्ताच्या व्याख्या ठरविल्या आहेत, त्या सर्वांचा समावेश वर उद्धृत केलेल्या व्याख्येंत.

होतो. यामुळें त्यांचा विस्तार न वाढवितां स्वामींना वेदान्त कोठें कोठें व्यावहारिक रूपांत दिसे हें पाहिलें म्हणजे त्यांच्या वेदान्ताची पूर्ण ओळख पटेल.

'**स्वामींचा वेदान्त** हा निसर्ग देवतेच्या रमणीय चेहेऱ्यांत ओतप्रोत भरलेला आहे. उषःकालच्या कोमल प्रकाशांत, गुलाबांच्या मुग्धकलिकेंत, दंव बिंदूंच्या मौक्तिक वृष्टांत, पक्ष्यांच्या मंजुळ लकेऱ्यांत, पावसाच्या सरींत, तसेंच चराचरांतील यच्चावत् जीवसृष्टीत **स्वामींचा वेदांत** व्यापून राहिला आहे, व त्याचें तें आपणांस दर्शन करून देतात. विश्वांतील रम्य, उदात्त आणि चमत्कृतिजनक देखाव्यांत त्यांना जगांतील सर्व धर्म दिसतात. प्रभातकालच्या विकसित कुसुमांमध्यें त्यांना **बायबल** दिसतें; सायंकालच्या आकाशमंडलांत चमकणाऱ्या तारागणांत त्यांना **वेदांचा** प्रकाश दिसतो; व भूतमात्रांच्या नानाविध चरितविलासांत त्यांना **कुराण** दृग्गोचर होतें. मानवी हृदयकमलाच्या पाकळ्या हीं **स्वामींच्या वेदान्तग्रंथाचीं** पृष्ठें असून तीं वांचून त्यांचे हृद्गत ते आपल्याला शिकवितात. उन्नतीकडे जाणारें प्रत्येक राष्ट्र किंवा जाति **वेदान्त** कृतींत उतरवीत असल्याचें त्यांना दिसून येतें; अधोगतीस जाणारें प्रत्येक राष्ट्र वेदान्तापासून च्युत झाल्याचें त्यांना दिसून येतें; जगांतील प्रत्येक वीर पुरुष, कवी, चित्रकार यांच्या नेत्रांमध्यें वेदान्ताचें तेज चमकत असलेलें स्वामींना दिसून येतें. एखादा समाधानी आणि आनंदी मनुष्य दृष्टीस पडल्यास 'हा वेदान्ती चेहरा आहे' असें ते म्हणत. एखाद्या विजयी योध्याला पाहतांच 'हा वेदान्ताचा पुतळा आहे' अशा आशयाचे उद्गार त्यांच्या तोंडून निघत. **जपानी लोकांचा** जीवितक्रम अवलोकिल्यानंतर 'हे प्रवृत्तिपर वेदान्ताचे अनुयायी आहेत' असें स्वामी म्हणाले. **आल्प्ससारख्या** प्रचंड पर्वतावरील बिकट जागीं चढण्याचें कांहीं अमेरिकन लोकांनीं धाडस केलें व कांहींनीं **नायगाऱ्याच्या** धबधब्यांतून पोहण्याचें धाडस केलें ही बातमी ऐकून 'वेदान्ताचें रहस्य अंगांत मुरल्याचा हा परिणाम आहे' असे उद्गार स्वामींनीं काढिले. शास्त्रीय शोधांची प्रगति व्हावी म्हणून कांहीं जिवंत इसमांनीं आपल्या शरीरावर शस्त्रप्रयोग करण्याची कबुली दिली ही बातमी वांचून 'प्रवृत्तिपर वेदान्ताचें हें

साक्षात् उदाहरण आहे.' असें स्वामी म्हणाले, अशा सर्व वेळीं ते म्हणत **सत्याची–धर्माची खरी सेवा म्हणतात ती हीच.'**

**वेदान्त** हा नुसता बौद्धिक वाद नसून '**वेदान्त म्हणजे विश्वव्यापी प्रेम–ईश्वरी प्रेम**' असा त्यांचा ठाम सिद्धान्त असे. वेदान्ताचा तात्विक अनुवाद करणें, बुद्धीला **वेदान्त** समजणें, किंवा बुद्धीची खात्री पटणें, एवढ्यानेंच केवळ **स्वामींचा वेदान्त** समजला असें म्हणतां येणार नाहीं. **विश्वव्यापी प्रेम ही या वेदान्ताची खूण आहे.** 'यद्दृष्टं तन्नष्टं' ही भावना झाली, सर्व जडाचा निरास होऊन तद्व्यतिरिक्त अशा आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला, आपणांत सर्व व सर्वांत आपण अशी आत्मौपम्य बुद्धि बाणली म्हणजेच अशा प्रेमाचा मनुष्याच्या अंतःकरणांत उदय होतो; पराशांति नांदूं लागते, सर्वत्र ईश्वरच दिसूं लागतो, सर्व वादविवाद विराम पावतात, झाडून सर्व दुःखें विलयास जातात, भीति, शंका, दौर्बल्य यांचा मागमूसही उरत नाहीं; आणि सर्व वासनांचा पूर्णपणें क्षय होतो. धारण केलेलें तेवढें स्वतःचें शरीर ही संकुचित भावना नाहींशी होऊन सर्व चराचर हे आपलें शरीर आहे, त्याचे आपण साक्षी–देही आहों, असा अनुभव येऊन मनुष्य आनंदाच्या पराकोटीप्रत जाऊन पोहोंचतो. अशी स्थिति ज्या मनुष्याला प्राप्त झाली तो खरा वेदान्ती होय. **स्वामी हे** या वेदान्ताची मूर्तिमंत प्रतिमा होते. त्यांच्या सर्व उद्गारांत हें विश्वव्यापी प्रेम भरून राहिलेलें होतें. किंबहुना त्यांचें प्रत्येक वाक्य प्रेमाच्या मुशींतून ओतल्यासारखें भासतें. यच्चयावत् स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं भरलेल्या सत्स्वरूपाची जाणीव प्रत्येकाला करून द्यावी ह्या उदात्त हेतूनें ते प्रेरित झाले होते. यामुळें त्यांच्या प्रत्येक शब्दांत इतकें अद्भुत प्रेम भरलेलें दिसतें. स्वामींच्या ठिकाणीं हें असलें अद्भुत प्रेम ओतःप्रोत भरलेलें होतें याची आणखी साक्ष म्हटली म्हणजे, '**स्त्रीपुरुष रूपानें नटणाऱ्या परमेश्वरा**' यासारखे व्याख्यानाच्या प्रारंभाचे शब्द व '**प्रेममया ईश्वरा**' या सारखे खासगी पत्रांतील शब्द हे आहेत. आणि स्वामींनीं सर्व जगाला लोहचुंबकाप्रमाणें आकर्षून घेतलें तें याचमुळें.

## राम व मी.

स्वामी हे उपरिनिर्दिष्ट वेदान्ताची साक्षात् प्रतिमा होते याचीं आणखी दोन ठळक उदाहरणे देतो. स्वामींच्या सर्व व्याख्यानांतून, काव्यांमधून आणि उद्गारांमधून 'मी' हा शब्द वापरण्यांत येत नसून—क्वचित् 'प्रसंगखेरीज-करून—त्याबद्दल "राम" हा तृतीयपुरुषी शब्दप्रयोग येतो. "मी" शब्द देहात्मबुद्धीचा दर्शक अशा संकुचित अर्थानें रूढ झालेला आहे, व स्वामीतर '**सर्वं खल्विदं ब्रह्म**' या श्रुतिप्रतिपाद्य ब्रह्मानुभवावर आरूढ झाले होते, आत्मसाक्षात्काराच्या योगाने आपणां सर्वांच्या हाडींमासीं खिळून गेलेल्या संकुचित देहात्मबुद्धीचा त्यांच्या ठिकाणीं पूर्ण निरास झालेला होता. त्यामुळे '**सर्वं वासुदेवमिति**' ही अत्युच्च भावना जागृत करणारा तृतीयपुरुषी 'राम' हा शब्द त्यांनीं उपयोगांत आणावा हेंच योग्य व ओघप्राप्त होय. सारांश 'मन रामीं रंगलें अवघे मनचि राम झाले। सबाह्य अभ्यंतरीं अवघे रामरूप कोंदले" या व्यापक व उच्च अनुभवपदावर **स्वामी** आरूढ झालेले होते हें ठरतें.

दुसरें उदाहरण म्हटलें म्हणजे

## राम बादशहा.

हा शब्दप्रयोग होय. स्वामी आपल्याला 'राम बादशहा' असेही म्हणत. ते एके ठिकाणीं लिहितातः-'मी रामबादशहा आहे व तुमचीं सर्वांची अंतःकरणें हें माझें सिंहासन आहे. वेदांच्या रूपानें पूर्वी मी जगाला ज्ञान दिलें. कुरुक्षेत्र, जेरुसलेम, मक्का या ठिकाणीं मी धर्मोपदेश केला; पण माझें म्हणणें लोकांना बरोबर समजले नाहीं. यास्तव मी पुनः उपदेश करीत आहें. **तत्त्वमसि' हें माझ्या उपदेशाचें रहस्य होय.** तेंच तुमचें वास्तविक स्वरूप आहे, जगांतील कोणतीही शक्ति या तत्त्वाला प्रतिबंध करूं शकत नाहीं. कोणतेही राजे, असुर, किंवा देव, यांना या तत्त्वाचा प्रतिकार करितां येत नाहीं. घाबरूं नका. माझें शिर हें तुमचें शिर आहे. ते पाहिजे तर कापून टाका, त्यांतून हजारों नवीं शिरें उत्पन्न झाल्याशिवाय रहाणार नाहींत."

जगांतील सत्ताधीशांचे सात प्रकार केले आहेत, पण ब्रह्मानुभवी जीव-न्मुक्त हा वरच्या कोटीचा होय, असे वर्णन केलेलें दिसून येतें. या दृष्टीने स्वामींच्या "रामबादशहा" या शब्दांतील रहस्य समजेल असें वाटतें.

## ( ऊ ) सुधारक राम.

**स्वामी रामतीर्थ** हे सुधारकांचे अग्रणी होते. आजपर्यंत जगावर जे सुधारक झाले त्या सर्वांमध्ये हे ज्या वैशिष्ट्यानें चमकतात तें वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे 'अंतरंगी सुधारणा' हे होय. सुधारणा ही सुस्थिति प्राप्त होण्याकरितां करावयाची असते. तसेच जी सुधारणा वारवार बदलावी लागते, ज्या सुधारणेमध्यें वैगुण्य दिसूं लागतें ती खरी सुधारणाच नव्हे. सुधारणा हीं उपदेशाची गोष्ट नसून वर्तणुकीची बाब आहे. **सुधारणा हा एक आचारविधि आहे.** अर्थात सुधारणा ही प्रथमतः व्यक्ति विषयकच असली पाहिजे. अशा प्रकारची वैयक्तिक सुधारणा म्हणजे काय, व ती कशी करावी. या विषयावर निव्वळ प्रवचनें झोडण्यांत, अथवा सुधारकाश्रम अथवा तत्सम संस्था काढून अवडंबर माजविण्यांत स्वामींनी आपला काळ घालविला नाहीं. त्यांच्या मतें ज्या प्रकारचा सुधारक बनावयाचें होतें, समाजामध्यें सुधारणांचें स्वरूप जसें असावें असें त्यांना वाटत होतें. त्या प्रकारच्या सुधारणा प्रथम त्यानीं स्वतःमध्ये केल्या आणि स्वतःच्या ध्येयाप्रमाणें ते 'सुधारक' बनले. ही स्थिति प्राप्त करून घेतल्यानंतर त्यांनीं समाजाला सुधारण्याचा प्रयत्न केला. यांतच त्यांच्या सुधारणाचे व सुधारकत्वाचें रहस्य सांठविलेलें आहे.

एवढ्या वर्णनावरून स्वामी हे **स्वतः**चे सुधारक होते एवढें दिसून येतें. यानंतर त्यांच्या सुधारणांचें स्वरूप काय होतें तें पाहूं. त्यांच्या सुधारणा पुढें दिलेल्या तत्वांवर उभारलेल्या होत्या.

**( १ ) सुधारणा स्वतः बोलकी असावी. व स्पष्टीकरणार्थ वर्णनें अथवा जाहिराती यांची तिला जरूरी नसावी.**

**( २ ) 'सत्स्वरूपप्राप्ति' हें सुधारणेचें ध्येय असावें.**

**( ३ ) सुधारणेला बहुजनांच्या आवडी नावडीचें बंधन नसावें.**

( ४ ) सुधारणा ह्या सुधारकाला स्वतःला पटलेल्या असून त्यांचें प्रतिबिंब त्याच्या आचरणांत दिसत असावें.

( ५ ) सुधारणा ह्या दुःस्थिति निवारण्याकरितां करावयाच्या असतात. यास्तव आत्यंतिक सुखप्राप्ति हें ध्येय असले पाहिजे. हें ध्येय साधण्याकरितां प्रत्येक सुधारणेच्छूनें स्वस्वरूपानुभव करून घेणें इष्ट आहे. आणि ज्यानें स्वस्वरूपानुभव करून घेतला, त्याची आत्यंतिक दुःख निवृत्ति होते.

( ६ ) सुधारणेचें अवडंबर नसावें.

( ७ ) पूर्ण निर्भयता हें सुधारणेचें एक अंग असावे.

ह्या तत्वाचें निरीक्षण केल्यास स्वामींच्या सुधारणा अंतरंगी होत्या, बहिरंगी नव्हत्या असें पटतें. ह्या प्रकारची सुधारणा ज्या व्यक्तीमध्यें झालेली आहे असेच सुधारक समाजाला सुधारण्यास समर्थ होतील हें जाणूनच स्वामींनीं एक ' पाहिजे ' ची जाहिरात फडकाविली. ती पुढे दिल्याप्रमाणें आहे.

## ! पाहिजेत !

सुधारक.

दुसऱ्याचे नव्हत तर स्वतःचे.

योग्यताः—विश्वविद्यालयीन पदव्यानींच विभूषित नसून **स्वात्मविजयानें चमकणारे असावे.**

वयः—दिव्यानंद पूर्ण तारुण्य.

पगारः—भगवत्प्राप्ति.

## ! त्वरा करा, त्वरा करा !

येथें नम्र विनंति अर्जाचें काम नसून आज्ञायुक्त निश्चयाचे आहे.

पत्ताः—अखिल विश्वाचा नियंता.

आत्मदेव.

। ॐ । ॐ । ॐ ।

ही जाहिरात अजूनही फडकत आहे. जगांतील किती उमेदवारांनीं या जागेकरितां अर्ज केले असतील याची चौकशी मेहरबानी करून वाचकांनींच करावी. ज्यांना ही जागा मिळवी अशी इच्छा असेल त्यानीं ताबडतोब अर्ज करावे. आवश्यक तीं योग्यतापत्रें (Certificates) अर्जा सोबत जोडण्यास विसरूं नये. जागा खात्रीनें मिळेल.

वरील वर्णनावरून जरी स्वामींच्या सुधारणेचे स्वरूप वाचक वर्गाच्या ध्यानांत आलें असले तरी समाजांत या स्वरूपाच्या सुधारणा व्हाव्या याबद्दल स्वामीनीं काय केले, याच्या खुलाशाची अपेक्षा वाचक करीत असतील याकरतां त्याकडे वळूं.

सामाजिक, धार्मिक, अथवा राजकीय सुधारणांविषयींक ज्या ज्या चळवळी भारत वर्षात झाल्या त्यांनां यशस्वितेचीं गोड फळें चाखावयास न मिळण्याचें कारण त्यांतील त्यांतील कार्यकर्त्या पुरुषानीं झाडांच्या मुळा ऐवजीं फळे व पानें यांनां पाणी घातले हें होय. कारण स्वामी म्हणतात.

**" गरीब लोक हेच समाजाचे पाय किंवा पाया होत. जो शिरजोर समाज खालच्या वर्गातील लोकांच्या वाढीला अडथळा करतो, खालच्या वर्गातील लोकांच्या शिक्षणाच्या आड येतो, तो समाज आपण होऊन आपल्या घराचा पाया पोखरीत आहे, असें** ह्मणण्यास हरकत नाहीं.'

" कामगार वर्गावर प्रेम नाहीं हेंच त्या (औद्योकिग–ऐहिक अभ्युदयाच्या) ऱ्हासाचें कारण आहे."

या स्वरूपाचे इशारे स्वामींनीं निरनिराळ्या ठिकाणीं विविध प्रसंगाला उद्देशून दिलेले आढळतात. तसेंच धार्मिक व नैतिक बाबींसंबंधानेंही त्यांनीं काढलेलें उद्गार अपूर्व तेजानें चमकत आहेत.

' नीतिपाठ, सक्तीच्या आज्ञा, व्यवहाराचे कृत्रिम नियम यांनीं जगाची नीतिमत्ता कधीं सुधारणार नाहीं. ' त्वां अमुक करूं नये ' अशा प्रकारच्या निषेधांनीं जगाची सुधारणा होणार नाहीं. नीतिपाठ आणि धर्म-

**वचनें यांच्या जोरावर जगाची सुधारणा करूं पहाणें शुद्ध वेडगळपणाचें आहे. लोकांची नीति सुधारण्यास त्यांना खरें ज्ञान, जिवंतज्ञान शिकविणें जरूर आहे.**' लोकांची स्थिति सुधारण्याचा हाच यशस्वी मार्ग आहे. त्यांना आध्यात्मिक नियम समजावून देऊन त्यांचें अज्ञान नाहींसें करणें हाच लोकांना सुधारण्याचा खरा मार्ग आहे' असे स्वामींचे मत आहे.

खरा सुधारक कोण व तो कसा असावा याविषयींचे स्वामींचे विचार अधिक खोल दृष्टीने पाहूं गेल्यास जो **आत्मोद्धार करितो तोच खरा सुधारक होय.** असें त्यांचें मत असल्याचें दिसतें. या त्यांच्या ह्मणण्याची सत्यता, बुद्ध, शंकराचार्य, रामदास, नानक, लोकमान्य, महात्मा गांधी वगैरे विभूतींची चरित्रे पाहिल्यास पटते. कित्येक लोक समाज सुधारणेचे हजारो प्रयत्न करितात, रात्रंदिवस त्याच कामांत मग्न असतात तथापि त्यांच्या हातून कांहींच होऊं शकत नाहीं. अगर जे कांहीं होते ते त्याच्या प्रयत्नांशीं ताडून पाहिल्यास त्यांच्या पासंगालाही पुरत नाहीं. आज देशांत नानाविध सुधारणा करणाऱ्या अनेक संस्था आहेत व अनेक सुधारक रात्रंदिवस त्यांतून अविरत श्रम करित आहेत; तथापि त्यांच्या कार्याकडे नजर फेंकिल्यास ते अगदीं थोडें आहे असे दिसतें. याचें कारण काय असावें ह्याचा विचार केल्यास त्या संस्थामधून काम करणाऱ्या पुरुषांची स्वतःचींच सुधारणा झालेली नसते. अगर झाली असल्यास ती फारच अल्प प्रमाणावर झालेली असते; असें पटल्याशिवाय राहणार नाहीं. कारण **व्यक्ति हा अखल दुनियेचा सर्वांत जवळचा** भाग आहे. तो ज्या मानानें हालला जाईल— सुधारला जाईल—त्या मानानें दुनिया सुधारली जाईल.

**दामन् अलूदा अगर् खुद् हमा हिकमत गोयद् ।**
**अज सुखन् गुफ्तने-जेबाश बदां बेह नशवंद् ॥**
**पांकी पाकीजा दिलस्त अर् बिनशीनद् खामोश ।**
**हम-अज सीरते साफीश् मर्साहत् शिनवन्द् ॥**

**भावार्थः**—ज्याचें आचरण शुद्ध नाहीं असा मनुष्य मोठ्या उपदेशाच्या गोष्टी सांगूं लागला तरी त्या उपदेशामुळें कोणी दुर्जनाचा सज्जन होणार नाहीं. पण उलटपक्षी ज्याचें चित्त निर्मळ आहे, त्यानें मौनव्रत धारण केलें असलें तरी त्याचें आचरणच इतरांना उपदेशाचे धडे देत असतें.

ज्याप्रमाणें सूर्यकिरणांनीं तापलेली हवा विरळ होऊन वर जाऊं लागतांच आसपासची हवा आपोआप त्या ठिकाणीं घुसून येते, त्याचप्रमाणें ईश्वरी उष्णतेनें तापलेला मनुष्य तापून अत्यंत विरळ होऊन वर चढतो, त्याचा आत्मोद्धार होतो, तेव्हां लोकांची इच्छा असो वा नसो चारी बाजूंच्या लोकांची एक दोन पावले वर बढती होण्यास तो कारण होतो. हा खरा सुधारक होय. सारांश, **खरा सुधारक प्रथमतः आत्मोद्धारी असला पाहिजे.** आतां ज्याला सुधारकाचें काम करावयाचें आहे अशा व्यक्तींकरितां स्वामींनीं एक इषारा दिला आहे. प्रथम लोकांचीं अंतःकरणें आपलीशीं करा आणि मग त्यानां शुद्धिवाट सांगा. ज्या ठिकाणी बुद्धि निराश होते, त्या ठिकाणी प्रेम यशस्वी होण्याची आशा करूं शकतें हा इषारा ध्यानांत धरिल्यास सुधारकावर अपयशाची छाया देखील पडणार नाहीं. याचे अगदी ताजें उदाहरण महात्मा गांधी हे आहेत.

### ( ऋ ) संत कवी राम.

**स्वामी रामतीर्थ** हे श्रेष्ठ प्रतीचे कवी होते, ही गोष्ट महत्वाची होती एवढेंच नसून ते जन्मतःच कवी होते. कवि हे जन्मास येतात, तयार होत नसतात. ह्यांचें काव्य इंग्रजी व उर्दू या दोनच भाषेमध्यें प्रसिद्ध आहे. त्यापैकीं प्रत्येकाचा थोडक्यांत विचार करूं.

स्वामींची कविता वाचीत असतांना त्यांत संत कवीच्या ठिकाणीं दिसणारा प्रासादिक प्रेमळपणा हा गुण प्रामुख्यानें दिसून येतो. जागोजाग त्यांच्या ठिकाणचें दिव्य प्रेम, सत्स्वरूपाची जाणीव आणि दिव्यानंद हीं प्रत्ययास येतात. स्वामींची प्रतिभा जरी अत्युच्च दर्जाची होती तरी तिच्या जोरावर त्यांनी हव्या तशा व हव्या तितक्या उंच भराऱ्या न मारितां स्वानुभवाच्या मजबूत पंखांवर आरूढ होऊन त्यांना जितकें उंच जातां आलें तितकें ते

मेले. व त्यांच्या बरोबर वाचकालाही तितके उंच नेण्याची ताकद व आकर्षण त्यांच्या काव्यांत दिसते.

त्यांच्या काव्यापैकीं पुष्कळसे काव्य वेदान्तपर व स्वानंदपर असून बाकीचें काव्य भक्तिपर, वैराग्यपर व उपदेशपर आहे. या शिवाय स्वामींच्या काव्याचा आणखी एक मोठा भाग आहे व तो हिमालयांतून पाठविलेल्या पत्रांच्या रूपानें व्यक्त आहे. हीं पत्रें ह्मणजे **शेक्सपिअर** किंवा **रवींद्रनाथ टागोर** यांनीं लिहिलेल्या गद्य काव्यासारखे गद्य काव्य. असून त्यामध्ये सुद्धां उच्च कवीची खोल दृष्टी, निसर्गाशीं तादात्म्यभाव व त्याचें हृद्गत जाणण्याची अजब हातोटी हे गुण दृग्गोचर होतात.

सर्व संत कवींच्या ठिकाणीं दिसून येणारी भक्तिची, दिव्य प्रेमाची तीव्रता किंबहुना भक्तीची परिसीमा स्वामींच्या ठिकाणीही उत्कृष्टपणाने दिसून येते कारण ते लिहितातः—

## दिव्यप्रेम.

**घे जीवित दयिता माझें। स्वीकारुनि पावन कीजे। सकळही ॥ १ ॥**
**स्वीकारीं या हृदयाला। तूं पूर्ण भरीं रे त्याला। प्रेमला ॥ २ ॥**
**कर नेत्रांचा स्वीकार। मद चढो त्यांस अनिवार। ईश्वरा ॥ ३ ॥**
**सत्यास्तव कर घे दोन। त्यां नित्य ठेव गुंतवुन। सत्पथीं ॥ ४ ॥**
**त्या सुंदर लोचनतारा। सुविचार प्रकाशमारा। करिति ज्या ॥ ५ ॥**
**ते सुरक्त सुंदर ओष्ठ। जेथुनि शब्द सुश्लिष्ट। निसरतीं ॥ ६ ॥**
**हृदयाचा घेती ठाव। विहगांचा जेविं विराव। गायनीं ॥ ७ ॥**
**जाणा ते सुंदर हात। जे शूर कर्म करितात। सत्यही ॥ ८ ॥**
**प्रत्येक पळाच्या ठायीं। दिनभरी काम चपळाई। करिति जे ॥ ९ ॥**
**मीं कधीं जन्मलों नाहीं। वाढलों न वा मेलोंही। सत्य हें ॥ १० ॥**
**देहाचे सकळहि धर्म। सृष्टीचें मूकचि कर्म। चालवी ॥ ११ ॥**
**ती अहंकारकृत करणी। पेरुनी पिकाला आणी। क्षेत्र हें ॥ १२ ॥**
**मी निर्विकार ओंकार। त्या करणी पासुन दूर। राहतों ॥ १३ ॥**

संतकवींच्या ठिकाणीं शांतीचें माहेरघर असतें. ही असामान्य व व्यापक शांति स्वामींच्या ठाईं किती व कशी होती त्याचें प्रतिबिंब त्यांच्यापुढें दिलेल्या उताऱ्यावरून येईल.

## अलोट शांति.

तटिनी सम धांवत येई । ती शांती माझ्या ठाईं । सर्वदा ॥ १ ॥
अब्धीसम लोळत येई । ती शांती माझ्या ठायीं । सर्वदा ॥ २ ॥
गंगेसम वाहत येई । ती शांती माझ्या ठायीं । सर्वदा ॥ ३ ॥
बोटांतून रोमांतुन । येतसे वरी वाहून । शांतता ॥ ४ ॥
वैवाहिक शेला आण । सोनेरी जेथें किरण । खेळती ॥ ५ ॥
सुटलासे अंतरपाट । अज्ञानपटल घनदाट । घालवी ॥ ६ ॥
मालांनो ! दिधली छाती । लोळाहो लोळा वरती । स्वैरशा ॥ ७ ॥
आनंद नयनबिंदूंची । कुसुमें हो तुमचीं साचीं । शोभती ॥ ८ ॥
तेजाचीं वलयें भंवतीं । मस्तका फार भूषविती । नवल हें ॥ ९ ॥
जीवींचें मधुरामृत हें । वारुणी जादुमय वाहे । सारखी ॥ १० ॥
देहाच्या आणि मनाच्या । टाकी त्या भरुनी खांचा । सत्वरीं ॥ ११ ॥
या मत्स्यानों, श्वानांनों, । या सृष्टींतिल शक्तींनों, । सकळही ॥ १२ ॥
पशुपक्षि असाना कोण । या सर्वांहि संतोषून । मजकडे ॥ १३ ॥
प्या रक्त घटाघट माझें । खा मांस पोटभर ताजें । निर्भय ॥ १४ ॥
या, या, हो सगळे या हो । वैवाहिक भोजन खा हो । मामक ॥ १५
सूर्य, चंद्र, सागर, तारे, । नाचविती मजला सारे । रसभरें ॥ १६ ॥
वासना, भावना, वारे । नाचविती मजला सारे । रसभरें ॥ १६ ॥
ते वारिद चित्तपसारे । नाचविती मजला सारे । रसभरें ॥ १७ ॥
मी आनंदानें गातों । मी नादब्रह्मीं जातों । मिसळुनी ॥ १८ ॥
मी अनंतगीता ठाई । शब्दासम विरुनी जाई । निश्चयें ॥ १९ ॥
ज्ञेय मीच तैसा ज्ञाता । मीच सागर तैशा लाटा । एकला ॥ २० ॥
संसार बुडबुडा उठतो । मम जळावरी तो फुटतो । भंगुर ॥ २१ ॥

तसेंच

सोन्याची—लगड असें मी साची—शुद्धि पहा तनुची ॥
विश्वास—न वसे तव खास—मापी देहास ॥
वेल्हाळ—करि मम चाळाघोळ—घडवीं हृन्मेळ ॥
हें सुखद—तेंही वाटे सुखद—देवा आल्हाद ॥
प्रेमभरे—तूं ह्मण प्यारे प्यारे—दे वा असिधारे ॥
जीवंत—अथवा कर देहांत—मी रत नामांत ॥
त्वद्द्वारीं—आतां धरणेंच धरीं—घालवि मज दूरी ॥
फुंकून—आकाशीं भूवरुन—उडवीं हटकून ॥
रक्षेंत—लोळव, त्याहि स्थितींत—राहिन निश्चिंत ॥
नशिबाला—कुठल्याही काळाला—लाविन नच बोला ॥

ही कविता पहा.

वरील उताऱ्यांवरून त्यांच्या भक्तीची व शांतीची चांगलीच कल्पना येते. परमेश्वर दर्शनासाठीं हपापलेले, नामदेव, तुकाराम, रामदास, तुळशीदास, यांची जी मनः स्थिति झालेली होती तिचेंच प्रतिबिंब यांत दिसते. अथवा तुळशीदासांच्या ठिकाणीं जो भक्तीचा जिव्हाळा होता, हुबेहुब तोच जिव्हाळा ह्या त्यांच्या वंशजांत दिसून येतो. प्रेमानंदांत मग्न असतां प्रभु रामचंद्र आले होते हेंही माहित न होण्याइतकी बेखुदी तुलसीदासांवर आल्याचें वाचकवर्गाला माहित आहे. तशीच अवस्था स्वामींची झालेली होती हें त्यांच्या पुढील कवितेवरून दिसेल.

## भक्तीची परिसीमा.

**इष्कका तूफा बपा है, हाजते मयखाना नेस्त ।**
**खू शराबो दिलकबाबो, फुरसते पैमाना नेस्त ॥ १ ॥**
**सख्त मखमूरी है तारी, ख्वाह कोई कुछ कहे ।**
**पस्त है आलम नजरमें, वहशतें दीवाना नेस्त ॥ २ ॥**

अल्विदा ऐ मर्जे दुनिया ! अल्विदा ऐ जिस्मों जाँ।
ऐ अतश ! ऐ जू ! चलो, ईजां कबुतरखाना नेस्त ॥ ३ ॥
क्या तजल्ली है यह नारे हुस्न, शोला खेज है।
मार ले परही यहां पर ताकते, परवाना नेस्त ॥ ४ ॥
मिहर हो मह हो, दबिस्तां हो, गुलिस्ताँ कोह सार।
मौजजन अपनी है खूबी, सूरते बेगाना नेस्त ॥ ५ ॥

**भावार्थ**—प्रेमाचा ( दिव्यभक्तीचा ) प्याला परिपूर्ण भरून आला आहे. यामुळे आतां दुसऱ्या शराबखान्याची ( दारूच्या गुत्त्याची ) आवश्यकता नाही. यावेळीं स्वतःचे रक्त हें दारुप्रमाणे व चित्त पेल्याप्रमाणे वाटत आहे. यास्तव दुसऱ्या कोणत्याही प्याल्याला आता येथे ठाव नाही. प्रेम-मदाची गुंगी अत्यंत चढली आहे. यास्तव कोणी कांहींही ह्मणो पण संसार मात्र तुच्छ वाटूं लागला आहे. असे असून सुद्धां ही अवस्था पागल ( वेडा ) मनुष्याच्या अवस्थेमारखी नाहीं. अरे, जगांतील रोगांनो ! देह प्राणांनो ! आतां तुह्मांस राम राम असो. ए तृष्णे, ए क्षुधे ! तुह्मी मजपासून दूर व्हा. हें जग ह्मणजे कांहीं तुह्माला रहाण्याचा कबुतरखाना नाही. अहाहा ! सौंदर्याचे तेज कसे झळकत आहे ! अशी कोणती शक्ति आहे कीं, जी त्याचा पाडाव करूं शकेल. सूर्य जरी चंद्र, व पाठशाळा बाग अथवा पर्वत बनली तरी या प्रत्येकामध्ये एक विशिष्ट प्रकारचें तेज चमकत आहे.

( वरील कवितेचे रूपांतर ).

## भक्तीची परिसीमा.

( चंद्रकांत राजाची )

कांठोकांठचि दिव्य भक्तिचा घडा भरूनि आला।
आतां आवश्यकता कोठे शराबखान्याला ? ॥ १ ॥
या समयीं मम रक्त वारुणी चित्त गमें पेला।
याहुनि दुसऱ्या प्याल्यासाठीं ठाव नसे उरला ॥ २ ॥
प्रेमाची मजवरती गुंगी फार असे चढली।
संसाराची पूर्ण तुच्छता मनांत या भरली ॥ ३ ॥

प्रेमभरें संसारापासुनि होतों निर्वेद ।
परि न पागलापरी अवस्था येथें बहु भेद ॥ ४ ॥
हे रोगानों ! हे प्राणांनो ! तुम्हां रामराम ।
हे तृष्णे ! हे क्षुधे ! तुह्मि असा आतां लामलाम ॥ ५ ॥
खास खास हें जग नच तुमचा कीं कबुतरखाना ।
मग कां दंगल येथे तुमची दूर कां रहाना ॥ ६ ॥
अहा, पहा तें तेज झळकतें किती सौंदर्याचें ।
पाडाव करूं शके असें बल आहे कवणाचे ? ॥ ७ ॥
सूर्य तो जरी चंद्र जाहला, गिरि उपवनशाला ।
तेज विशिष्टचि चमकत राहिल तरि प्रत्येकाला ॥ ८ ॥

स्वामीच्या ठिकाणीं **रामदासांची** सूक्ष्म दृष्टी व तत्कालीन परिस्थितीचे सूक्ष्मावलोकन करून त्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग दाखविणारा '**रामदासी** विवेक' होता असे दिसते. आणि याचमुळे त्यांचे या बाबतींतील बोलही **रामदासां**सारखे रोकडे आहेत. स्वामींचें 'वेदान्त' पर सर्व काव्य विशेषतः 'वेदान्तगिरी' व 'आकाशवाणी' हे दोन भाग तर अति जोरदार असे 'खडे तात्विक बोल' च आहेत. ते सर्वच्या सर्व जरी या स्थळी देतां येणें शक्य नाहीं तरी त्याचा नमुना मात्र पहावयास सांपडेल. आधुनिक परिस्थितीचे निरीक्षण करून भारतवर्षाच्या शारीरिक, बौद्धिक, व मानासिक ऱ्हासाची चिकित्सा त्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें केली आहे:—

**क्या है आजादी ? जहां जब जैसा जी चाहें करें ।**
**खाना पीना एश-गुलछरोंमें सब दिन काट दें ? ॥**
**राग शादी नाच अशरत-जलसे रंगा रंगके ।**
**बंगाले बागाते आली योरोपियन ढंगके ॥**

---

१ लांब लांब, दूर. दूर.

१ स्वास्थ, क्षेम, २ जीव, मन. ३ विषयोपभोगामध्यें ४ घालवितात. ५ ऐश, चैन. ६ विषयांनंदाचें जलसे. ७ बागांच्या ओळी.

कतां टोपीकी नयी, फैशनें निराला बूटका ।
दिलकशो-बेदांग खिलना बदनपर वह सूटका ? ॥
दिलको रंगत जिसकी भांये शादी बेखटके करें ।
धर्मकी आयीनें चुपके ताकपर तै कर धरें ? ॥
कोट पैहनता है नौकर, जूता पैहनाये गुलाम ।
मुंहमें गटगट सोडावॉटर और सिगारोंका धूंवां ।
जोंफकी दिलमें शिकायतें, रामकी अब जा कहां ? ॥
क्या यह आजादी है ? हाय ! यह तो आजादी नहीं ।
अस्प हो आजाद सरपट, कैद होता है स्वार ।
अस्पें हो मुतलकें इनां, हैरान रोता है स्वार ॥
इंद्रियोंके घोडे छूटे बॉंग डोरी तोड कर ।
वर मरा वह गिरपडा, स्वार सिरपर मुंह फोड कर ॥

## वरील कवितेचें रूपांतर.

### आरोग्य.

( **फटका**—भल्या माणसा ).

मना मानले तैसे करणें भक्षण करणें आणि पिणें ।
दिवसांचे ते दिवस कष्टजित विषय सेवनीं घालविणें ॥ १ ॥
बागबगीचे नवे बंगले खास युरोपिय धर्तीचे ।
नाच रंग जलसे लसणारे पोषक विषयानंदाचे ॥ २ ॥

---

१ पद्धत, स्वरूप, किनारी. २ फॅशन. ३ चित्ताकर्षक. ४ 'सूट' पोषाख. ५ मानवली, पसंत पडली. ६ एकदम. ७ नियम, शास्त्राज्ञा. ८ धुडकावून लावतात. ९ १० घालतो. ११ धूर. १२ कमजोरी, निःशक्तता. १३ तक्रार. १४ जागा. १५ घोडा. १६ पूर्णपणें. १७ ताब्यांत, काबूमध्यें. १८ लगाम वगैरे सामान.

डोई टोपी नवरीतीची पायीं झळके नव बूट ।
वदनि खुलावण नवरंगाची अंगावरि सुंदर ' सूट ' ॥ ३ ॥
चंचल चकव्या चित्ताश्वाचे चोज पुरविणें चैनीने ।
धरूं नये तसल्याची संगत धरुनि धर्मपदि तुडवीणे ॥ ४ ॥
अंगावरती कपडे ल्याया किंकर आवश्यक एक ।
बूट चढविण्यासाठीं दुसरा लागे पायां प्रत्येक ॥ ५ ॥
सोडावॉटर पिउनि बाटल्या रित्या करुनियां तळ बघणें ।
सिगर फुंकुनि धूर करुनी अंतरिक्ष सारें भरणें ॥ ६ ॥
अशक्ततेची ओरड करुनी रामा विन्मुख होणें ।
आरोग्याची स्थिती काय ही ! हाय हाय ! हे फुकट जिणें ॥ ७ ॥
निजवाजीचा भार हराया जैसा माथां घे स्वार ।
बद्ध होउनी कैदेमाजी मग तो रडतो अनिवार ॥ ८ ॥
सर्वबंधने तोडुनि घोडा इंद्रियरूपी सुटलासे ।
दूर पळाला, स्वार मात्र तो पडुनि तोडघाशि मेलासे ॥ ९ ॥
या साठीं चालतसे ज्याचा देहमनावरती ताबा ।
खऱ्याखुऱ्या तो आरोग्याचा भोक्ता असतो रे बाबा ॥ १० ॥

या स्थितीवर स्वामी रामबाण उपाय सुचवितातः—

**हां वह आजाद है जो कादिर[1] है दिलपर जिस्म[2]पर ।**
**जिसका मन काबूमें[3] है ........................ ॥ १ ॥**

याच उपायाचा अवलंब आज राष्ट्राला नको का करावयाला ? वाढत्या गरजांना पायबंद दिल्याशिवाय राष्ट्रामध्ये साधी राहणी व नीतिमत्ता यांची वाढ कशी होणार ? जे भारतवासी आपल्या वशिष्ठादि ऋषींचे वंशज ह्मणवितात, ज्यांचे पूर्वज जिवंत वेदान्त होते तेच भारतवासी या अवनतावस्थेंत कां आहेत ? तर ते बदलणाऱ्या निसर्गाबरोबर न बदलतां त्या ऋषींच्या बाह्य कर्मांची निव्वळ कवाईत करीत आहेत व आपल्या पूर्वजांची बढाई सांगण्यांत संतुष्ट व गर्क आहेत. आणि

---

१ बलवान्, वशी. २ देहावर. ३ ताब्यांत.

**सनद सर्टीफिकेट डिगेरी की ।**
**आर्जूमें है कैदे-गम तन की ॥**

या आधुनिक काळांतील शृंखला आपल्या पायांत अडकवून घेतल्या आहेत म्हणूनच भारतवासीयांचा र्‍हास झाला असें सांगून त्यावर स्वामी पुढील उपाय सुचवितात.

**ब्राह्मणो! आप सीख् लो विद्या ।**
**फिर यह घरघर फिरो पढाते जा ॥**

कारण वेदांताची हीच सक्तीची आज्ञा आहे. वेदान्तानें तुम्हाला आळशी अथवा अवनत बनविले नाही असेच त्यांचें मत होते. रामदासांचा मठ योजना, स्वावलंबी व भिक्षा मागून पोट भरणारे ब्रह्मचारी तयार करण्याची क्लृप्ति, व तद्वारें शिक्षणाचा प्रसार करण्याची योजना, या सर्वांसारखीच ही स्वामींची योजना नव्हे का?

भारतोद्धार झाला म्हणजे भारतवासीयांचें काम संपले ही संकुचित भावना स्वामींची नसून अलम दुनियेला उद्धृत करणे हेच भरताचें काम आहे. याकरितां त्याने अद्वैत वेदांतांच्या दैवी जगांतील प्रत्येक मनुष्याला काढाव्या आणि त्याकरितां भारत पुत्रांनी सर्व जगभर प्रवास करावा असे त्यांनी आपल्या आकाशवाणीत" सांगितलें आहे. या कृतीने प्यारे भारतखंड 'महाभारत' बनल्याशिवाय राहील कां? ह्या उपदेशांत स्वामींनीं अत्युच्च व अतिव्यापक अशा 'मिशनरी' हिंदूधर्माचा उपदेश केलेला नाहीं का? विधर्मी मिशनरी जसे काम करितात तशाकरितां नव्हे हें येथें नमूद करणें जरूर आहे.

उपदेशपर कवितांमध्ये स्वामींनीं पुष्कळ ठिकाणीं रामदासाप्रमाणे चंचल मनाला चुचकारून व गोड बोलून उपदेश केला आहे. याचा मासला म्हणून-

---

१ पदवी (बी. ए. एम्. ए. वगैरे). २ विनंतीमध्यें. ३ अहंकाराच्या कैदेंत.

* या मथळ्याखालीं लिहिलेल्या कविता पुष्कळ असल्यानें त्या येथें देतां आल्या नाहींत पण त्यांतील सार वर दिलें आहे.

'जाग रे लाल[1] जाग तेरे ! घर रे सदा सुहाग[2] रे ।
सूर्यवत् उगरे भागरे ! सब फिकर[3]को परे[4]कर धरो रे ।
है 'राम' तो सदा ही पास[5] रे ! हँस खेल क्यों उदासरे ।

अर्वाचीन संस्कृतीवर स्वामींनीं पुढें दिल्याप्रमाणें शेरा मारिला आहे.

' मैं नहीं हूं खुदा ' यह कलियुग है ।
' जिस्म[6]ही हूं' यकिन[7] यह कलियुग है ।
' जिस्म है आत्मा ' यह कलियुग है ।
' चारर्वाकों का मत[8] ' यह कलियुग है ।
बंदा-ए-जिस्म[9] ही बने रहना ।
सब गुनाहोंका घर, यह कलियुग है ॥

संत हे ' अहंब्रह्मास्मि ' चा कसा अनुभव घेत असतात, त्यांचा ' आत्म-विकास ' केवढा झालेला असतो, याचें प्रत्यंतर स्वामींच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं येतें. स्वामीचें ' निजानंद मस्ती ' व ' आत्मज्ञान ' या विषयांवरील काव्य फार मोठें असून त्यांत वरील ह्मणण्याची सत्यता दिसते. तथापि त्याचा थोडा नमुना पुढें दिला आहे.

उचंबळति ते समुद्र सारे नद्यापुढे चालती ।
तयांची माझ्या ठायीं गती ॥ १ ॥
सुमनें मत्तोषास्तव हंसती, वात मंद वाहती ।
तयांची माझ्या ठायीं गती ॥ २ ॥
जत्रा मोठ्या भरती समरीं महारणें माजती ।
तयांची माझ्या० ॥ ३ ॥
निसर्ग विलसे तुंग शैल ते डोकीवर उचलिती ।
तयांची माझ्या० ॥ ४ ॥

---

१ प्यारे मना. २ सुस्थितींत. ३ काळजीना. ४ सोडून दे, टाक. ५ जवळ ६ शरीर. ७ खरोखर. ८ चार्वाकमत, नास्तिकमत. ९ देहासक्त बनणें, शरिराचा गुलाम बनणें.

तारे तुटती धूमकेतु ते गगनिं उदय पावती।
तयांची माझ्या० ॥ ५ ॥
शीत वात झोंबती यष्टिला कृष्ण मेघ गर्जती।
तयांची माझ्या ठायीं गती ॥ ६ ॥
शत्रु कडकडा भांडति मित्रहि मित्रां सांभाळिती।
तयांची माझ्या ठायीं गती ॥ ७ ॥
मातां निजती परंतु त्यांचीं बाळे आक्रंदती।
तयांची माझ्या ठायीं गती ॥ ८ ॥

(१) ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं. (२) गुरूशिवाय ज्ञान नाहीं आणि (३) गुरू हा खुद्द परमेश्वरस्वरूप असतो, तो परमेश्वराप्रमाणे अतुल्य, अनुपम, व अनंत असतो ही जी संतकवींची आधारत्रयी तीं स्वामींचीही आहे. ही गोष्ट जशी त्यांनीं आपल्या व्याख्यानांतून प्रतिपादलेली आहे तशी आपल्या गुरूस्तुतीपर, वेदान्तपर आणि आत्मज्ञानपर काव्यांतही आहे.

देहाची क्षणभंगुरता, संसाराची असारता आणि कटु अनुभवाचें भेसूर वर्णन, ह्या गोष्टी जशा बहुतेक संतकवींच्या काव्यामधून प्रामुख्यानें आढळतात तशा स्वामींच्या काव्यांत आढळत नाहीत. उलटपक्षीं आत्मोद्धारापासून पराङ्मुख करणाऱ्या संसारिक जगांतील गोष्टी व देहभावाच्या खोल गर्तेत ढकलून देणाऱ्या गोष्टी यांचा त्यांनीं निसुटता उल्लेख करून त्यापासून सावध रहाण्याचा इषारा दिला व त्याच्याच बरोबर जगांतील प्रत्येक सृष्ट पदार्थाचा योग्य—उन्नतीला, शाश्वत उन्नतीला पोषक—असा उपयोग करण्यासाठींच सर्व वस्तु परमेश्वराने उत्पन्न केल्या आहेत; मनुष्याला आत्मोद्धार पराङ्मुख करण्याकरितां केलेल्या नाहींत. कारण परमेश्वर हा अत्यंत दयाळु असून मनुष्यांना उन्नत करण्यासाठींच बसला आहे. याकरितां सृष्टींतील जे जे पदार्थ आपल्याला आधोगतीला नेण्याला कारणीभूत आहेत असें वाटतें; ते ते पदार्थ तसे नसून त्यांच्याकडे पहाण्याची आपली दृष्टि चुकली आहे. याकरितां प्रत्येक वस्तूंतील चांगलेपणा पहाण्यास शिकणें मी अजर, अमर, अविनाशी, सर्वव्यापी आहें अशी भावना करणें, 'मी पापी, मी

अनाथ, ही भावना अजीबात सोडून ' मै खुदाहूं ' मै खुदाहूं ' मै रामही राम ' ही भावना करणे अशी वेदान्तार्ची शिकवण आहे. कारण हे सर्व दृश्य, आपल्या कल्पनेचा, भावनेचा परिणाम आहे यास्तव मी सच्चिदानंद स्वरूप आहे अशी उच्च भावना केल्यास खरोखर आपण तसेच बनूं अशी वेदान्ताची शिकवण आहे. असे स्वामींनीं जागोजाग प्रतिपादिलेलें आहे.

आत्मानुभवाचें, निजानंदाचें वर्णन करीत असतांना ज्ञानेश्वरीचा ' अमृतानुभवा' मध्ये जशा उपमा दृष्टांत देण्याचा एक विशेष दिसतो, तसाच स्वामींचाही दिसतो. जसेः—

[ या कवितेत स्वामींनीं ईश्वराला सेवकाची उपमा दिली असून ते पुरुषाला उपदेश करीत आहेत. ]

( **गजल**—कैहरवा )

**वाहवा कामांरे नौकर मेरा, सुगर सियाना रे। नौकर मेरा ( टेक)**
**खिदमत करदयां कदे न डरदा, रोजे अज़ल तो सेवा करदा।**
**लूं लूं दे विच रेहंदा बरदा, हरशै-समाना रे नौकर मेरा॥वाह०॥१॥**
**जद मौला पन छडदा, नौकर नखरे टखरे फडदा।**
**फिर भी टैहल ओह पूरी करदा,हर नाच नचानारे नौकर मेरा॥वा० २**
**बादशाही छड अर्दल मल्ली, पर यह शाहकोलों कद चल्ली।**
**नौकर नू उठ चौरी झली, हाय बीबा राना नौकर मेरा॥ वाह०॥३॥**
**बेसमजी दा झगडा पाया, नौकर तो इतबार उठाया।**
**विचदलीलां वकत गँवाँया,विसहे गजब निशाना रे नौकर मेरा।वा०४**
**लाया अपने घर विच डेरा, राम अकेला सूरज जेडा।**
**नूर जलाल है नौकर मेरा, दिगर न जानारे नौकर मेरा॥ ५॥**
**सुघड सियाना रे नौकर मेरा, वाह वाह कमां रे नौकर ( टेक )**

**भावार्थः**—काम करणाऱ्या माझ्या नौकरा शाबास ! माझ्या बुद्धिवान् नौकरा शाबास ! वाहवा !

१ माझा नौकर ( ईश्वर ) सेवा करण्यांत कधीही कसूर करीत नसून अनादिकालापासून त्याची नौकरी चालूच आहे. शिवाय माझ्या रोमरोमांत बसून सर्व वस्तूंत रमतो असा माझा नौकर आहे.

( २ ) जेव्हां ईश्वर आपल्या ईश्वराला सोडतो ( जेव्हां पुरुष आपली तत्वदृष्टी टाकितो ) तेव्हां हा नौकरही ढंग दाखवूं लागतो. तथापि सेवा मात्र पूर्ण करितो. असा हा माझा नौकर हरकाम्या आहे.

( ३ जेव्हां याने तत्वदृष्टि सोडून द्वैतदृष्टि पत्करली ( मी पापी, पापात्मा अशीं दृष्टि ) अर्थात बादशाही सोडून चपराशीपणा घेतला व सेवा घेण्याऐवजी सेवा करूं लागला. तेव्हां तडाखे देऊन ही त्याची दृष्टि हा नौकर दूर करितो. म्हणून हा माझा नौकर फार लायक आहे.

( ४ ) जो पुरुष आपल्या नौकरावर ( ईश्वरावर ) विश्वास टाकित नाहीं तो आपल्या घरांत मूर्खपणानें झगडे आणून कालाचा अपव्यय करितो. अरे प्यारे ! हा माझा नौकर तेव्हांच धोक्याचे निशाण फडकावतो.

( ५ ) सूर्यरूप रामबादशहा आपले अस्सल स्वरूप बनला तेव्हां नौकरही तसाच आढळला.

अरे ! हा माझा नौकर फारच बुद्धिमान् व काम करणारा आहे.

## ( कवितेचें रूपांतर. )

मत्सेवक सेवाकर्मी न करीत कधीहि कसूर ।
प्राचीनकाळपासून निजकर्मी आहे चूर ।
वस्तूंत मम प्रतिरोमीं वास्तव्य वाहवीपूर ।
परपुरुष ब्रह्म जै त्यजितो ।
तैं नौकर नखरे करितो ।
परि सेवे नच अंतरतो ।
खेळाडु नोकरा तव हे शाबास खेळ महाशूर ॥ १ ॥
अद्वैत दृष्टि सोडून द्वैताचा आश्रय केला ।
टाकुनियां सेवाग्रहण सेवापर आपण झाला ।
हें करणें परपुरुषाचें नौकरा न ये मर्जीला ।

नोकरावरी विश्वास ।
ठेवितो न तो नर खास ।
उत्तेजन दे तंव्यास ।
शाबास नौकरा माझ्या परपुरुषा आणिसि ताळां ॥ २ ॥

श्रीमंत **राम** सुलतान विश्वाचा भास्कर खास ।
कांरतसे मूळच्या रूपीं योगबळें जेव्हां वास ।
नोकराविना या कोणी आढळे न तेथें त्यास ।
रामास अर्पितो सेवा ।
धन्य धन्य नौकर देवा ।
मूर्तिमंत चिन्मद ठेवा ।
**राम** तैं विसरला भान । पाहुनी सुमंगल दास ॥ ३ ॥

स्वामींचीं चातुर्वर्ण्याबद्दल मते जगांतील सर्व जातींचें निरीक्षणानंतर ब्राह्मण कोण ? क्षत्रिय कोण ? वैश्य कोण आणि शूद्र कोण याची लक्षणें त्यांनीं ठरविली तीं जरी नवीन नाहींत, तरी नवीन प्रकाशांत सांगितलेलीं आहेत. तीं सर्व काव्य रूपाने असून तें सर्व काव्यच उद्धृत करण्याला अवकाश नसल्यानें त्यांचा मुख्य भाग देतों. वाचकवर्गापैकीं ज्यांची इच्छा असेल त्यांनीं हा भाग मुळांतूनच वाचावा.

**शूद्रः**—ज्याची स्थूलावर आसक्ति आहे, स्थूल शरीर ह्मणजेच मी, पालन पोषण हेंच ज्याचे इतिकर्म, ज्याला इज्जतीचीं पर्वा नाहीं, जो देहाचा चाकर बनला तो शूद्र समजावा.

**वैश्यः**—ज्यानें सूक्ष्मशरिराच्या भावनेंत पूर्ण विश्वास ठेविला, जो आशेकरितां हवें तें कार्य करण्यास तयार होतो, ज्याचें मन निंदा स्तुतींत आहे, व सदा चंचल आहे, ज्याचे सर्व धंदे तिरस्कार उत्पन्न करणारे आहेत, स्वार्थी आहेत, त्याला वैश्य ह्मणावें.

**क्षत्रियः**—ज्याची निष्ठा कारण देहावर आहे, सभेमध्यें व रणांत जो अचल आहे, जो निश्चयाचा पक्का आहे, ज्याला लोकांची बिलकुल पर्वा नाहीं, निंदा स्तुतीचा ज्याच्यावर परिणाम होत नाहीं, ज्याचें

वचन सर्व लोक मानितात आणि जो स्वसंवेदनेच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करितो, तसेच जो हिंमतदार आहे ज्याचें आचरण शुद्ध आहे, नीतियुक्त आहे, जो नरसिंह आहे, ज्याला असत्याची चीड येते, धर्माकरितां, सत्याकरिता जो सर्वस्वावर पाणी सोडण्यास तयार असतो, देशहितावरून जो आपले प्राण ओवाळून टाकितो, जो निर्भय आहे, जो गोळींपुढे छाती करितो, घायाळ झाला तरी अभिमानाप्रमाणे वागतो, जो दुःखांत नित्यानंदी असतो, रणांगणावरील पाय मागें घेत नाहीं, जो राणा प्रतापसारखा आहे, जो शिवाजी आहे, भगवान् कृष्ण आहे तो खरा बहादुर क्षत्रिय.

**ब्राह्मणः**—क्षत्रिय, वैश्य, व शुद्ध यांना जो तेज ( ज्ञान ) देतो, जो मीं शंकर, विष्णु इत्यादि रूपांनीं नटलेला आहें असा दृढ विश्वासी आहे ( २ ) जो खुद्द मुक्त आहे, जो आपल्या दर्शनानें इतरांना मुक्त करितो, जो गुणातीत आहे, ज्याला भांगारकांता तुच्छ वाटतात ( ३ ) जो अयाचित आहे, स्वस्वरूप संपत्तीनें धनवान् बनला आहे, विष्णूला सुद्धां जो लाथ मारूं शकतो आणि ( ४ ) ज्याला शत्रुमित्र सारखे वाटतात, जो प्रकाशमान सूर्य आहे, मतमतांतरें हीं ज्याचे मजेचे खेळ आहेत, ज्याला मरण म्हणजे चटणी मिरची प्रमाणे वाटतें, जो सत्यस्वरूप व आनंदस्वरूप आहे तो खरा ब्राह्मण समजावा. याच काव्यांत राष्ट्रोधाराकरितां वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असे क्षत्रिय व ब्राह्मण पाहिजेत असें स्वामींचें कळकळीचे सांगणें आहे. तेव्हां केलेल्या विनंतीच्या लहरी आज आह्मावर परिणाम करित आहेत असें हल्लीच्या राष्ट्रीयमनाच्या परिस्थितीवरून स्पष्ट दिसत आहे.

### ( ऋ ) जगदुद्धारक राम.

ज्या महात्म्यांना जगदुद्धारक महात्मे असें म्हणावयाचें त्यांनीं जगांतील सामुदायिक विचारौघांत कोणते उन्नत विचार सोडिले आहेत, सामुदायिक मनाला आत्मानुभव प्रवण करणारी कोणती व केवढी चेतना दिली आहे हें

पाहून मगच त्यांच्या कार्याकडे नजर देऊन त्यांना ' जगदुद्धारक ' असे म्हणावयाचें असतें. सारांश त्यांनीं कोणता ' युगधर्म ' जगाला उपदेशिला हे पहावयाचें असतें.

श्रीकृष्ण, बुद्ध, खिस्त. महंमद. लाओत्झे, आद्य शंकराचार्य, महात्मा गांधी. इत्यादि विभूतींच्या चरित्राकडे पाहिल्यास त्यांत अद्भुत सद्गुणाच्या ज्या अमोघ खाणी दृष्टीस पडतात त्या सर्वांवर विश्वव्यापी प्रेमाचा शिक्का मारलेला आढळतो. किंबहुना 'विश्वव्यापी प्रेम ही त्यांचो ट्रेडमार्क असते. ही ट्रेडमार्क स्वामीजवळ कोणत्या प्रमाणांत होती याबद्दल ' टीका, व विश्वव्यापी प्रेम ' हा उच्च स्फूर्तियुक्त लेख* उत्तम साक्ष देतो. त्यांत ते म्हणतात.

' अगदीं मनापासून आत्मत्वानें सर्व प्राणिमात्रांवर प्रेम करणारा या भूतलावर कोणी अवतरला असेल तर तो राम होय. माझ्या लेकरांनो, माझ्या अंतःकरणाचा कळवळा कदाचित् दिसून येणार नाही. ' क्वचित् त्यांना तो समजणारही नाही. ' या उद्गारांत स्वामींचें जीवनरहस्य अत्यंत स्पष्ट रीतीने व्यक्त झालेलें आहे. अशा प्रेमाचा उदय परमात्मभाव आंगी मुरल्याशिवाय होणे शक्य नाहीं. सौंदर्य व प्रेम हीं वैराग्याचींच नांवे आहेत अशी जी स्वामींनीं एके ठिकाणी प्रेमाची व्याख्या केली आहे ती मधील मर्म तरी हेंच आहे.

जगांतील सामुदायिक मनोभूमिकेवर जर कसला मोठा ओघ स्वामींनी सोडिला असेल तर तो या उच्च प्रेमाचाच होय. अशा प्रकारचे दिव्य प्रेम आंगीं बाणावें ह्या करितांच स्वामींनीं जगाला व विशेषतः भारतवर्षाला उपदेश केला. हीच जगदुद्धारक ह्या दृष्टीनें त्यांची एक अत्यंत महत्वाची कामगिरी होय. स्वामी हे केवळ असल्या प्रेमाचे उपदेशक नसून प्रत्यक्ष आचरण करणारे होते. हें त्यांच्या जागोजागच्या व्याख्यानां-

---

१ हा इ. स. पूर्वी ५० च्या सुमारास चीनमध्यें होऊन गेला. हा एक तत्ववेत्ता होता. याला प्रतिबुद्ध देव असें समजतात. विशेष माहिती करतां ' जगदुद्धारक महात्मे भा. १ ला. हें स्वामी अभेदानंदांचें पुस्तक वाचावें.

* स्वा. रा. भाग १० वा फडके कृत.

वरून व आचारावरून स्पष्टपणाने दिसून येतें, हे येथें नमूद करणें अत्यावश्यक आहे. ते आपल्या व्याख्यानांत उपदेश करितात 'बुद्धिमान् मनुष्या! तूं मूर्तिमंत प्रेम होऊन रहा. सर्वांशी ममत्वबुद्धीने वागणे हीच जगांत यशस्वी होण्याची गुरुकिल्ली आहे. **प्रेम हाच जीवनाचा कायदा.** या कायद्याप्रमाणे वाग. कारण, प्रेम हा एकच परमेश्वराचा कायदा आहे. प्रेमानेच उच्च भावना अंत करणांत स्फुरतात. **अंतःकरण हें स्फूर्तीच्या आनंदमंदिराचें प्रवेशद्वार असून बुद्धि हें त्या मंदिराचें निर्गमद्वार आहे.** ह्मणून प्रेमस्वरूप नारायणाने आपल्या अंतःकरणांत एकदां बिऱ्हाड ठोकले ह्मणजे कार्य झालें. प्रेम करणारावर सर्वांचें प्रेम बसते. प्रेमरूप व्हा ह्मणजे सर्व प्रकारचे कायदेकानू तुमच्याशी एकरूप होतील. अंतर्यामीच्या सुराशी आपल्यावृत्तीचा सूर मिळवा ह्मणजे स्वयं काल हातानें टाळ्या वाजवून ताल धरूं लागेल. प्रेमाच्या साहजिक प्रवृत्तीच्या पावलांबरोबर पाऊल टाकण्यास काल बांधलेला आहे. प्रेमांत स्थिर व्हा. सर्वात्मभाव आंगी बाणवून घ्या. म्हणजे सर्व प्रकारच्या सिद्धि तुमच्या घरी पाणी भरूं लागतील.

एवंच, स्वामी स्वतःमध्ये प्रेमाचा पूर्ण विकास करून घेण्यास, स्वतः प्रेमी बनण्यास, किंबहुना मूर्तिमंत प्रेम बनण्यास सांगतात. असे हें विशिष्ट प्रेम म्हणजे काय चीज आहे, तें असतें कसें वगैरे प्रश्न मनांत येतात म्हणून त्यांबद्दल विचार करणें जरूर आहे.

स्वामींनीं प्रतिपादिलेलें हे प्रेम म्हणजे मोह अथवा आसक्ति नव्हे. हे शरीरावरील अथवा रंगावरील प्रेम नव्हे. हे प्रेम संकुचित नसून विश्वव्यापी आहे. हें प्रेम दिव्य आहे. हे प्रेम म्हणजे सार्वत्रिक भ्रातृभावाचें पूर्णविकसित स्वरूप होय. जगांतील सुधारलेली अथवा बिनसुधारलेली राष्ट्रें व समाज ज्या भ्रातृभावाचा ( Brotherhood ) पुरस्कार करितात त्या प्रकारच्या संकुचित व द्वेषयुक्त भ्रातृभावाचें व स्वामींच्या प्रेमाचें मुळीच पटत नाहीं. हें दिव्य प्रेम ह्मणजे अखिल मानव जातीवरील प्रेम होय असें ह्मटलें तरी सुद्धां तें मर्यादित व संकुचित स्वरूपाचें ठरतें. ह्मणून स्वामींचें हें दिव्य प्रेम ह्मणजे अखिल सृष्टपदार्थांच्या ठिकाणीं वास करणाऱ्या जीवावरील, परमेश्वर स्वरू-

पावरील, आत्मस्वरूपावरील प्रेम होय. परमेश्वराला सर्वस्व अर्पण करणारे हें दिव्य प्रेम होय. या प्रेमाची खूण अथवा वृत्ति स्वामींच्या पुढील उद्गारांत पहावयास सांपडते. "हे परमेश्वरा! माझें सर्व आयुष्य तुझ्याकरितां अर्पण केलें जाऊं दे. हे प्रेममया, माझें अंतःकरण काढून घे आणि ते सर्वात्मभावाच्या प्रेमामृतामध्यें बुडून जाऊं दे. हे सर्वव्यापी ईश्वरा! माझे नेत्र काढून घे आणि तुझ्या दर्शनसुखाचा आस्वाद घेऊन ते उन्मत्त होऊं दे. हे सत्स्वरूपा, माझ्या हातांचें सर्व सामर्थ्य तुझी प्रीति संपादन करण्याकरितां सदैव काम करीत राहूं दे."

या उद्गारांवरून सर्व ज्ञानेंद्रिये, व सर्व कर्मेंद्रियें, यांचा उपयोग कसा करावा, किंबहुना सर्व इंद्रियांचा उपयुक्त प्रेम संपादन करण्याकरितांच उपयोग केला जावा असा अभिप्रेत अर्थ दिसतो.* अशा या दिव्य प्रेमाचाच स्वामींनीं उपदेश केला ह्मणूनच ते जगदोद्धारक महात्मे होते असे नव्हे, तर स्वामी हे अशा दिव्य प्रेमाचे मूर्तिमंत पुतळे होते; हे दिव्य प्रेम त्यांच्यामध्ये थबथबलेलें होते, हें त्यांच्यापासून गंगौघाप्रमाणें वहात होते, म्हणूनच त्यांच्या ठिकाणी—अद्वितीय आकर्षकता व मोहकता आलेली होती. आणि ह्मणूनच 'जिवंत ख्रिस्त' असे स्वार्थामुळे पाषाणहृदयीं बनलेल्या लोकांनासुद्धां ते भासूं लागले. ह्या त्यांच्या प्रेमाचा उत्कर्ष त्यांच्या ठिकाणी पुढें पुढें तर इतका झाला होता कीं, हिमालयांतील तृणांकुरांवरून चालत असतांना ते दुखवूं नयेत ह्मणून स्वामी अति जपून पावले टाकीत. इतक्या उच्च कोटीप्रत पोंचलेल्या जगदुद्धारक महात्म्यांचे 'ते वाट कृपेचीच करित । ते दिशाचि स्नेह भरित । जीवातळीं आंथरित । आपुला जीव ॥' हेंच स्वरूप असतें.

(२) स्वामींनी जगताच्या ज्ञानांत जर दुसरी महत्वाची भर टाकिली असेल तर ती वेदान्ताबद्दलची होय. वेदान्त ह्मणजे काय, तो ओळखावा कसा, त्याचा उपयोग काय, ह्या विषयीचें विवेचन अद्वितीय व अत्यंत सुबोध आहे.

---

* 'घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ।' इत्यादि या तुकोबांच्या अभंगांतील रहस्य तरी हेंच आहे.

**' वेदान्त ह्मणजे ज्ञानाचा अंत '** अशी मार्मिक व सुटसुटीत व्याख्या त्यांनीं केली. वेदाचा–ज्ञानाचा–अंत ह्मणजे ज्ञानाचा पूर्ण विकास होणें अथवा मूर्तिमंत ज्ञान होणें असा आहे. या शिवाय स्वामीच्या वेदान्ताची सविस्तर माहिती मागे येऊन गेलेलीच आहे. ( 'वेदान्ती राम' पहा. )

( ३ ) जसा स्वामींनीं वेदान्त हा सुगम व सुबोध केला तशींच मायेबद्दलची गोष्ट आहे. आज पुरातन काळापासून ' माया ' ' माया ' ही चीज काय आहे याबद्दल वादविवाद, तर्कवितर्क वगैरे अनेक उलाढाली झाल्या, होत आहेत, व पुढेही होतील. परंतु स्वामीनी यांपैकीं कांहीं न करितां ' माया ' ह्मणजे वस्तुस्थितीचे निदर्शन आहे असें सांगितलेले आहे. ही जगाच्या ज्ञानभांडारांत त्यांनीं तिसरी मोठी भर टाकिली हे ह्मणणे ' मायेबद्दल चालत आलेली वादावादी व घटपटादी खटपट परंपरा यांचा इतिहास ज्यांना माहित आहे त्यांनां पटल्याशिवाय रहाणार नाहीं.

( ४ ) ' धर्म ' ' धर्म ' ह्मणजे काय ? धर्म हा आचाराचा भाग आहे का विचाराचा आहे ? धर्म हा घरांत आहे का बाहेर आहे ? धर्म हा मशीदींत आहे का मंदिरांत आहे ? वगैरे मुद्यांवर पूर्ण विचार करून त्यांनीं अधिकारी वाणीनें असें सांगितलें कीं, धर्म हा आचारविधि आहे.* अनुभव आहे. ते ह्मणतात उधार धर्म हा केवळ बोलून दाखविण्याकरितां आहे पण रोखधर्म ह्मणजे खराखुरा धर्म हा आचरण करण्याकरितां आहे.

( ५ ) सर्व जगभर सब गोलंकार करण्याचे प्रयत्न जारीनें सुरू असूनही गुणकर्म विभागानुरूप झालेला निसर्गसिद्ध जातीभेद कोणत्यानां कोणत्या तरी रूपांत शिल्लक राहिलेला दिसतोच. हें पाहून व त्यांचें मर्म लक्षांत घेऊन स्वामींनीं जातिभेदाचें, विशेषतः भारतीय आर्यांच्या जातिभेदांचे जें सयुक्तिक व समर्पक मंडण केलें ही गोष्ट म्हणजे जगाच्या समष्टिरूप मनोवितानांत सोडिलेली एक पर्वतप्राय लहरी आहे असे वाटतें. त्यांचे वर्णव्यवस्थेबद्दलचे पुढें दिलेले विचार, सर्व धर्मीयांनीं, सर्व धर्मातील कर्मकांडियांनीं सर्व प्रकारच्या चळवळी करणारांनीं मनन करण्याजोगे आहेत. ते म्हणतात;—

---

* आचारः प्रथवो धर्मः ।

वर्गीकरण हें स्वाभाविक व हितकर आहे.......श्रम विभागाचें तत्व हें न्याय्य व आवश्यक तत्व आहे. ह्या श्रम विभागाच्या तत्वावरच हिंदूंची वर्णव्यवस्था ठरविण्यांत आली. उघड उघड व्यवहाराच्या धोरणावर हिंदुस्थानांतील जनतेचे त्यांच्या योग्यतेनुरूप चार विभाग पाडण्यांत आले......**व्यवहाराच्या व्यवसायाची** विभागणी व्हावी, परंतु अंतःकरणांत परस्पर प्रेम व ऐक्य असावें या उदात्त तत्वावर हिंदुच्या जातिभेदाची उभारणी करण्यांत आली होती, परंतु वर्ण व्यवस्थेतील हे जीवनतत्त्व नाहीसे होऊन त्या जागीं निर्जीव हाडे मात्र राहिली. पुरलेल्या हाडांचे कालांतरानें ज्याप्रमाणे कठीण दगड बनतात त्याप्रमाणे ह्या लवचिक वर्ण व्यवस्थचे घट्ट दगड बनले. प्रत्येक वर्णाला आपआपली उन्नति करून घेण्याविषयी जी मोकळीक व सवड होती, ती नाहीशी होऊन तिच्या ठिकाणीं अधिक ताठपणा मात्र आला. त्यामुळे सध्यांचा अस्वाभाविक जातिभेद जन्मास आला असून त्यानें द्वेषभाव उत्पन्न केला आहे, हा द्वेषभाव नाहीसा झाल्याशिवाय वुद्धीच्या वाढीला अनुकूल परिस्थिति उत्पन्न होऊं शकणार नाही.

पण इतर देशांतील जातिभेदाची कल्पनाच स्पर्धेच्या मुळाशी आहे असें त्यांचे मत होतें.

## ( ऌ ) आनंदरूप राम.

मानवी मनाचे प्रतिबिंब त्याच्या मुख दर्पणांत स्पष्टपणे दिसतें, स्वामींच्या मुख कमलावर नेहमी स्मित हास्य चमकत असे. तें इतके मधुर व मनोहारी असे कीं, अमेरिकेंतील स्त्री पुरूष स्वामीला पहातांच अगदीं उल्हासी व स्तब्ध होऊन जात. अमेरिकेंतील 'ग्रेट पॅसिफिक रेल रोड' कंपनीचे व्यवस्थापक स्वामींना पहातांच 'स्वामीचे हास्य अत्यंत मनोहारी आहे' असे ह्मणाले तसेंच एका प्रदर्शनाचें वर्णन करितांना वर्तमानपत्रकारांनीं अखिल संमेलनांत स्वामींच्या चेहरा प्रकाशित आहे असें लिहिलें आहे. स्वामींच्या या मधुर हास्याचा व आनंदी वृत्तीचा प्रत्येकाच्या मनावर विजेप्रमाणें परिणाम होई. स्वामींना पहातांच पहाणाऱ्यांच्या मनांत एकदम उल्हास संचरूं लागे. किंबहुना स्वामींचा मोहक चेहरा व त्या वरील आत्मिक जागृतीची रुचिर

छटा ही सर्व प्रकारच्या प्रश्नांना प्रत्युत्तर देण्यास पुरेशीं होतीं. सारांश, हा जो विलक्षण व दिव्य आनंद त्यांच्या चेहऱ्यावर व्यक्त होई याचा उगम आंतरिक आनंदांत सांपडतो. हा आनंद प्रत्येकाजवळ आहे. तो प्रत्येकाच्या अंतःकरणांत सांपडतो. **आनंदी असणें हा आत्म्याचा धर्म** आहे असें असून हा आनंद प्रत्येकाचे चेहऱ्यावर कां विलसत नाही. हा आपोआप मिळत नसून त्याचा प्रत्येकानें विकास केला पाहिजे. हेंच या प्रश्नाचें उत्तर आहे. अशा या दिव्य आनंदाचा विकास करण्याकरितां काय केलें पाहिजे याचें वर्णन स्वतः स्वामीच पुढे लिहिल्याप्रमाणें करतात.

"आपली चित्तवृत्ति शांत आणि आनंदी ठेवणारे उत्कृष्ट औषध कोणतें ? निसर्ग देवतेचें नैसर्गिक आणि सार्वत्रिक औषध अर्थात पहाटेची शुद्ध हवा. लहानपणापासून पहाटे उठणें, व्यायाम घेणें, नदीकांठीं एकांतांत फिरावयास जाणें, **रात्रीच्या** कांठी एकांतांत तासच्यातास घालविणें, जंगलांत वन्य पशूंप्रमाणें वावरणे, त्यांतील सौंदर्य जाणणें इत्यादि सर्व आयुष्यक्रम पाहिला म्हणजे, स्वामी वर उल्लेखिलेलें औषध नियमानें घेत असल्याची साक्ष पटते. स्वामी नेहमीं निसर्गाशीं बोलत, निसर्गातच चालत, त्याच्याशीं खेळत, व अखेरीस समरस होऊन जात. हाच त्यांच्या आयुष्याचा क्रम होता. यामुळें त्यांच्यावर निसर्गाचा योग्य तो परिणाम झाला. त्यांच्या भावना निसर्गाच्या भावनेप्रमाणें बनल्या, व त्यांचा आत्मा आणि निसर्गाचा आत्मा यांतील द्वैतभाव जाऊन निसर्गात्मा म्हणजे **राम** व **राम** म्हणजे निसर्गात्मा अशी स्थिति झाली. यामुळें भृंगीकीटक न्यायानें त्यांच्या चालचालणुकींत, त्यांच्या भाषणांत, त्यांच्या स्वरूपांत, त्यांच्या दृष्टींत किंबहुना त्यांच्या 'त्यांचेपणांत' निसर्गाच्या स्वतंत्रतेचें, अकृत्रिमतेचें आणि माधुर्याचें प्रतिबिंब हुबेहुब उतरलें. हेंच त्यांच्या बाह्य आनंदी, मोहक, उल्हासकारी आणि दिव्य स्वरूपाचें रहस्य आहे. 'अहं ब्रह्मास्मि' हे त्यांचे दोन पंख असून त्यांच्या सहाय्यानें ते आकाशांत–अनंतत्वांत भराऱ्या मारीत. सारांश, महाशय **रवींद्रनाथ टागोर** व **जगदीशचंद्र बोस** ज्या निसर्ग समरसतेचा उपदेश करितात त्याचें अद्वितीय व कमालीचें विकसित स्वरूप स्वामी रामतीर्थांशिवाय दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं पहावयास मिळणार नाहीं.

अशा रीतीनें ज्या आनंदाची कमावणी स्वामी लहानपणापासून करीत आले त्याचा परिपाक शुद्ध सच्चिदानंदस्वरूपापेक्षां दुसऱ्या कशांत व्हावा बरें ? स्वामींचे शेवटले वर्ष हिमालयांत गेलें. अमेरिकेतून परत आल्या वेळेपासूनच जगतासंबंधाचा विचार त्यांच्या चित्तांतून पार नाहींसा झाला होता: आणि तशांत हिमालयासारख्या पर्वतावरील अद्भुत व अद्वितीय निसर्गाच्या सान्निध्यांत त्यांचा काळ गेला. अशा रीतीनें घडून आलेल्या अपूर्व मिलाफांतील आनंद रूपाचें वर्णन स्वामींच्याच शब्दांनीं केल्यास तेच वास्तविक होईल. हिमालयांत असतांना त्यांनीं जीं पत्रे लिहिली त्यांतूनच त्यांनी आपला जीवन-क्रम स्पष्टपणें दृग्गोचर केला आहे. ते लिहितात " सर्व बाजूंनी प्रगट होणारें परमेश्वराचें हे दैदीप्यमान वैभव पाहून **राम** निरतिशयानंदांत मग्न होतो, आणि **रामाच्या** नेत्रांतून प्रेमाच्या धारा वाहूं लागतात......आपली जीवन-सरिता अखंड वाहात आहे. परमेश्वराशिवाय जगांत कशालाही अस्तित्व नाहीं. सर्व ज्योतींची ज्योती—चैतन्याचा सागर खवळला आहे. परमानंदाचें तुफान सुटलें आहे ! या रमणीय भूप्रदेशांत मी आनंदाने हसतों, नाचतों, टाळ्या वाजवितों आणि गातों. ( पत्र ४ ).

तारीख ३० आगष्ट १९०५ च्या पत्रांत स्वामी आपल्या आनंदीवृत्तीचें वर्णन करितात:—

" **रामाच्या** अंतःकरणांतून आनंद आणि शांति यांचें तुफान उसळलें असून त्रीं आंत मावेनाशी झालीं आहेत. आंत आणि बाहेर शेजारी आणि दूर सर्वत्र एकच परमात्मा व्यापून राहिला आहे. आनंद ! अंतःकरण हलवून सोडणारी दिव्य शांति ! हर्ष रोमांच उभे करणारा परमानंद ? केवढा अद्भुत आनंद !"

जुलई १९०६ च्या पत्रांत ते ह्मणतात:—

गिरिकुहरांत **रामाला** रात्री काढाव्या लागतात. देहाभिमानाचीं रक्ष वाळवंटें मागें टाकून निबिड ब्रह्मारण्यांत प्रवेश करणें याहून अधिक आनंद कोणता असेल ! सूर्य व वायु यांच्या खांद्याला खांदा लावून बरोबरीच्या नात्यानें प्रेम संलाप व विहार करणें याहून अधिक आनंद कोणता ? "ऐकमेवा

द्वितीयम् " या दिव्य अनुभवाच्या गहन आणि विस्तीर्ण काननांत स्वैर संचार करणे याहून आणखी आनंद तो काय राहिला ! "

आपल्या अगदी शेवटच्या उद्गारांत ते ह्मणतात, ' मित्रांनों ! येतो बरें. रामराम, हा विश्वरूपी महाल **रामाला** अगदी लहान वाटतो. या ठिकाणीं प्रियकराबरोबर **राम** एकान्तात क्रीडा करणार आहे ! अहाहा ! या भव सागरांत त्या प्रेममयाबरोबर जलविहार करण्यांत किती अपूर्व आनंद आहे. बरोबर ! छे ! सागरांतील लाटांप्रमाणें **राम** चैतन्यांत–त्या प्रेममयांत मिळून गेला. आनंद ! आनंद ! ॐ ! प्रत्यगात्मा ॐ ! "

वाचकहो, ह्या आनंदाचा प्रवाह इतका जोराचा आहे कीं, यापुढें त्या आनंद स्वरूपाचे वर्णनच करवत नाही ! येथे लेखणी थांबते व वाचा विराम पावते ! ॐ.

## ( ऌ ) मुक्तात्मा राम.

अवतारी महात्मे जन्मतःच मुक्त असतात. तथापि अवतार कार्य पूर्ण होईपावेतो त्यांच्या आचरणापासून लोकांना धडा घ्यावयाचा असल्यामुळें त्यांना जनतेला धडा शिकवावयाचा असल्यामुळे तो धडा शिकत असतांना सामान्य जीवांना ज्या स्थितींचा अनुभव घेऊन पैलतीराला जावयाचें असतें त्या स्थितींतील वागणूक कशी असावी हे ते अवतारी महात्मे स्वतःच्या वर्तनाने जगाला शिकवीत असतात. अशा दृष्टीने स्वामी **रामतीर्थांचें** वर्तन कसें दिसतें ते या दर्शनांत आपणास पहावयाचें आहे.

जो मुक्त असतो त्याची मुख्य खूण ' आसक्तीचा पूर्ण अभाव ' ही होय. **स्वामीं**च्या चरित्राकडे अगदी बालपणापासून पाहिल्यास त्यांच्या ठिकाणी कठिणतम प्रसंगीं सुद्धां आसक्तीची यत्किंचित् छायाही दृग्गोचर होत नाहीं.

**' तुह्मी कोणीही असा, विद्वान असा, किंवा अविद्वान असा, श्रीमान् असा कीं दरिद्री असा, स्त्री असा वा पुरुष असा, खिस्त असा कीं, दीड दमडीच्या स्वार्थाकरितां त्याचा विश्वासघात करणारे जूडास असा, कृष्ण असावा, गोपी असा सर्वांत राम भरलेला**

**आहे. मेघगर्जनेप्रमाणें गर्जना करून माझें ईश्वरत्व—तुमचें ईश्वरत्व सर्वांना पटवून देण्याचा माझा निर्धार आहे. तुमच्या प्रत्येक कृत्यांत आणि हालचालींत ईश्वरत्व भरलेलें आहे त्या सर्वांचें अधिष्ठान ईश्वरच आहे हें जगताला जाहीर करावयाचें आहे'** हें स्वामींचें ध्येय होतें. आत्मसाक्षात्कार सर्वांनां प्राप्त करून देण्याचा स्वामीनीं निश्चय केला होता. यामुळें प्रथमतः त्यांना स्वतःला तो प्राप्त करून घ्यावा लागला. आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी कर्म, उपासना, ज्ञान, यांचा आश्रय त्यांना करावाच लागला. ह्यांचा आश्रय घेतला असतां गुरुकृपेशिवाय ज्ञान मिळतें किंवा काय ? ह्मणजेच साक्षात्काराला गुरुकृपेची अनिर्वाह्य जरूरी आहे किंवा कसें ? ज्ञानोत्तर कालीं भक्ति संभवते किंवा नाहीं ? ज्ञानोत्तर कालीं कर्म करावें लागतें कीं, कर्म होतें वगैरे महत्वाचे व वादग्रस्त प्रश्न पुढें उभे रहातात. त्याचप्रमाणें आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी, ज्ञानी, यांचें आचरण कसें असावें हेही प्रश्न मनांत येतात. आणि या सर्वांचीं उत्तरें स्वामींच्या आचरणांत सांपडतात त्यांचा यथामति विचार करूं.

आत्मसाक्षात्कार होण्याकरितां जिवंत श्रद्धा अवश्य आहे. **किंबहुना श्रद्धेशिवाय मनुष्य जिवंतच राहूं शकत नाहीं.** परमेश्वर प्रवण करणारी श्रद्धा स्वामींच्या ठिकाणीं बालपणापासून होती हें आपण पाहिलेंच आहे. या जिवंत श्रद्धेला दृढ निश्चयाची जोड दिली ह्मणजे तो मनुष्य मुमुक्षू पदावर आरूढ होतो व मगच उपासनेच्या व सत्संगाच्या दरवाजांतून त्या मुमुक्षूला सगुण साक्षात्कार होतो. पण हे दरवाजे गुरुकृपेशिवाय प्राप्त होत नाहींत. व आत्मकृपेशिवाय स्वतःवरील दृढश्रद्धा व दृढनिश्चय यांपासून उत्पन्न झालेल्या उत्साहाशिवाय गुरुकृपा होत नाहीं. आणि ज्याच्यावर गुरुकृपा होत नाहीं त्याच्यावर ईश्वरकृपा होत नाहीं. अशी ही परस्परामधील गुंतागुंत आहे. सारांश ह्या सर्व गोष्टी प्राप्त करून घ्याव्या लागतात.

"जो त्रिविध तापें पोळला । तोचि परमार्थासी अधिकारी झाला ॥"
या अभंग वाणीप्रमाणें स्वामी हे परमार्थाचे अधिकारी झालेले होते. ही गोष्ट त्यांच्या ब्रह्मचर्य व गार्हस्थ्य या काळांतील चरित्राकरून स्पष्टपणें दिसते.

आयुष्याच्या याच काळांत स्वामींना सगुण साक्षात्कार झाला होता. व ह्या साक्षात्कार होण्याच्या अगोदर शमदमादि साधन चतुष्टयांच्या मुशींतून स्वामींनीं आपल्या मनाला शुद्ध करून ठेविलें होतें. आणि सुदैवानें व स्वामींच्या दृढश्रद्धेनें त्यांना लवकरच सद्गुरु कृपालाभ झाला होता. स्वतःची तयारी व गुरुकृपा या जोडगोळीमुळें त्यांना सगुणसाक्षात्कारपरिणामीं उपासना करितां आली आणि तद्वारें त्यांना सगुणसाक्षात्कार झाला. सगुणसाक्षात्कारा-करितां उपासना कशी असावी लागते, आपल्या इष्ट देवतेचें वेड कसें लागावें लागतें, इष्ट देवतेचा निदिध्यास कसा लागावा लागतो ह्याची साग्र माहिती व त्याप्रमाणें स्वामींच्या मनःस्थितीचें हुबेहुब चित्र वाचक-वर्गापुढें आहेच. याकरितां त्याची पुनरावृत्ती करण्याची जरूरी नाहीं. **भक्तीचा जिवंत झरा अंतःकरणांतून वाहूं लागला तरच आत्मसाक्षात्कार होऊं शकतो.** आत्मसाक्षात्काराशिवाय भक्तीची पूर्तता नाहीं. भक्तीच्या या परमावधीला अद्वैतभक्ति किंवा ज्ञानयुक्त भक्ति अहंब्रह्मास्मि वा—अनुभव असें ह्मणतात. ह्या सर्व स्थितींतून स्वामी गेल्याचें आपण पाहिलेंच आहे. परंतु सद्गुरु कोण, त्याला आपण धुंडावयाचें असतें किंवा काय आणि सत्संग ह्मणजे काय यांचा स्पष्ट खुलासा करणें अत्यंत जरूर आहे. व तो स्वामींच्याच शब्दांनीं करणें बरें:—

"जीवात्मा व शिवात्मा यांची अखंड भेट करून देणारा तो खरा गुरु, आणि ज्या संगतींत हें कार्य घडत असेल तीच खरी सत्संगती होय." शिष्यानें निरंतर आपल्यावर अवलंबून राहून आपल्या व्यक्तिवर अंधश्रद्धा ठेवावी असें खऱ्या सद्गुरूला केव्हांही वाटणें शक्य नाहीं. प्रत्येकानें आपल्या हृदयांतील आत्मदेवावर दृढ विश्वास ठेवावा, आपली देहबुद्धि टाकून त्याच्याशीं तद्रूप व्हावें हाच खऱ्या गुरुचा आपल्या शिष्याला उपदेश असतो; एवढेंच जो मनुष्य श्रद्धेनें, धैर्यानें व दृढ निश्चयानें अभ्यास करितो त्यालाच आत्म-ज्ञान प्राप्त होतें, कारण **आत्मा हाच गुरु व तोच जगताचें नियंतृत्व करणारा ईश्वर आहे.** असें स्वामींनीं आपल्या व्याख्यानांतून सांगित-लेलें आहे.

स्वामी सद्गुरुच्या शोधार्थ गेले नाहींत, पण उलट पक्षीं सद्गुरुच त्यांना लाभले होते. कारण **प्रथम आपणच आपली स्वतःची तयारी करावयाची असते व ती तयारी होतांच सद्गुरूची भेट व कृपा ह्या गोष्टी साध्या होतात असेंच स्वामींच्या चरित्रावरून आपणांस दिसतें.**

वरील सर्व वर्णनावरून स्वामींच्या मुक्तत्वाची कल्पना आली असेल असें वाटतें. पण मुक्त किंवा पूर्ण ज्ञानी अवस्थे नंतर व तत्पूर्वी त्याचें सामाजिक वर्तन कसें असतें ह्याचा खुलासा करावयाचा राहिला त्याजकडे वळूं.

" **आत्मज्ञान संपादन करणें, आत्मकेंद्रामध्यें स्थिर होणें हेंच सर्व मनुष्यांचें आद्य आणि मुख्य कर्तव्य आहे.** " असा वेदांताचा मुख्य उपदेश असून तदनुसार ' **आत्मविषयक कर्तव्य हेंच सर्व कर्तव्यांचें कर्तव्य** ' आहे असें स्वामींनीं प्रतिपादिलें आहे. प्रथमारंभीं दिखाऊ कल्याणाच्या मार्गांचा ह्मणजेच प्रेयस् बुद्धीचा त्याग करून जो मनुष्य श्रेयोमार्गाचा अवलंब करितो त्याचीच आत्मोन्नति होऊं शकते आणि असा मनुष्यच आपली सर्व प्रकारचीं कर्तव्यें उत्तम रीतीनें व निरपेक्ष बुद्धीनें बजावूं सकतो. एकदां आत्मज्ञानाने संपन्न झाल्यावर सर्वात्म भावनेच्या दिव्य प्रेमानें आपलीं सर्व तऱ्हेचीं कर्तव्यें मनुष्याने करीत जावी. असा वेदान्ताचा उपदेश आहे.

एवढ्यावरून आपलें खरें व आद्यकर्तव्य काय हें कळलें पण हें आत्मविषयक कर्तव्य करीत असतांना इतरांसंबंधींचें आपलें कर्तव्य म्हणजे सामाजिक कर्तव्य तसेंच देशविषयक कर्तव्य हीं कशीं करावीं ही शंका शिल्लक रहातेच, तिचा विचार करूं.

आपल्या नित्याच्या आचरणांत जीं कर्मे आपला मनोविकास करणारीं असतील अशीं कर्में करण्यांतच पुष्कळ काळ दवडावा. आणि मनोविकासाची पहिली पायरी अहंकार नाशांत व स्वार्थ राहित्यांत आहे. कारण जो मनुष्य स्वार्थाच्या पलिकडे गेला नाहीं; देहाभिमानाच्या पलीकडे गेला नाहीं. ज्याच्या अंतःकरणांतील कामना व वासना यांचा निरास होऊन ईश्वरी प्रेमाचा

भगवद्भावाचा पूर आला नाहीं असा मनुष्य जनहित, अगर देशसेवा कितपत करूं शकेल ? त्याला स्वकल्याण करितां येत नाही तो दुसऱ्याचें कल्याण कितपत करणार ? ज्याला स्वतःला ज्ञान झालें नाही, तो दुसऱ्याला ज्ञान तें काय देणार ? ज्याला आपल्या हृदयांतील आत्म प्राप्तीची किल्ली सांपडली नाहीं तो दुसऱ्यांना कसली भांडारें खोलून दाखविणार ? ज्याला ईशसेवा करितां येत नाहीं तो लोकसेवा काय करणार ? **लोकसेवा म्हणजेच 'ईशसेवा'** हा सिद्धांत अगदीं बरोबर आहे परंतु लोकसेवाबुद्धि ही ईश्वरी प्रेमाच्या भावनेनें, आध्यात्मिक भावनेनें उत्पन्न झाली पाहिजे. तरच तिच्यामध्यें उत्कृष्ट लोकसेवा करण्याचें सामर्थ्य उत्पन्न होईल. पण जर कां ह्या लोकसेवा बुद्धीचा उगम ईषणात्रयापैकी, कोणत्याही एकीपासून झालेला असेल तर मात्र त्याच्या हातून लोकसेवा होणार नाहीं. एवढेंच नसून त्याचें आत्महितही होणार नाहीं. कारण देशसेवा, लोकसेवा, पुष्कळांचें पुष्कळ हित वगैरे सर्व कल्पना नीतिदृष्ट्या अत्यंत उदात्त आहेत हें खास. परंतु सर्व तऱ्हेचीं कर्तव्यें जगहिताच्या बाह्य दृष्टीनें करावीं अशी वेदांताची विशेष शिकवण आहे. आतां हें खरें कीं, जनहिताच्या नैतिक दृष्टीनें प्रेरित झालेला मनुष्य पुष्कळ लोकांचे कल्याण करण्यासाठीं झटत असतो व त्या पासून अंशतः तरी हित होतेंच. पण वेदांताची दृष्टी याहून उच्च आहे. आपलीं सर्व तऱ्हेचीं कर्मे निष्काम ईश्वरार्पण बुद्धिनें करीत जाऊन प्रथम आत्मज्ञान संपादन करा. कारण आत्मज्ञानाच्या अभावीं जनहित करण्याच्या प्रयत्नामधील त्याचा हेतु स्वार्थी असण्याचा बराच संभव असतो. या साठीं अंतःकरणांतील स्वार्थी बुद्धिला त्यागाच्या सुळावर चढवून सर्वात्मभावाच्या दिव्य प्रेमानें आपलीं सर्व कर्तव्यें करीत जा, म्हणजे तीं बंधाला कारणीभूत होणार नाहींत पण उलटपक्षीं खऱ्या खऱ्या व शाश्वत जन हिताला कारणीभूत होतील. ह्याच वेदांताच्या शिकवणीचा उपदेश स्वामींनीं केला. व त्या प्रमाणें ते वागतही होते. राहतां राहिला प्रश्न ज्ञानोत्तर कर्मांचा. स्वामींच्या आचारावरून असें निश्चित विधान करतां येतें कीं, **ज्ञानोत्तर कालीं कर्मे करावयाचीं नसून तीं होत असतात.**

कारण ज्ञानोत्तर कालीं सर्वाठायीं आत्मीय भावनेची दृष्टी असल्यामुळें कर्मे तरी कोणासाठीं व कशासाठीं करावयाचीं शिल्लक रहातील ? कारण,

बनगया बनना, बनाने बिनबना जोबन बना ।
अब नहीं बानी-ओ-बाना, काम क्या बाकी रहा ॥ १ ॥

**भावार्थः**-जें बनणार होतों तों बनलों. व तोही बनविणाऱ्याशिवाय बनलो, आतां जो बनून राहिलें तो राहिलों. यानंतर बनणारा व बनविण्याची वस्तु या दोहोंपैकीं कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. मग आतां काय काम शिल्लक राहिलें ? कोणी व कांहीं शिल्लकच राहिलें नसतें यामुळें कर्म करावे लागत नसून जें होतें तें होते.

## मुक्तीचें तंत्र.

काय ? तुह्माला तुमच्या ब्रह्मत्वाविषयीं शंका वाटते ?

शंका वाटत असल्यास हृदयांत बंदुकीची गोळी का मारून घेत नाहीं ?

काय ? तुमचें हृदय तुमच्याशीं दगलबाजी करतें ?

प्रतारणा करीत असल्यास त्याला उडवून फेंकून द्या.

निर्भय होऊन प्रसन्न व्हा;

आणि ‘ सत्यांत ’ प्रवेश करा !

काय ? तुह्माला भीति वाटते ?

कोणाची ? परमेश्वराची ? तर मग तुह्मी मूर्ख अहां.

मनुष्याची ? तर तुह्मी भित्रे अहां.

पंचमहाभूतांची ? तर त्यांच्याबरोबर लढा.

आपल्या स्वतःची ? तर स्वतःला जाणा.

अहं ब्रह्मास्मि असा जप करा.

राम ( सत्य ) तीर्थ.

## प्रकरण ९ वें.



### स्वामींचें व्यक्तित्व व संप्रदाय.

( राग शंकराभरण, ताल–धुमाळी. )

**हमे इक पागलपन दरकार ॥ टेक ॥**

**अकल नकल नहीं चाहिये हमको पागलपन दरकार ॥ हमें० ॥१॥**
**छोड पुवाडे झगडे सारे, गोता वहदत अंदरमार ॥ हमें० ॥ २ ॥**
**लाख उपाय करले प्यारे ! कदे न मिसली यार ॥ हमें० ॥ ३ ॥**
**बेखुद होजा देख तमाशा, आपे खुद दिलदार ॥ हमें० ॥ ४ ॥**

( स्वामी राम )

**भावार्थः**—मला फक्त एका पागलपणाचीच जरूर ( आवड ) आहे. मला बुद्धिवाद नको व नक्कलही नको. सगळे तंटेबखेडे सोडून दे आणि अंतः-करणांत अद्वैताचा, एकतेचा एक तडाका दे. हे प्यारे, लाखों उपाय कर. पण कधींही आत्मस्वरूपाला पारखा होऊं नको. अहंकाररहित होऊन, आपलेपणा टाकून देऊन सर्व तमाशा पहा. कारण खरा प्यारा तुझा तूंच आहेस.

एखाद्या सामान्य मनुष्याच्या ठिकाणचें व्यक्तित्व व त्याचें उपादान कारण ओळखणें हें कामसुद्धां जर जड जातें तर अलौकिक व्यक्तीच्या ठिकाणचें व्यक्तित्व ओळखणें व त्याचें पृथक्करण करणें हें काम फारच दुर्घट आहे. तथापि असामान्य व्यक्तींच्या ठिकाणीं त्याच्या व्यक्तित्वाच्या निदर्शक अशा कांहीं ठळक ठळक खुणा दिसतातच. ज्या व्यक्तित्वामुळें **स्वामी** अखिल मानवसमाजांत असामान्य तेजानें चमकले, त्याला जादुगाराप्रमाणें परंतु शाश्वत चकित करून सोडिला, आणि त्याला ज्या वैयक्तिक आकर्षणानें

आपल्याकडे खेंचून घेतला त्याला ( १ ) अत्युच्च दर्जाच्या भावना ( २ ) दिव्यप्रेम ( ३ ) धीरोदात्त स्व–तंत्रत्व ( ४ ) अद्वितीय बुद्धिमत्ता आणि ( ५ ) जिवंत प्रेमळपणा हे गुण आधारभूत होते. यांशिवाय कोमलपणा, मोहकता, नम्रपणा, सहृदयता, अष्टपैलूपणा, दांडगी स्मरणशक्ति, साधेपणा, कवित्वशक्ति, प्रासादिक वाणी, आनंदी वृत्ति वगैरे अनेक सद्गुण मिळून स्वामींचें व्यक्तित्व बनलें होतें.

ते जणुं काय एक मोठे स्फोटकच होते. कारण कधीं कधीं ते महिनेच्या महिने मूक व्रतानें रहात. तर कधीं कधीं आनंदांत दंग होऊन जात. पण ज्यावेळीं ते बोलूं लागत त्यावेळीं त्यांच्या मुखांतून अमृतवाणीचा ओघचा ओघ चाले व तो आंवरणेंही त्यांना कठीण जाई.

## स्वामींची बुद्धिमत्ता.

स्वामींची बुद्धिमत्ता असामान्य होती व त्यांचें हृदय जात्याच अति कोमल होतें. याचें प्रत्यंत्तर बालवयांत प्रणवोच्चार, शंखनाद, व भक्तांच्या कथा ऐकतांच होणारी सात्विक मनोवृत्ति, आणि कथापुराणांतलि ऐकिलेल्या गोष्टी बिनचुकपणानें सांगणें, त्यांबद्दल स्वतंत्र मत देणें आणि प्राथमिक शिक्षण चालू असतांनाच गुलिस्तान व बोस्तान हे कठीण ग्रंथ अवगत करणें इत्यादि गोष्टींत जशी दिसून येते, तशीच बी. ए. च्या वर्गात असतांना संस्कृताचा प्रारंभ करून त्यांत विलक्षण प्रगति दाखविणें ह्या गोष्टी-तही दिसते.

जसजसे ते वयानें वाढत चालले तसतशी त्यांची ज्ञानलालसाही फोंफा-वत चालली. व पुढें पुढें तर ती अगदीं अनावर झाली. त्यांची धारणा-शक्ति तर इतकी दांडगी बनली होती कीं, त्यांना ‘एकपाठी’ या शब्दाशिवाय एखादा उत्कृष्ट शब्द असल्यास तो लावितां येईल.

धर्म व तत्वज्ञान यांची आवड त्यांना जन्मतःच होती. त्यामुळें त्यांनीं शंकराचार्य[1], कणाद[2], कपिल[3], गौतम[4], पतंजली[5], जैमिनी[6], व्यास[7], कृष्ण[8], यांच्यासारखे पौर्वात्य तत्वज्ञानी, तसेंच कँट[9], हेगेल[10], गँटे[11], फिचे[12], शोपेनहार[13], कॉमटे[14], आणि कॉर्लाईल[15] यांच्यासारखे पश्चिमेकडील तत्त्ववेत्ते आणि हाफीझ[16], आत्तार[17].

---

१ शंकराचार्यः—अद्वैतमतप्रस्थापक आद्य शंकराचार्य.

२ कणादः—वैशेषिकपद्धतकार मुनि व तत्त्ववेत्ता.

३ कपिलः—सांख्ययोगपुरस्कर्ता तत्वज्ञानी.

४ गौतमः—बौद्धधर्मप्रस्थापक अथवा प्रसिद्ध न्याय दर्शनकार.

५ पतंजलीः—योगशास्त्रकार.

६ जैमिनीः—मीमांसाकार.

७ व्यासः—पुराणकार.

८ कृष्णः—भगवान् श्रीकृष्ण.

९ कँट, १० हेगेल, ११ गटे :—जर्मनमधील अज्ञेयवादी तत्ववेत्ते. हे बुद्धिप्रामाण्यवादी होते.

१२ फिचेः—हा प्रसिद्ध विद्याविशारद व तत्ववेत्ता कांहीं अंशीं आस्तिकवादी होता.

१३ शोपेनहारः—वेदान्तमतप्रसारक जर्मनींतील तत्तवेत्ता.

१४ कॉमटेः—हा एक प्रख्यात तत्वज्ञ होता.

१५ कार्लाइलः—इंग्लंडमधील ज्ञेयवादी तत्ववेत्ता.

१६ हाफीझः—मूळ नांव ' शम्स-उद्दीन-महंमद. हा सुफी पंथाचा फारसी कवी होता.

१७ आत्तारः—इराणांतील कवी व तत्वज्ञानी.

शम्सतंब्रेज[1], मौलाना[2] रूम यांसारखे इराणी तत्त्ववेते यामध्यें स्वामी पूर्ण पारंगत होते. तसेंच त्यांच्या जोडीला तुलसीदास, सूरदास, कबीर, तुकाराम, नानक वगैरे संतकवी स्वामींना भक्तिरसांत निमग्न करण्यास कारणीभूत झाले. किंबहुना स्वामींना दिव्य भक्तीची स्फूर्ति यांनीच दिली.

स्वामींना जशी धर्म व तत्वज्ञान यांची आवड होती तशी आधुनिक शास्त्रांचीही होती. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, रसायनशास्त्र व वनस्पतिशास्त्र हे त्यांच्या आवडीचे विषय होते. तसेंच जडविज्ञानशास्त्रांच्या तत्त्वज्ञानांत 'विकासवाद' हा त्यांच्या आवडीचा विषय असून त्याचा त्यांनी स्पायनोझा[3], स्पेन्सर[4], डार्विन[5], हेकेल[6], टिंडॉल[7], हक्स्ले[8], आणि प्रो. जेम्स[9] यांच्यासारख्या तत्त्वज्ञांशीं चांगलाच परिचय करून घेतला होता. शिवाय गणितशास्त्रांत तर स्वामींचा हातखंडा असे. त्यांची गणितांतील बुद्धि किती तीव्र होती ही गोष्ट 'गणिताच्या अध्ययनाचें महत्व' ह्या त्यांनी शिक्षणकालांत लिहिलेल्या निबंधावरून स्पष्टपणें दिसून येतें.

अमेरिकेंत असतांना तेथील सर्व वाङ्मयाचें त्यांनी आलोडन केलें. त्यामध्यें इमर्सन, थोरो व व्हिटमन हे वेदान्ति तत्ववेत्ते त्यांना फार प्रिय होते.

---

१ शम्स तब्रेजः—फारसी प्रासादिक कवी. हा आत्मज्ञान संपन्न होता.

२ मौलाना रूमः—मूळचें नांव 'स्वामी ज्वाल.' हा सुफीपंथाचा तत्वज्ञानी होता.

३ स्पायनोझाः— ग्रीक तत्ववेत्ता.

४ स्पेन्सरः—अज्ञेयवादी आंग्ल तत्वज्ञ. सांयोगिक तत्वज्ञानाचा जनक.

५ डार्विनः—इंग्लंडमधील उत्क्रांतिवादांचा प्रमुख पुरस्कर्ता.

६ हेकेलः—अज्ञेयवादी जर्मन तत्त्वज्ञ.

७ टिंडालः—रसायनशास्त्रज्ञ व अज्ञेयवादी तत्त्ववेत्ता.

८ हक्स्लेः—अज्ञेयवादी, गणितशास्त्रज्ञ आंग्ल तत्त्ववेत्ता.

९ प्रो. जेम्सः—अमेरिकेंतील मानसशास्त्रवेत्त्यांचा मुकुटमणी.

स्वामींच्या विद्याव्यासंगाची कमाल म्हटली म्हणजे त्यांचीं इ. स. १९०६ मध्यें समाधीपूर्वी एक वर्ष, केलेला चारी वेदांचा अभ्यास ही गोष्ट होय. एखाद्या भाषाशास्त्रज्ञाच्या शैलीनें ते वेदाच्या प्रत्येक मंत्राचा अर्थ लावीत.

एकंदरींत स्वामींना पर्शियन, उर्दू, हिंदी, इंग्रजी आणि संस्कृत या भाषा उत्कृष्ट येत होत्या, व त्यांतील भागांतून उत्कृष्ट ते गेले होते.

ज्यावेळीं जगांतील उत्तमोत्तम ग्रंथकार, कवी, तत्त्ववेत्ते आणि अध्यात्मवादी विभूतीचे स्वतःच्या दृष्टीने ते परीक्षण करीत त्यावेळीं त्यांच्या ठिकाणीं अहंकार व विद्वत्ता यांची छटा देखील दिसत नसून एक प्रकारचा विशिष्ट बेफिकीरपणा व निःपक्षपातीपणा दिसे. याचा मासला त्याच्या पुढीलपत्रा वरून दिसून येतो. यावेळीं त्यांचें वय अवघें चोवीस वर्षांचे होतें हें नमूद करणें अवश्य आहे.

" ९ दिजंबर १८९७

" **याज्ञवल्क्य** आणि **अष्टावक्र** यांची योग्यता राजा **जनकाहून** श्रेष्ठ आहे. राजा **जनक** आणि **श्रीकृष्ण** परमात्मा हे बी. ए. च्या वर्गातील असून **याज्ञवल्क्य** व **अष्टावक्र** हे एम्. ए. च्या वर्गातील होत.''

यावरून जगांतील एक विचारी पुरुष या दृष्टीने त्यांची योग्यता केवढी असावी ह्याची कल्पना येते. कवी या नात्याने स्वामींची योग्यता आपण मागेंच पाहिली आहे. वेदान्तावरील वक्ते व लेखक ह्या दृष्टीने तर ते भाषेचा सोपेपणा, दृष्टांतांची व्यावहारिकता व समर्पकता, गाढ विद्वत्ता व भाषेचा जोर ह्या गुणांत अद्वितीय आहेत. भाषण करितांना श्रोत्यांच्या मनावर जणुं काय ते ' मूर्च्छनाशास्त्राचा ' प्रयोग करीत आहेत असें वाटे. त्यावेळीं ते आपलें हृदय श्रोतृवृंदाच्या हृदयांत ओतीत आहेत असे भासे कोणतीही गोष्ट ते अधिकारयुक्त वाणीनें सांगत. यामुळे त्यांचे शब्द अनुल्लंघनीय व वजनदार भासत. व्याख्यान देतांना ते त्याच्याशी इतके समरस होऊन जात कीं, ताबडतोब त्यांचा चेहेरा प्रफुल्लित होऊन त्यावर अष्टसात्विकभाव उमटत व लगेच ते समाधिसुखांत मग्न होत !

स्वामी चित्रकलेंतही निपुण होते या गोष्टीचा जातां जातां उल्लेख करणें अवश्य आहे.

अशा रीतीनें त्यांच्या व्यक्तित्वाचें व चरित्राचें वर्णन आणि **तीर्थरामाचा स्वामी रामतीर्थांत** झालेला विकास त्यांच्याच प्रेरणेनें केलेला आहे. महात्म्यांचीं चरित्रें वर्णित असतांना, त्यांचें गुणगान करितांना जो आनंद प्राप्त होतो तोच खरा आनंद ! त्यांच्या संगतींत जो काळ जातो तोच खरा सत्संग व काळाचा सदुपयोग ! त्यांच्या गुणांचें कीर्तन करणें हाच खरा वाणीचा उपयोग आणि त्याचेंच मनन, चिंतन सदा करणें हाच खरा बुद्धीचा उपयोग ! अशा रीतीनें सर्वेंद्रियांना कामीं लावणें हाच या मानवी शरीराचा योग्य उपयोग ! यास्तव हा देह असाच कारणीं लागावा अशी त्या विश्वव्यापी व विश्वव्यापहारी आणि विश्वस्फूर्तिकारी **रामा**जवळ प्रार्थनाकरून वाचक वर्गाची रजा घेतों.

**रामराम !**

परमात्मा दृष्टीनें पाहतां जग हा एक सौंदर्याचा लोट आहे, आनंदाचा अखंड प्रवाह आहे, किंवा सौख्याचा सागर आहे, असें वाटतें. **परमात्म दृष्टीला सर्व कांहीं सच्चिदानंदमय दिसतें.** दृष्टींतील संकुचितपणा नाहींसा झाला की, कोणतीच गोष्ट कुरूप किंवा विरूप दिसेनाशी होते. ज्याअर्थी सर्व कांहीं **मी** आहे, माझ्या आत्म्यानें धारण केलेलीं तीं विविध रूपें आहेत, त्या अर्थी कोणतीही वस्तु घनीभूत आनंदाशिवाय दुसरें काय असूं शकणार ! **आत्मा आनंदरूप असल्यामुळें सर्व जग हा आनंदाचा कंद आहे देह भावाचा निरास हाच परमानंद ! हीच साक्षात्काराची परमोच्च स्थिती ! '**

* * * * *

" मानमरातबाकरितां व पदव्यांकरितां हपापलेल्या लोकांनों ! ज्ञानार्जनाकरितां देह झिजविणाऱ्या मूर्खांनो, समाजसुधारकानों आडमुठ्या दगड फोडयांनों, शाबास ! जीते रहो ! **राम** तुमचें कल्याण करो. प्रिय करानों आपलीं कर्तव्यें बजावीत जा. खुशाल दगड घांसा. मोठ्या आशेनें आणि आस्थेनें आपापलीं कर्तव्यकर्मे करीत जा. तुमचे परिश्रम अत्यंत यशस्वी होवोत !

तुह्मीं आपल्या मुक्कामावर सुखरूपपणें जाऊन पोहोंचा. संकेताच्या मुक्कामावर आनंद तुमचें स्वागत करो! **रामासंबंधानें** पुसाल तर **रामाचा** मार्ग अगदीं भिन्न आहे. अनंतत्व हें **रामाचें** संकेतस्थान आहे. रामाची दर्शिका ठेपीची आहे. मधल्या मुक्कामावर त्याला उतरतां येणार नाही. लाडक्यांनों रामराम!"

वाचकहो **रामाची** मुद्रा असलेली ठेपीची दर्शिका आपणही घेऊन प्रवासाला निघूं या.

ॐ! ॐ!! ॐ!!!

## स्वामींचा संप्रदाय.

'आपल्या मतांचा अखिल भरतखंडावर प्रसार करण्यासाठीं एखादी संस्था स्थापणें आवश्यक आहे किंवा काय'? असा प्रश्न करणाऱ्या लोकांना ज्या स्वामींनीं

**सर्वा हि संस्था किल भारतस्थाः।**
**जानीत यूयं हृदयं मदीयम्।**
**आर्याः समस्ताः पथवर्ण भिन्नाः।**
**न बांधववाः किंत्वहमेव तेस्युः॥ १॥**

हें उत्तर दिलें त्यांचा 'संप्रदाय' हें शीर्षक वाचून घोटाळ्यांत पडण्याचें कारण नाहीं. कारण वरील उत्तरांतील लक्ष्यांशाकडे जनतेचें लक्ष वेधून जावें हाच एक हेतु स्वामींचा असावा असें वाटतें. कारण तसें नसतें तर त्यांनीं आपली '**स्वानंद मठाची**'* योजना लोकांपुढें मांडिलीच नसती शिवाय शिष्यशाखा उत्पन्न करून तिचा विस्तार करणें ही एक प्रकारची उपाधीच आहे, हा व्याप आहे. अशा भावनेनें जरी त्यांच्या मनांतून संप्रदाय नकोसा वाटला असेल तरीही तो त्यांच्या पश्चात्तरी चालणारच व चालतही आहे. अशी वस्तुथिति असूनही ती त्यांच्या ह्मणण्याला अगर विचाराला मुळींच बाधक नाहीं.

* या योजनेची सविस्तर माहिती 'स्वामी रामतीर्थ भा. ११' फडकेकृत पहा.

भगवान् **रामकृष्ण परमहंस** यांच्या प्रीत्यर्थ **स्वामीविवेकानंदांनीं** युरोप, अमेरिका व आशिया या खंडांत स्थापना केलेले मठ त्यांच्याद्वारें मानवजातीच्या उद्धाराचे होणारे प्रयत्न, व ते उत्पन्न करीत असलेले वातावरण आणि त्याचे परिणाम ह्या सर्वांचा विचार करितां स्वामी रामतीर्थांसारख्या ओजस्वी महात्म्याच्या शिकवणींचा प्रसार करणाऱ्या संस्था भारतवर्षाच्या व जगाच्या कल्याणाला किती अत्यंत आवश्यक आहेत ह्याची कल्पना येते. दुःखाची गोष्ट ही कीं, अशा संस्था भावी कार्याच्या व्यापकतेचा विचार केल्यास मुळीच नाहीत असे वाटतें. स्वामींच्या हयातींत त्याचे दिव्य अस्तित्व व ' अलफ् ' मासिक हेच काय ते त्यांच्या मताचा प्रसार करण्याचे दोन मार्ग होते व सध्यां त्या दोहोनांही आपण आंचवलों आहों ! तथापि त्यांच्या पश्चात् त्यांचे कार्य करणारी अशी एकच संस्था **लाहोर** येथे असून तिच्या द्वारें होणारे कार्यही बाल्यावस्थेत आहे. अशा संस्थाना पैसा व कार्यकारी व्यक्ति यांची अगदी आवश्यकता असते. या दोन घटकांच्या अभावी काम करणारी संस्था जिवंत नाही असे वाटल्यास नवल नाही. तथापि लाहोर येथील उपरिनिर्दिष्ट संस्थेचें आयुष्य व त्यांत तिनें केलेली कामगिरी ह्यांचा विचार केल्यास तिच्या उज्ज्वल भविष्यत्कालाची आशा वाटते.

स्वामींची शिष्यशाखा जरी अगदीं मर्यादित आहे तरी स्वामींना गुरुस्थानीं मानणारे व त्यांचें शिष्यत्व पत्करणारे पुष्कळ महाशय आहेत. हे पुढे दिलेल्या माहितीवरून समजेल.

---

१ ' रामतीर्थ प्रकाशक मंडळ ' ह्या नांवाची संस्था श्री. नारायणस्वामी व इतर शिष्यवर ह्यांच्या पुरस्कारामुळेच नुकतीच लाहोर येथे स्थापन झालेली असून ती स्वामींच्या वाङ्मयाचा प्रसार करण्याचे महत्कार्य करीत आहे. प्रथमतः ह्या संस्थेनें स्वामींचे वाङ्मय उर्दूमध्यें प्रसिद्ध केलें. पण गेल्या दोन वर्षांपासून तिनें हिंदी वाङ्मय भागांतही प्रवेश केला आहे व तेथेंही तिची कामगिरी संस्मरणीय होत आहे. परंतु बिचारी एकटी संस्था व तिचें कार्य हीं ' दरयामें खशखश ' अशीं वाटतात.

## स्वामींचे संन्यासी शिष्य.

१ श्री. नारायण स्वामी.

२ ,, स्वामी रामानंदजी ( समाधिस्थ ).

३ ,, स्वामी गोविंदानंदजी.

४ ,, स्वामी पूर्णानंदजी ( पूर्वाश्रमींचे गुरुदास रामप्रताप. )

शिवाय स्वामींचें शिष्यत्व मानणाऱ्या मंडळींत पुढे दिलेले महाशय आहेत.

श्री. लाला शालिग्राम ( लुधियाना ).

,, रघुवीरलाल साहेब ( फैजाबाद ).

,, बाबू बलदेव प्रसाद वकील ( ,, ) साधारणधर्म सभेचे चिटणीस.

,, मदन मोहन मालवीय ( अलाहाबाद ).

,, बाबू गंगा प्रसाद [ लखनौ ].

,, लाला निहालचंद साहब [ मुजाफर नगर ].

,, लाला रामानुज दयालराम [ मिरत ].

,, रा. ब. लाला बैजनाथ [ आग्रा ].

,, स्वामी ज्योति.स्वरूप [ डेराडून ]

आर्यसमाजाचे ' सुपरिटेंडेंट '

श्री. बलदेवसिंग साहेब [ डेराडून ]

,, स्वामी शिवानंदजी [ डेराडून, ' सत्  नावाच्या पत्राचे संपादक ].

,, लाला हरलाल नाझर—लाहोर.

,, डॉ. महम्मद अकबाल.

,, मियान महंमद हुसेन.

,, स्वामी परणसिंहजी.

,, स्वामी सूर्यानंद.

,, दिलमन साहेब.

,, डॉ. वेल्म.

# प्रकरण १० वें.

## स्वामींचीं मतें.

सत्पुरुषांचें बोलणें नेहमीं अनुभवसिद्ध व अनुभवप्रमाण असतें. त्याचप्रमाणें स्वामी जें जें बोलले, त्यांनीं ज्या ज्या मतांचा उल्लेख जागोजाग केला, त्या सर्वांचा त्यांनीं अनुभव घेतलेला होता. ' आधी केलें व मग सांगितलें ' ह्याबाबतीत जरी त्यांचे इतर महात्यांशीं साम्य होतें, तथापि निरनिराळ्या मतांचे बाबतींत त्यांचें वैशिष्ट्य हें होतेंच. हें वैशिष्ट्य पुढील मतांचें बाबतींत दिसून येतें. ( १ ) ज्याप्रमाणें विज्ञानशास्त्रांत सत्याधिगमाचे बाबतींत अधिकारप्रमाण नसून अनुभवप्रमाण आहे, तद्वत्‌च धार्मिक बाबतींत अधिकाराला मुळींच वजन नसून अगर अगदींच थोडें असून अनुभव हेंच खरें प्रमाण आहे. २ मनुष्यानें आपल्या अंतःस्वरूपाला, अंतरात्म्याला, आत्मदेवाला, आपल्या आयुष्यांतील यशापयशाच्या उच्चनीच मार्गानेंच प्राप्त करून घ्यावयाचें आहे. निव्वळ दुसऱ्याचे अनुभव कांहीं कामास येणार नाहींत. ( ३ ) जिवंत श्रद्धा हीच खऱ्या जीवनकलेचा आधारस्तंभ आहे. ( ४ ) जीवित हें एक मोठेंच उद्‌घाटन आहे. इत्यादि.

संपूर्ण अहंकारत्याग आणि आत्मसाक्षाकार हाच विश्वात्मसाक्षात्कार आहे. ह्या दोन कल्पनांचे प्रवाह त्यांच्या सर्व व्याख्यानांमधून व संभाषणांमधून वहात असलेले दिसतात. खोटा अहंकार हा सर्व बंधनांचें मूळ आहे. यास्तव त्याचा त्याग केल्यास ' अहंब्रह्मास्मिचा, व्यक्तिगत आत्मा हा अखिल विश्वाला व्यापून राहिला आहे. याचा अनुभव येईल. हा अनुभव घेणें हेंच मनुष्याचें इतिकर्तव्य असून ज्या साधनांनीं तें प्राप्त होईल त्याचा अवलंब करावा; मग तीं साधनें उच्च असोत वा नीच असोत, सुकर असोत वा दुष्कर असोत. संपूर्ण अहंग्रहन्यास ही जरी त्या अनुभवाची किल्ली आहे तथापि तत्प्राप्त्यर्थ योजावयाचे उपाय व्यक्तिभिन्नत्वाप्रमाणें भिन्न भिन्न आहेत

अशी **स्वामींची** विचारसरणी असल्यामुळें त्यांनीं विशिष्ट मतसंप्रदाय उत्पन्न केला नसून त्यांना जे अनुभव आले व ते साध्य करितांना ज्या विविध उपायांचा त्यांनी अवलंब केला त्यांचाच उल्लेख ते सामान्यस्वरूपानें करीत.

आत्मसाक्षात्कारप्राप्ति हेंच प्रत्येकाचें इष्टसाध्य आहे असे स्वामींचे मत असल्याकारणाने प्रत्येकाची वैयक्तिक व सामाजिक वर्तणूक त्या ध्येयाला पोषकच असली पाहिजे असें त्यांचे म्हणणें आहे. जी गोष्ट व्यक्तीची तीच गोष्ट राष्ट्रांची. ह्मणून राष्ट्रांतील धार्मिक, राजकीय, सामाजिक इत्यादि सर्व चळवळी परस्परांशीं सुसंगत असाव्या, परस्परांना पोषक असाव्या, त्यांचें उगमस्थान आत्मगत असून त्यांचा परिपाक आत्मविकासांत व्हावा, किंबहुना व्यक्तिगत आत्म्याचा विकास विश्वात्म्यांत होईल अशा स्वरूपाच्या त्या असाव्या असें त्यांचें मत होतें. पाश्चात्य राष्ट्रांनी पुरस्कार केलेलें राष्ट्रीयत्व हें आत्मविघातक आहे असेंच त्यांचें मत होते हें येथें नमूद करणे अत्यावश्यक आहे. पुढे दिलेल्या त्यांच्या मतांचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास वरील म्हणण्याची सत्यता पटेल.

## [ १ ] धार्मिक मतें.

" जगांतील सर्व धर्म आणि पंथ ' **मी त्याचा आहें** ' ( तस्यैवाहम् ) ' **मी तुझा आहें** ' ( तवैवाहम् ) व ' **मी तूंच आहें,** ' ( त्वमेवाहम् ) या तीन वर्गांपैकीं कोणत्याही वर्गांत मोडतात. "

**'मी ईश्वर आहें,' 'ईश्वरा ! मी तूंच आहें' ही स्थिति प्राप्त होणें व नराचा नारायण बनणें हेंच धर्माचें अंतिम साध्य होय.'**

' आत्मसाक्षात्काराकडे पद्धतशीर रीतीनें जाणाऱ्या कोणत्याही मार्गाला **धर्म हें नांव दिलें** जातें.

' धर्म दोन प्रकारचा आहे. [ १ ] उदार धर्म. हा अंधविश्वासाचा आहे. [ २ ] रोख धर्म. हा आचरण करण्याकरितां आहे.

'शरीर व तज्जन्य अहंकार यांना ख्रिस्ताप्रमाणे सुळावर चढविणें हाच **धर्माचा खरा अर्थ**.

'ज्ञान आचरणांत आणणें हाच खरा प्रवृत्तिपर वेदान्त होय. वेदांत ह्मणजे तत्वांचें तत्व. ज्ञानाचा अंत.

'श्रद्धा ही धर्माचा आधार आहे. पण श्रद्धेचा ओघ बाहिर्मुख न करितां तो अंतर्मुख करणें, आत्मश्रद्धा ठेवणें हाच खरा श्रद्धेचा स्वाभाविक मार्ग आहे.'

'अविरत कर्म, अविश्रांत परिश्रम, सततोद्योग हाच प्रापंचिकांचा अत्यंत श्रेयस्कर धर्म, श्रेष्ठतर योग होय.'

'कर्माकरितांच कर्म करणें हेंच खरें कर्म.'

'अहंब्रह्मास्मि' हें महावाक्य आहे. याचें मनन, चिंतन, व निदिध्यास केल्यानें तुमच्या ठिकाणीं दिव्य सामर्थ्य प्रगट होईल. याकरितां जिवंत श्रद्धेची आवश्यकता आहे.

'प्रेम हा एकच एक ईश्वरी कायदा आहे. परंतु वैषयिय प्रेम मात्र कांहीं कामाचें नाहीं. प्रेम ह्मणजे भक्ति. भक्ति, उपासना किंवा अनुराग ह्या शब्दांमध्यें ज्या भावना अंतर्भूत झालेल्या आहेत त्या एकाच प्रेमाचीं भिन्न भिन्न स्वरूपें आहेत.

'परमेश्वर प्रेममय व प्रेमस्वरूप असल्या कारणनें त्याला प्रेमानेंच प्राप्त करून घेतला पाहिजे.

'प्रेमस्वरूप नारायणानें आपल्या अंतःकरणांत एकदां बिऱ्हाड ठोकल्यावर सोद्या मामल्यांची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. प्रेमांत स्थिर व्हा, सर्वात्मभाव आंगीं बाणवून घ्या, ह्मणजे सर्व प्रकारच्या सिद्धी तुमच्या घरीं पाणी भरूं लागतील.

निर्हेतुक प्रेम ह्मणजेही भक्तीच. पण भक्ति ह्मणजे ईश्वराच्या नांवानें नुसतें ओरडणें नव्हे. भक्ति ह्मणजे भिक्षांदेहीची वृत्ति नव्हे. 'मी दीन आहें, मी पापी आहें, मी दासानुदास आहें,' अशा तऱ्हेची दुबळेपणाची याचना ही

कांहीं खरी भक्ति नव्हे. भक्ति याचा खरा अर्थ समत्वभावाची अनिर्वचनीय स्थिति, ज्ञानयुक्त प्रेममयता आणि ईश्वरी प्रेमाची दिव्यता असा आहे. सर्वत्र त्या पूर्णाचें–त्या परमात्म्याचे दर्शन होणें, ज्या ज्या ठिकाणीं आपलें नेत्र जाऊन पोंचतात, त्या त्या ठिकाणीं आत्मतत्त्व प्रतीत होणे, अखिल चराचरांत ऐश्वरभावाचें सौंदर्य–अनुभवास येणे ही त्या भक्तीची खूण आहे. तेंच मी आहे व तेंच तूं आहेस. ' तत्त्वमसि '

' मनोविजय ही परमार्थांत महत्वाची गोष्ट आहे. चित्तशुद्धीशिवाय मनोविजय नाहीं.

' त्यागाशिवाय मोक्ष नाहीं. वैराग्याशिवाय आत्मज्ञान नाहीं. पण वैराग्य याचा अर्थ गुडघ्यात डोके घालून बसणें, दैवावर हवालणे, दुबळें बनणें असा नाहीं. तसेंच हट्टाने अंगाला राख फांसून बैरागी बनणे म्हणजे वैराग्य नव्हे ! तर वैराग्य याचा अर्थ आपले सर्वस्व सत्याकरितां अर्पण करणे हाच आहे.

' रूढीच्या तंत्राप्रमाणे वागणे हा दुबळेपणा आहे. '

' ज्याला जगांतील नखरे टखरे हालवूं शकत नाहींत तो जगाला जरूर हालवूं शकतो. लग्न झालेलें नसूनही अकलेच्या किंवा आध्यात्मिक कार्यात ज्यांचा काल जात नाहीं त्यांना ब्रह्मचारी म्हणतां येत नाहीं.

प्रपंचांत राहूनच परमार्थ साधा. परंतु वैराग्याशिवाय तुमचा प्रपंच सुखाचा होणें, तुमचीं रहातीं घरें स्वर्गोपम होणे कधींही शक्य नाहीं.

' वैराग्य व ज्ञान हे दोन शद्ब वास्तविक पर्यायशब्द आहेत. कोणत्याही परिस्थितींत, सर्वत्र व सर्वदा वैराग्य आचरणांत आणितां येतें. विवाहित स्त्रीपुरुषांनाही हें वैराग्य संपादितां येतें.

वैवाहिक स्थिती ही आत्मसंयमनाची शाळा आहे 'कौटुंबिक संबंधाचा' योग्य उपयोग केल्यास ईश्वरप्राप्तीचा मार्ग निष्कंटक, निर्विघ्न आणि सुखकर होईल.

‘ भूतमात्रांचे ठिकाणीं भगवद्भावानें पहाणें ह्मणजेंच कौटुंबिक संबंध तोडणें; स्त्रीपुत्रादिकांना स्त्री–पुत्र न मानितां ईश्वररूप मानणें, बंधन फक्त एका ईश्वराचेच ठेवणें, याचेंच नांव सर्वसंगपरित्याग किंवा वैराग्य.

स्त्रीला आपल्या प्रेमाचा परिघ बनवूं नका. प्रेमाच्या क्षुद्र व सकुंचित कल्पनांनीं तुह्मी स्वतःचा व भार्येचा अधःपात करितां. प्रेमाच्या विकासाचा पहिला धडा पुरुषाला पत्नीकडून मिळतो, परंतु हा विकास तिच्याच ठिकाणीं समाप्त न करितां विश्वव्यापी बनवा.

‘ शील संवर्धनाशिवाय उन्नति नाही. खरे शील याचा अर्थ अंतःकरणांतील शुद्ध प्रेम आणि स्वार्थत्याग हाच आहे.

## ( २ ) सामाजिक मतें.

‘ श्रमविभागाचे तत्व हें न्याय्य व आवश्यक तत्व आहे. ह्याच तत्वावर हिंदूंची वर्ण व्यवस्था ठरविण्यांत आली. उघड उघड व्यवहाराच्या धोरणावर हिंदुस्थानांतील जनतेचे त्यांच्या योग्यतेनुरूप चार विभाग पाडण्यात आले. असे वर्ग साऱ्या जगांत आहेत.

व्यवहाराच्या व्यवसायांची विभागणी व्हावी; परंतु, अंतःकरणांत परस्पर प्रेम व ऐक्य असावे या तत्त्वावर हिंदूंच्या जातिभेदाची उभारणी करण्यांत आली.

जगांत अस्वाभाविक जातिभेदानां ऊत येत आहेत, हे अस्वाभाविक जातिभेद आणि त्यानें उत्पन्न होणारा द्वेषभाव ही नाहींशी झाल्याशिवाय बुद्धीच्या वाढीला अनुकूल परिस्थिति उत्पन्न होऊं शकणार नाहीं.

‘ गरीब लोक हे समाजाचे पाय किंवा पाया होत. जो शिरजोर समाज खालच्या वाढीला अडथळा करितो, खालच्या वर्गातील लोकांच्या शिक्षणाच्या आड येतो, तो आपण होऊन आपल्या घराचा पाया पोखरीत आहे.

‘ लोकसंख्येच्या बेसुमार वाढीबरोबर व्यवहारज्ञानाचा अभाव हा भारतवर्षापुढें सध्यांच्याकाळीं मोठा बिकट प्रश्न उपस्थित झाला आहे. व्यवहारज्ञानाच्या अभावामध्यें शारीरिक कष्ट करण्याचा तिरस्कार, जाति आणि पंथ

यांच्या संबंधाचे अस्वाभाविक निर्बंध, परदेशगमनाबद्दलची परांमुखता, बालविवाह आणि शारीरिक, बौद्धिक वगैरे बाबतींत स्त्रीसमाजाला अज्ञानांधकारांत दडपून टाकणारे नियम, वगैरे अनेक बाबींचा समावेश होतो. आपल्या प्राचीन पूर्वजांकडून वंशपरंपरेनें लाधलेल्या ज्ञाननिधीवांचून आपलें चालणार नाहीं. कारण जो समाज आपल्या प्राचीन परंपराप्राप्त संपत्तीला लाथ मारून देतो, त्याच्यावर बाहेरून आपत्ति कोसळून त्याचा नाश होणें अपरिहार्य आहे. तसेच ज्या समाजांत प्राचीन वैभवाचा फाजील अभिमान वावरूं लागतो, असा समाज अंतर्गत कलहाला बळी पडलाच ह्मणून समजा ! कोणतेंही राष्ट्र वैभवसंपन्न होतें तें त्यामधील मोठ्या माणसांच्या क्षुद्र विचारांमुळें होत नसून क्षुद्र माणसांच्या प्रगल्भ विचारांमुळे होत असतें.

'आपल्या संप्रदायाच्या अभिमानामुळें लोकांतील मनुष्यपणा पर लोपून गेला असून राष्ट्रीयत्वाच्या भावनेला खग्रास ग्रहण लागले आहे !'

'उच्चवर्णाच्या लोकांबरोबर मागसलेल्या जातींतील लोकांनाही सुसंकृत करणे, स्वाधीनेची तेजस्वीवृत्ति त्यांच्या ठिकाणी निर्माण करणें, तसेंच सत्याच्या ज्ञानानें येणारें औदार्ययुक्त सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करणें ह्या गोष्टींची आजच्या परिस्थितीत विशेष जरूरी आहे.

हिंदुस्थानची स्थिति सुधारण्याकरितां परदेशांतून येणारी धर्मप्रसारक मंडळें आल्यानें आमची स्थिति सुधारत नसून उलट बिघडत मात्र आहे.

नीतिपाठ आणि धर्मवचनें यांच्या जोरावर जगाची सुधारणा करूं पहाणें शुद्ध वेडगळपणाचें आहे.

प्राचीन चालीरीतींना चिकटून बसून चालणार नाहीं. त्यांत परिस्थित्यनुरूप योग्य फेरफार केले पाहिजेत. आनुवंशिकतेलाच चिकटून चालणार नाहीं. ह्मणून संयोगशक्तीचा योग्य उपयोग करण्यास शिका.

बालविवाह व बालविधवा हा प्रश्नच साऱ्या जगांत अश्रुतपूर्व व अस्वाभाविक नाहीं काय ? सौभाग्यहीन बालिकांचें सुकुमार हस्त तुह्मी साहाय्य काल ह्मणून अजाणतां तुमच्यापुढें केले जात आहेत ! रूढीच्या भडाग्नींत जिवंत

सती तुमच्या डोळ्यांदेखत भडाभड जळत आहेत. त्यांच्या निष्पाप आणि अश्रुपूर्ण नेत्रांच्याद्वारें प्रत्यक्ष परमेश्वर तुमच्या सहाय्याची याचना करीत आहे. आक्रोश करणाऱ्या ह्या भवानीच्या विलापांकडे तुह्मी किती दिवस पाठ फिरविणार ! या प्रश्नाचा नीट विचार करा व योग्य ते फेरफार करा.

मानसिक वाढ होऊं न देतां प्रजोत्पादन शक्तीलाच महत्व देऊन आह्मी आपली बौद्धिक अवनति अशीच किती दिवस चालू ठेवणार ? मलिन अशा कामवासनांचा त्याग करणार नाही, तर उत्क्रांतीच्या निष्ठुर चक्रांत सांपडून तुमचा सर्वस्वी चुराडा होईल.

थोडींच पण कर्तृत्ववान् मुले व्हावी, अशी तिकडील उच्चदर्जाच्या लोकांची समजूत आहे. ती अनुकरणीय नाहीं काय ?

## ( ३ ) शिक्षणविषयक मतें.

**' स्वातंत्र्य हेंच शिक्षणाचें ध्येय. शिक्षणानें स्वाधीनता येत नसेल तर त्या शिक्षणाला धिक्कार असो !**

देशांतील साधनसामग्रीचा योग्य उपयोग करून घेण्याचें सामर्थ्य आंगीं आणणें हाच शिक्षणाचा खरा हेतु आहे.

परा व अपरा या दोन्ही विद्यांचे ज्ञान असल्याशिवाय चालणार नाही.

निरनिराळे देश पहाणें हें स्वतःच एक शिक्षण आहे. केंस पांढरे होईपर्यंत शिकत जा.

आह्मांला उद्योगधंद्यांचें शिक्षण देणाऱ्या शाळा नकोत असें नाहीं, तथापि खऱ्या ज्ञानाचा प्रसार ही आमची तात्कालिक व महत्वाची गरज आहे.

लोकांची नीति सुधारण्यास त्यांना जिवंत ज्ञान शिकविणें जरूर आहे.

अविनाशी आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून देणाऱ्या उपकारक वेदान्ताची सध्यां हिंदुस्थानांत अत्यंत जरूरी आहे.

भौतिकशास्त्रें, कला, व इतर उघड उघड व्यवहारोपयोगी हुन्नर यांचा वेदान्ताकडे उपयोग करण्याच्या दृष्टीनेंच त्यांचें शिक्षण दिलें जावें.

लोकांची आंदोलनात्मक दृष्टि नाहींशी करून आपलें स्वाभाविक ऐश्वर्य त्यांना पटवून देणें, स्वाभाविक आणि सापेक्ष विशिष्टीकरणानें अत्यंत स्वाभाविक व शाश्वत ऐक्य घडविणें ह्या कार्यक्षम वेदान्ताची सध्यां जरूरी आहे. ह्या सत्यज्ञानाची सध्यां जरूरी आहे.

**बद्धतेमध्यें ठेवणाऱ्या शिक्षणाची मात्र मुळींच गरज नाहीं.**

मृतभाषा, गणित, भूतकालीन इतिहास, औपपत्तिक रसायनशास्त्र, सर्व प्रकारचीं अव्यावहारिक शास्त्रे इत्यादि विषय हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांतून शिकविले जातात. ज्यांना कला शिकविणारीं विद्यालयें ह्मणतात त्यांमधून तत्त्वज्ञानासारखीं भावनाधिगम रुक्ष शास्त्रें शिकविण्यांत येतात. परंतु व्यवहारोपयोगी एकही शास्त्र किंवा एकही उपयुक्त कला प्रायः शिकविलीं जात नाहीं. व्यवहारोपयोगी रसायनशास्त्र फारसें शिकविलें जात नाही. सामान्य व उपयुक्त कलांच्या शिक्षणाचीही सोय केलेली नाहीं. शास्त्रांच्या शिक्षणाची तर गोष्टच बोलावयाला नको.

मुलांच्या ठिकाणी ज्ञानाची आवड उत्पन्न होत नसेल तर तें शिक्षणच कसले ?

**पुस्तकीज्ञान डोक्यांत कोंबणें हा ज्ञानाचा खरा मार्ग नसून** चित्त शुद्ध करून **आंतील** आंतील ज्ञान प्रगट करणे, हाच खरा मार्ग होय.

' गुणग्राहकता, भ्रातृभाव, संयोगी करणाची साहाजिक प्रवृत्ति, राष्ट्रीय व्यवसायांत परस्परानुकूल श्रमविभागाची प्रवृत्ति, तसेंच शारीरिक कष्टांना, श्रेष्ठ लेखण्याची प्रवृत्ति हें गुण उत्पन्न करणारें शिक्षण सध्यां आह्मांस पाहिजे.

सत्याचें यथार्थ ज्ञान करून देण्याचीच हिंदुस्थानांत अत्यंत जरूरी आहे. प्रेम, न्याय, आणि स्वतंत्रता या भावनांचा परिपोष ह्मणजेच व्यावहारिक वेदान्त. व्यावहारिक वेदान्त हेंच प्रत्येक राष्ट्राचें जीवनतत्त्व आहे.

सर्वात्मभावाच्या दिव्य चक्षूनीं सर्व वस्तूंकडे पहाणें हाच खऱ्या शिक्षणाचा अर्थ आहे.

शेजारीं रहाणाऱ्या भगिणीला लिहिण्यावाचण्यास शिकविण्याची तुह्मांस लाज किंवा भय वाटतें काय ? तसें असेल तर तुमच्या विद्येला, तुमच्या

विचारांना आणि तुमच्या उच्च नीतिमत्तेला धिक्कार असो! देशांतील स्त्रिया आणि खालच्या वर्गांतील पुरुष यांना साक्षर करणें हें तुमचें पवित्रतम कर्तव्य आहे. मुलींच्या सरकारी शाळा निघतील ह्मणून वाट पाहूं नका. हिंदुस्थान जिवंत रहावा अशी तुमची इच्छा असेल, तर स्त्रीशिक्षणाचा प्रसार सर्वत्र मोठ्या झपाट्यानें झाला पाहिजे.

बहुजनसमाजाला सुशिक्षित करण्याचा अगदीं जवळचा आणि साधा उपाय ह्मटला ह्मणजे हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांची स्थिति सुधारणे हा होय. उपयुक्तज्ञानाचा प्रसार करणारीं नवीं नवीं पत्रे काढा; आणि जुन्यांत योग्य त्या सुधारणा करा. पण हीं पत्रे देशी भाषेंत असूं द्यात. त्यांमधून पदार्थविज्ञान, इंद्रियविज्ञानशास्त्र, ज्योतिर्गणित, इतिहास, अर्थशास्त्र, मनोविज्ञान इत्यादि विद्यांचीं मूलतत्त्वें शक्य तितक्या सोप्या व मनोरंजक भाषेत लोकांपुढें मांडा.

ज्या भारतमातेने आपल्या काव्यरूप व तत्त्वज्ञानरूप पौष्टिक दुग्धानें साऱ्या जगाचें पोषण केलें, ज्या मातेनें धर्मविषयक उदात्त कल्पनांचे पौष्टिक अन्न प्रेमळ अंःतकरणानें साऱ्या जगाला वाटलें, ती जगज्जननी भारतमाता आज शरपंजरीं विव्हळत पडली आहे. याकरितां निव्वळ तिच्या हितार्थ नव्हे तर साऱ्या जगाच्या कल्याणाच्या दृष्टीनें सत्य व न्याय यांच्या नांवानें तिला मदत करणें, तिचा कैवार घेणे हेंच इष्ट आहे.

**डूबा तारा तुह्मारा पूरबको।**
**ब्रह्मविद्या चली है यूरपको॥**

ही स्थिति पूर्णपणें ध्यानांत घेऊन ‘ ब्राह्मणो ’ ! आप सीख लो विद्या। आणि

**टीका अद्वैतका लगा देना॥**
**गर न माने तो पकडकर बाजू।**
**टीका यह तीन जा लगा देना॥**
**दर्द भी होगा, पीड भी होगी।**
**डर का नोटस न तुम जरा लेना॥**

**भावार्थः**—अद्वैत ज्ञानाच्या देवी सर्वांना काढा जर कोणी देवी काढूं देणार नाही तर त्याचा हात पकडून तीन ठिकाणीं ह्या देवी टोंचा. हें काम करतांना व केल्यावर दुःख व पीडा देखील होतील. पण त्यांचें भय बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं.

**प्यारे हिंदुस्थान ! फलो फूलो ।**
**पौंदे पौंदे ब्रह्मविद्या दो ॥**

**भावार्थः**—हे प्यारे भारतवासियांनों जागो जाग ब्रह्मविद्या फलफूलीत होऊं द्या.

## ( ४ ) राजकीय मतें.

**ज्या मुद्यांवर आपणा सर्वांचे ऐक्य होऊं शकतें, तेवढेच घेऊन त्यांच्यावरच आपलें सामर्थ्य खर्च करूं या.**

उदासीनतेची सहानुभूती अथवा निरुत्साही परमतसहिष्णुता यांनीं आतां काम भागणार नाही. राष्ट्रीयत्वाची जिवंत भावना सर्व लोकांच्या अंतःकरणांत उदित करण्याच्या कामीं हिंदुस्थानांतील प्रत्येक सुपुत्रानें प्रत्यक्ष सहाय्य करावें.

सर्व राष्ट्राशीं स्वतःचें तादात्म्य अनुभविण्याला शिकल्याशिवाय, आपल्या नसानसांतून राष्ट्रीय भावनांचे स्फुरण झाल्याशिवाय, परमात्मतत्त्वाशीं ऐक्य होणें शक्य नाहीं. राष्ट्रीय भावना ही सर्वव्यापी परमात्म भावनेची पूर्वतयारी आहे.

हिंदुस्थानांतील प्रत्येक सत्पुत्राच्या ठिकाणीं अखिल भारतवर्षाला पाहण्याच्या राष्ट्रीय भावनेचा अभ्यास करून हिंदमातेचा प्रत्येक सत्पुत्र राष्ट्रसेवेस सिद्ध होऊं द्या.

राष्ट्रीय ऐक्याच्या भावनेचा उत्कर्ष होण्याकरितां कडक जातिनिर्बंध थोडेसे ढिले करण्याविषयीं व जातिभेदाची तीव्रता थोडीशी कमी करण्याविषयीं तुमचा आपत्तिधर्म तुह्मांला आग्रहानें पुनः पुनः सांगत आहे.

ज्या मानानें दगडी कोळशाचा पुरवठा कमी अधिक असेल, त्या मानाने अग्नि व प्रकाश कमी अधिक उत्पन्न होतात. राष्ट्रांतील कोणत्याही चळवळींतील ओजस्विता व तेजस्विता राष्ट्रांतील तमोगुणाचा योग्य उपयोग करून घेण्यावर अवलंबून असतात. तमोगुणाशिवाय रजोगुणाचे तेज व सत्वगुणाचा प्रकाश पडत नसतो.

तुमच्या भावनात्मक अमूर्त राष्ट्रीय धर्माला मूर्त स्वरूप देण्याकरितां पूर्ण संन्यासवृत्ति स्वीकारणे फार जरुरीचे आहे.

जो राष्ट्रोन्नतीचे विचार करण्याकडेच आपल्या बुद्धिमत्तेचा उपयोग करितो तोच खरा **ब्राह्मण**.

स्वदेशाकरितां आत्मयज्ञ करण्यास प्रतिक्षणीं सिद्ध असणे, हीच खरी **क्षात्रवृत्ति**.

जी संपत्ति देवदयेने आपणांला मिळाली आहे, ती केवळ स्वतःच्या चैनीकरितां मिळालेली नसून राष्ट्रकार्यार्थ खर्च करण्यासाठीं आपणांजवळ ठेविलेली ती राष्ट्राची ठेव आहे, अशी अंतःकरणाची भावना करणे हीच खरी **वैश्यवृत्ति**.

ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही वृत्तीचे तेज आपल्या आंगी बाणवून **पवित्र शूद्रांप्रमाणें** स्वतः कष्ट करून ते तेज कृतींत आणा.

सर्व राष्ट्राचें कल्याण होण्यांतच राष्ट्रांतील घटक व्यक्तींचेही कल्याण असते.

हिंदुस्थानाच्या उन्नतीकरितां काम करणाऱ्या अनंत शक्तीत एकतानता नसल्यामुळे त्यांचा इष्ट परिणाम घडून येत नाही. एक प्रेरणा दुसऱ्या प्रेरणेला काट देते. त्यामुळें फलित प्रेरणा जवळ जवळ शून्यच असते.

संकेतस्थान निश्चित असलें, उद्देश्याबद्दल एकवाक्यता असली तरच प्रगति होऊं शकते.

दुहीमुळें हिंदुस्थानाचा ऱ्हास झाला. व्यावहारिक ज्ञानाचा अभाव व लोकसंख्येची बेसुमार वाढ हीं हिंदुस्थानांतील दुहीचीं दोन मुख्य कारणे आहेत. काबाडकष्टांविषयीं तिरस्कार, जाति आणि पंथ यांच्या नांवाखालीं झालेले

अनेक अस्वाभाविक भेद व पोटभेद, परदेशगमनाबद्दल द्वेषबुद्धि, बालविवाह, आणि एकंदर स्त्रीसमाजाची शारीरिक व बौद्धिक अवनती इत्यादि सर्व सामाजिक दोषांचा ‘ व्यावहारिक ज्ञानाचा अभाव ’ या शब्दांत **रामानें** समावेश केला आहे.

**शुद्ध आणि बाणेदार आचरण हाच इतिहासाचा उत्तोलन दंड आहे.**

उच्च ध्येयाकरितां मरणे याच्यासारखे दुसरे सुख नाही. कोत्या विचाराच्या मोठ्या माणसांनी राष्ट्रांत सामर्थ्य येत नसून उदात्त विचरांच्या लहान माणसांनींच राष्ट्र जोरदार बनत असते.

जिवंतश्रद्धा आणि प्रज्वलीत ज्ञान हे सर्व प्रकारच्या यशस्वी चळवळीचें जीवनतत्व आहे.

एकलकोंडेपणा हेच हिंदुस्थानच्या अधोगतीचे मुख्य प्रबळ कारण आहे.

**आधीं लोकांचीं अंतःकरणें आपलीशीं करा व मग त्यांना बुद्धिवाद सांगा.**

तुह्मी व राष्ट्रांतील जनता यांच्या दरम्यान अहंकार वृत्तीची यत्किंचितही छाया पडूं देऊं नका. मातृभूमीच्या हितार्थ आपले जीवित अर्पण करणारे खरेखुरे अध्यात्मिक सैनिक बना. देहावरील अहंकार काढून टाका आणि स्वतः राष्ट्र बना. ह्मणजे तुह्मीं ज्या भावना कराल त्या तुमच्या राष्ट्राच्या भावना होऊन बसतील ‘ मी भरतखंड आहे, शंकर आहें, शिव आहें ’ हेंच स्वदेशभक्तीचे अत्युच्च ध्येय.

**लोकसेवा हीच ईशसेवा.** लोकसेवा करणें हे मी माझे कर्तव्य समजतो. हे कर्तव्य बजावीत असतां मी नरकांत गेलो, तरी मला बिलकुल पर्वा नाही माझ्या कृत्यापासून माझे देशबांधव सुखी होत असतील, तर त्या कृत्याबद्दल एकदां सोडून हजारदां नरकवास पत्करण्यास माझी तयारी आहे. मेल्यावर नरकवास प्राप्त होईल या भीतीनें लोकसेवा करण्याचा माझा हक्क जिवंतपणी मी सोडणार नाहीं.

## ( ५ ) तात्विक मतें.

अध्यात्मज्ञान याचा अर्थ ज्या शक्तीच्या–ज्ञानाच्या योगानें मनुष्याचें शील अत्युच्च बनतें ती शक्ती, तें ज्ञान संपादन करणें. विषयवासना पूर्ण नाहींशी

होणें, ऐहिक इच्छांचें, कामनांचें निर्मूलन होणें, याच गोष्टींचा अंतर्भाव अध्यात्मज्ञानांत होतो.

सर्व चराचे आपण स्वामी आहोंत, हें सत्यज्ञान व्यक्तिमात्राला होणें ह्यालाच **राम** व्यक्तिस्वातंत्र्यवाद ह्मणतो.

धन संग्रहाची बुद्धि सोडून चित्तनिरासक्त होणें हेंच वेदान्ताचे अंतिम आहे. वेदान्त समत्व प्रतिपादन करितो आणि खऱ्या खऱ्या समाजसत्तावादाचें हेंच प्राप्तव्य असलें पाहिजे.

ज्याला **समाजसत्तावाद** म्हणतात तो समाजांतील विषमतेच्या फक्त वरवर दिसणाऱ्या कारणांचा विचार करतो. आणि तेवढ्यावरून सर्व मनुष्यांनीं समतेनें, बंधुत्वानें, व प्रेमानें रहावें असा निष्कर्ष काढतो. परंतु **वेदान्त** मनुष्यामनुष्यांतील विषमतेचा, संपत्तीच्या विषमविभागणीचा अगदीं सांगोपांग व सर्व दृष्टीनीं विचार करितो.

संग्रहाची कल्पना झुगारून देणें हें तत्व लोकांना पटलें ह्मणजे हां हां ह्मणतां सर्व जगभर समाजसत्तावादाचा प्रसार होईल. **समाजसत्तावादाचा** खऱ्या खऱ्या **समाजसत्तावादाचा** किंवा वेदान्ताचा जगभर प्रसार होईल तर समाजांतील बराच उच्छृंखलपणा नाहीसा होईल.

वेदान्तप्रतिपादित समाजसत्तावादाच्या, वेदान्तसमतावादाच्या युगांत राजा नको, अध्यक्षही नको, धर्मोपदेशकांची जरूरी नाहीं, सैन्याची आवश्यकता नाहीं, व विश्वविद्यलयाचेंही प्रयोजन नाहीं. कारण प्रत्येकजण स्वतः पुरता एक विश्वविद्यालयच होईल!

जो स्वतंत्र असतो तोच खरा कर्मयोगी. वेदान्तामध्यें कर्म याचा अर्थ परमात्मसंवेदना होणें, चराचरातीत चैतन्याशीं तद्रुपता पावणें असा होणें.

**वेदान्त** हें शास्त्र असून तो धर्मही आहे. वेदान्त हें तत्त्वज्ञान असून भौतिक शास्त्रें व धर्म यांचा मेळ घालणारें शास्त्र आहे.

**वेदान्त** याचा अर्थ स्वातंत्र्य—जडाच्या पलीकडे जाऊन पोहोंचणें, असा आहे तो अनुभवगम्य शास्त्र आहे, तो आशावादाची पराकाष्ठा आहे, तो विश्वव्यापी धर्म आहे.

आपण आज कोण आहों, आपली स्थिति काय आहे, जगताची वास्तविक स्थिति काय ? आपल्या जीवितक्रमामध्यें निरनिराळीं दुःखें, विपत्ति, आणि त्रिविधताप कसे भोगावे लागतात याबद्दलचें यथार्थ वर्णनचित्र ह्मणजेच माया व ह्यालाच **मायावाद** ह्मणतात.

ज्ञान याचा अर्थ, वस्तुस्थिति आहे अशी जाणणें. वेदान्त हा सर्व धर्मांना पूर्णता आणणारा आहे. सर्व धर्मांची अखेरची पायरी ह्यणजे वेदान्त होय.

**उत्क्रांतिवाद** हा एका दृष्टीने पुनर्जन्मवादच आहे. प्रगति हीच जीवाची वास्तविक गति.

वस्तू खऱ्या नाहीत, त्या केवळ आपल्या कल्पना होत. मन किंवा बुद्धि हीच खरी वस्तु; कारण मनोव्यापाराशिवाय आपणांला वस्तूंचें ज्ञान होत नाहीं. असे **कल्पनावाद** ह्मणतो.

वस्तू खऱ्या आहेत. कल्पनेहून स्वतंत्रतेने त्यांना अस्तित्व आहे. बुद्धीवर किंवा मनावर त्यांचे अस्तित्व अवलंबून नाही असे **प्रत्यक्षवाद** प्रतिपादितो.

पण वेदान्त या दोन्ही वादांची एकवाक्यता करितो. विषयज्ञानाला वस्तु व मन अगर वस्तु व तिची कल्पना ह्यांची खरोखर आवश्यकता आहे. परंतु मन किंवा बुद्धि हीं वेदान्तदृष्ट्या बाह्य वस्तूप्रमाणें मिथ्याच आहेत. **खरी वस्तु एक परमेश्वर आहे.**

मनोविकार हा स्पर्शजन्य रोग आहे. व तो संसर्गानें इतरांमध्यें फैलाव केल्याशिवाय रहात नाहीं. ''

याप्रमाणें स्वामीच्या मुख्य मुख्य मतांचे दिग्दर्शन झालें. यांशिवाय त्यांनीं बरेच मतवजा उद्गार काढिलेले आहेत. परंतु त्यांना मतें असे नांव देण्यापेक्षां त्यांच्या तोंडची तीं मुक्ताफळेच आहेत असें ह्मणावें लागतें. तीं सर्वच्या सर्व येथें देणें अशक्य आहे. त्यांचे एक स्वतंत्र पुस्तकच होईल. तरी **रामाची मर्जी** असल्यास तसा प्रयत्न करण्यांत येईल. जातांना स्वामींचा संदेश थोडक्यांत सांगून वाचकवर्गाची रजा घेतों.

## रामबादशहांचा संदेश.

" विसाव्या शतकांत—उद्योगधंदे व कलाकौशल्य यांच्या अभिवृद्धीच्या कालांत–सध्यां चालू असलेल्या जीवन कलहांत आपला टिकाव लागावा, व राजकीय राजयक्ष्म्यानें हळूहळू पण निश्चयानें मृत्यूच्या पंथास लागूं नये, अशी जर तुमची इच्छा असेल, तर विद्युच्छक्तिरूपी मातरिश्व्याला काबीज करा; बाष्परूपी वरुणाला आपला बंदा गुलाम करा; ह्या देवतांची आराधना शिकविणारे पुरोहित ह्मटले ह्मणजे भौतिक शास्त्रवेत्ते किंवा कलाभिज्ञच होत; व त्यांच्या सहाय्याने वरील देवतांना संतुष्ट करा.......भारतवर्षांतील प्रिय आणि भाग्यवान् लोकांनो! प्राचीनकाळच्या पूज्य ऋषींप्रमाणें आकाशांतील मेघगर्जना, विद्युत्प्रकाश, सूर्य, वायु, तेज, आप आणि पृथ्वी ह्यांच्यामध्यें 'एकं सत्' पहाण्याला शिका. निसर्ग हें ईश्वराचें कौतुक आहे, त्याचा विलास आहे ह्या दृष्टीने त्याचे निरीक्षण कराच; पण त्याबरोबर प्रयोगशाळा आणि शास्त्रीय उपकरणांचे संग्रहालय यांच्यामध्यें परमेश्वराला ओळखण्याला शिका, व रसायनशास्त्रवेत्त्यांची प्रयोगशाला यज्ञभूमीप्रमाणें पवित्र मानण्यास शिका."

ॐ राम ! ॐ राम ! ॐ राम !

समाप्त.

# शुद्धिपत्र.



| | पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| वाचकांशीं हितगुज पा. | १ | १६ | आज आत्मोद्धारी | आत्मोद्धारी |
| ,, | २ | ८ | स्वामींच्या | व्यक्तींच्या |
| ,, | २ | २४ | मी ग्रंथकार | मी |
| ,, | २ | २६ | रामवषी | रामवर्षा |
| ,, | ३ | ५ | पटले | वठले |
| प्रस्तावना | १ | १३ | कला | नकला |
| ,, | ३ | ८ | सन् ह | सत् ह्या |
| पान | ३१ | १ | वढत्या | वाढत्या |
| | ३५ | ५ | साधारण | असाधारण |
| | ३६ | १ | पोशाख | पोषाख |
| | ४४ | १७ | कोणत्या | कोणता |
| | ४६ | १२ | करून करून | करून |
| | ५७ | २७ | वर्तत्याची | वर्तायाच्या |
| | ५८ | १६ | विश्वासाला | विकासाला |
| | ५८ | १८ | शास्त्रांची | शास्त्र्यांची |
| | ६३ | १४ | Proffessors | Professors |
| | ६७ | टीप(२६) | १९१८ | १८९८ |
| | ७३ | ३ | भयंलर | भयंकर |
| | ८० | १७ | गतक्या | इतक्या |
| | ८१ | ७ | तेरा | तेरी |
| | ११५ | ९ | हिमलय | हिममय |
| | ११६ | ८ | वाळू गंगेचें | वाग्गंगेचे |
| | ११६ | १४ | उददेश | उपदेश |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११८ | ३ | उज्ज्वल | उज्ज्वल स्वरूप |
| १५३ | १५ | फरइतका | फरहातका |
| १५३ | १५ | नूरझडा | नूर पडा |
| २५२ | १६ | जशीं | जसें |
| २५२ | १६ | तशीच | तसेंच |
| २५३ | १ | त्यामुळें त्यांनीं | त्यामुळे |
| २५४ | ८ | त्याचा | त्याकरितां |
| २५५ | ५ | भागांतून उत्कृष्ट | उत्कृष्ट भागांतून |
| २५६ | ९ | विश्वव्यापहारी | विश्वविहारी |
| २५७ | १९ | वस्तुथिति | वस्तुस्थिति |
| २६० | ४ | महात्यांशीं | महात्म्यांशीं |
| २६१ | २ | केसा | केला |
| २६१ | ११ | रष्ट्रीयत्व | राष्ट्रीयत्व |
| २६१ | २१ | उदारधर्म | उधार धर्म |

याशिवाय क्वचित् ठिकाणीं ठसा अस्पष्ट उठल्याच्या चुका आहेत त्यांबद्दल वाचक वर्ग माफी देतील अशी आशा आहे.